श्रीमत्परमहंस जगद्गुरु शंकराचार्यकृत

# उपदेशसहस्री.

मराठी भाषांतर.

तयार करणार

सिताराम महादेव फडके बी. ए.

प्रसिद्ध करणार

रसिकरंजनग्रंथप्रसारक-मंडळी.

सन १९११.

किंमत एक रुपाया.

हें पुस्तक गंगाधर गोविंद गोंधळेकर पुणें पेठ बुधवार यांचे
" भारतभूषण " छापखान्यांत छापवून रसिकरंजन
प्रथमप्रसारक मंडळीकरिता रा. वासुदेव रामचंद्र
देशपांडे यांनीं पुणें पेठ सदाशिव घर नंबर
४४४ येथें प्रसिद्ध केलें



# भाषांतरकर्त्यांची प्रस्तावना.

श्रीजगद्गुरु शंकराचार्यांच्या अनेक परमार्थ ग्रंथापैकीं उपदेशसहस्री हा गद्यपद्यात्मक ग्रंथ बराच सुलभ आहे. उपनिषदांतील सार काढून भगवंतानीं गीता सांगितली त्याप्रमाणेंच शंकराचार्यांनीं उपनिषदें व ब्रह्मसूत्रें ह्यांचें तात्पर्य ह्या ग्रंथांत आणलें आहे. सन १९०८ सालीं हुबळी येथें श्रीशंकराचार्यांच्या उत्सवाचे प्रसंगीं ह्या ग्रंथाचें सरळ मराठी भाषांतर करणारास बक्षीस लाविलें होतें. त्या वेळच्या भाषांतराचा निकाल १९०९ सालीं लागला व बक्षिसादाखल ५१ रुपये भाषांतरकर्त्यांस मिळाले. हें भाषांतर पहाण्याची व वाचण्याची उत्कंठा आमच्या बऱ्याच स्नेही मंडळींस होती, पण ती कांहीं कारणानीं पूर्ण झाली नाहीं. पुढें रसिकरंजनग्रंथ प्रसारक मंडळींनीं त्या प्रकारचें भाषांतर प्रसिद्ध करण्याबद्दलचें काम अंगावर घेतलें, त्यामुळें हा प्रयत्न वाचकवर्गापुढें येत आहे.

असल्या कठिण विषयाच्या ग्रंथाचें खरें व पूर्णज्ञान तो ग्रंथ कोणा तरी विद्वानाच्या तोंडूनच ऐकून समजून घेतल्याशिवाय मिळत नाहीं. परंतु मुळींच कांहीं न कळण्यापेक्षा कांहीं थोडीबहुत तरी समजूत ( आणि खरोखर समजूतच ती ) भाषांतरावरून होईल. म्हैसूर येथे प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांतील मूळ आधारास घेऊन हें भाषांतर केलेलें आहे. टीकाकारांचें विवेचन नको असा मूळपासून उद्देश असल्यामुळें कित्येक ठिकाणीं भाषांतर नीरस वाटेल हें भाषांतरकर्ता जाणून आहे. अपरिहार्य स्थलाशिवाय इतर ठिकाणीं शास्त्रीय पारिभाषिक शब्द टाळण्याचा प्रयत्न करणें येवढें शक्य होतें, त्याप्रमाणें केलेलें आहे. ज्यांना मूळ संस्कृत समजतें त्यांच्याकरतां हा प्रयत्न नाहीं, पण अशा रीतिनें तरी हा ग्रंथ वाचकवर्गापुढें येण्याचा हा सुयोग आला आहे, त्याबद्दल परमेश्वराची स्तुति आणि " न्यून तें पुरतें " करून घेण्याबद्दल वाचकवर्गाची विनंति करीत आहे. यांत जे कांहीं दोष असतील ते दाखविणाऱ्या गृहस्थाचा भाषांतरकर्ता फार आभारी होईल.

पुणें ता० २६ माहे जुलै १९११ भाषांतरकर्ता.

# प्रास्ताविक शब्द.

महाराष्ट्र वाङ्मयाच्या अभिवृद्ध्यर्थ यत्न करावा, ग्रथकारास ग्रथप्रकाशनाचे कामी साहाय्य करावें व महाराष्ट्र वाचकवर्गास शक्य तितक्या कमी किंमतींत मनोरंजन व बोध यांची जोड करून देणारे ग्रंथ उपलब्ध करून द्यावे, या हेतूनें शके १८३२ च्या विजया दशमीचे सुमुहूर्तावर पुणें येथें "रसिकरंजन ग्रंथप्रसारक मंडळी" या नावाची संस्था स्थापन झाली.

## ग्रंथ पहिला.

| | | |
|---|---|---|
| पृष्ठसंख्या डेमी २००. कागद ग्लेज | सुभाषित आणि विनोद. | किंमत ०।१२ व्ही. पी. खर्च निराळा. |

सुभाषित, विनोद, हास्यरस, वगैरे गोष्टींचे शास्त्रीय व तात्त्विक विवेचन करणारा मराठी भाषेतील हा पहिलाच अपूर्व ग्रंथ होय

लेखक—श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए. एल्एल्. बी.
संपादक—केसरी व मराठा

हा ग्रंथ खरोखरच किती अपूर्व आहे हें त्याजवरील डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटींतील परीक्षकाचे अभिप्राय वाचल्यानें कळून येईल

## अभिप्राय.

( १ ) सदर निबंधातील विषयाचें प्रतिपादन रा. केळकर यांनी फारच विद्वत्तापूर्ण रीतीनें केलेलें आहे अनेक टीकाकारांच्या मताचा आधार देऊन त्यांनी आपले सिद्धांत सिद्ध केले आहेत, व या कामी संस्कृत कवि ग्रंथकार, तसेंच प्रख्यात इंग्रजी कवि, नाटककार, कादंबरीकार, वगैरेंच्या ग्रंथांतील उतारे व अवतरणांचाहि उपयोग केला आहे. विषयाची मांडणी शास्त्रीय तत्त्वज्ञानपद्धतीस अनुसरून आहे.

( २ ) सदरहू निबंध लिहून मराठी भाषामंदिरांचें एक अगदीं नवीन व पूर्वी न पाहिलेलें एक दालनच केलें व मराठी वाचकवर्ग आणि ग्रंथकार या उभयतांवरही मोठाच उपकार केला.

( ३ ) ज्याकरिता हा निबंध लिहिला आहे, ह्मणजे विनोदी लेख लिहिण्यास ज्यास स्फूर्ति अथवा इच्छा आहे, त्यांनीं अवश्य वाचण्याजोगा हा निबंध आहे.

---

या सरथेतर्फे‌चा दुसरा ग्रंथ आज प्रसिद्ध होत आहे. तो रा. रा. शि. म. परांजपे बी. ए. यांनीं लिहिलेला " सार्थ उपदेशसाहस्री " हा होय. इंग्रेजींत " द बुक ऑफ गोल्डन डीड्स " या नांवानें प्रसिद्ध असलेल्या ग्रंथाचें मराठी सुरस भाषांतर " सुवर्णकुसुमहार " हा तिसरा ग्रंथ मंडळीतर्फे लवकरच प्रसिद्ध व्हावयाचा असून त्यास सुप्रसिद्ध कै. हरि महादेव पंडित यांच्या स्मारका प्रीत्यर्थ लाविलेलें बक्षीस मिळालें आहे. या अत्युत्तम ग्रंथाचें भाषांतर रा. रा. शि. म. परांजपे यांनींच केलें आहे.

ग्रंथप्रकाशनाचें काम जबाबदारीचें असून त्यास ग्रंथकाराच्या कृतिरूप साहाय्याची जशी जरूरी आहे तशी त्यास वाचकवर्गाच्या द्रव्यसाहाय्याचीहि अवश्यकता असते वाचकवर्गाच्या आश्रयावेरीज ग्रंथलेखनाचें व ग्रंथ प्रकाशनाचें काम लगेचच पडावयाचें. तेव्हां ' रसिकरंजन ग्रंथप्रसारक मंडळीस ' महाराष्ट्र वाचकवर्ग भरपूर आश्रय देईल अशी आशा आहे. मानवी प्रयत्न चुकीस पात्र आहे. तेव्हां मंडळीनें शक्य ती काळजी घेतली असताहि तिजकडून ग्रंथाच्या निवडणुकींत, छपाईंत वगैरे चूक होऊन नये, याकरितां महाराष्ट्र भाषेच्या विद्वान व रसिक भक्तांनीं सूचना करून अवश्य साहाय्य करावें, अशी मंडळीची सविनय प्रार्थना आहे. आजपर्यंत मंडळीस ज्यांनीं साहाय्य केलें त्या सद्गृहस्थांची मंडळी अत्यंत ऋणी असून त्यांचें प्रेम असेंच मंडळीवर कायम राहील अशी मंडळीस आशा आहे

मिति श्रावण शु० ५
शके १८३३

रसिकरंजन ग्रंथप्रसारक मंडळी.

पुणें येथील

## मोठमोठ्या विद्वान् सद्गृहस्थांच्या

आश्रयाखालीं स्थापन झालेली

# 'रसिकरंजन ग्रंथप्रसारक मंडळी'

विद्वान्, पदवीधर, प्रसिद्ध कादंबरीकार, नाटककार वगैरे कसलेल्या रसिक व मार्मिक लोकांनीं लिहिलेले-पसंत केलेले-ग्रंथ या मंडळी-कडून प्रसिद्ध करण्यांत येतील.

मंडळीचे सर्व ग्रंथ, धार्मिक, नैतिक, सामाजिक, औद्योगिक, ऐतिहासिक, शास्त्रीय व पौराणिक वगैरे विषयांस धरून ( कादंबऱ्या, नाटकें, काव्यें, चरित्रें, निबंध वगैरे, ) सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस वाचण्यास योग्य असेच सोप्या आणि मनोरंजक भाषेंत प्रसिद्ध होतील.

आमच्या सर्व महाराष्ट्र "बंधुभगिनींनीं" या सत्कृत्यास हातभार लावून महाराष्ट्र वाङ्मयाची सेवा करण्याचें पुण्य पदरीं घेऊन आम्हांला उत्तरोत्तर पुढें पाऊल टाकण्यास प्रोत्साहन द्यावें अशी त्यांस सविनय विनंति आहे.

महाराष्ट्रवाङ्मयनिधिचा प्रसार करण्याचे कामीं महाराष्ट्रांतील प्रत्येक स्त्रीपुरुष त्याचा अल्पांश तरी वांटेकरी आहे-जबाबदार आहे-हें जाणून महाराष्ट्र बंधुभगिनी-रसिकजन या सत्कृत्यास लेखनद्वारा, द्रव्यद्वारा किंवा अशाच प्रकारानें हस्तें परहस्तें मदत करतील, या आशेवर आम्ही महाराष्ट्रवाङ्मय प्रसिद्ध करण्याचें जूं आनंदानें आपल्या खांद्यावर घेण्यास तयार झालों आहोंत; त्याचें चीज करण्याचें काम सर्व महाराष्ट्रबंधुभगिनींकडे आहे व तें उत्तम प्रकारानें शेवटास नेतील यांत कांहीं शंका नाहीं.

## रसिकरंजन ग्रंथप्रसारक मंडळीचे नियम.

१. एक रुपया भरून मंडळीचे कायमचे वर्गणीदार होतां येतें.

२. एक रुपया भरणारास कायमचा वर्गणीदार समजून त्यास मंडळीच्या सर्व सवलतींचा फायदा देण्यांत येईल.

३. कायमचे वर्गणीदारांस मंडळीचा प्रसिद्ध होणारा प्रत्येक ग्रंथ पाऊणपट किंमतीस देण्यात येईल.

४. एका वर्षांत तीन किंवा चार ग्रंथ प्रसिद्ध होतील.

५. प्रत्येक ग्रंथ प्रसिद्ध होण्याचे आधीं कायमचे वर्गणीदारांकडे त्या पुस्तकाचें माहितीपत्रक सूचनेदाखल पाठविण्यांत येईल.

६. प्रत्येक ग्रंथ वर्गणीदारानें घेतलाच पाहिजे अशी त्याजवर सक्ती नाहीं

७. परगांवचे वर्गणीदारास व्ही. पी. नें ग्रंथ पाठविण्यात येतील.

८. कोणी व्ही. पी. चा स्वीकार न करिता ती परत आमचेकडे पाठवून दिल्यास त्या वर्गणीदाराचें नाव वर्गणीदाराचे पटांतून काढून टाकण्यात येईल, व त्यास मंडळीच्या कोणत्याहि सवलतींचा फायदा मिळू शकणार नाही, व रुपया परत मिळणार नाही.

९. ज्या गावीं आमचे एजंट आहेत तेथील वर्गणीदारांस एजंटमार्फत ग्रंथ मिळण्याची व्यवस्था करण्यांत येईल.

१०. आमची मुंबईची सोल एजन्सी हिन्द एजन्सीकडे आहे. मुंबई संबंधानें हरएक पत्रव्यवहार त्याजकडे करावा.

११. गावोगावीं एजंट पाहिजेत. एजन्सीचे नियम समक्ष अगर पत्रद्वारें.

मुंबई,
सोल एजंट
हिंद एजन्सी,
माधवबाग.



म्यानेजर,
रसिकरंजन ग्रंथप्रसारक मंडळी,
सदाशिव पेठ, घ. न. ४४४, पुणें-सिटी.

# विषयानुक्रमणिका.

उत्तम विचार.



ब्रह्मैक्य.

हा ग्रंथ

श्रीमत् शंकराचार्य करवीर सिंहा-
सनाधीश्वर सच्चिदानंद
विद्याशंकर भारतीस्वामी
यांचे चरणीं भक्तिपूर्वक
अर्पण केला
आहे.

॥ ॐ ॥

# उपदेशसहस्री.

अथ मोक्षसाधनोपदेशविधिं व्याख्यास्यामो मुमुक्षूणां श्रद्दधानानामर्थिनामर्थाय ॥ १ ॥

अर्थ —श्रीमत् शंकराचार्य म्हणतात —जन्ममरणरूपी परंपरा कोणच्या साधनानें सुटेल हें आम्ही सविस्तर सांगणार आहों. याचे अधिकारी कोण ? ज्यांना मोक्षाची इच्छा झाली असेल, ह्या ग्रंथाविषयीं विश्वास असेल, आणि ह्याचा अर्थ समजून घ्यावा असा हेतु असेल, अशा लोकांच्याकरितां आम्ही हा मार्ग सांगत आहों.

तदिदं मोक्षसाधनं ज्ञानं साधनसाध्यादनित्यात्सर्वस्माद्विरक्ताय त्यक्तपुत्रमित्रलोकैषणाय प्रतिपन्नपरमहंसपारिव्राज्याय शमदमदयादियुक्ताय शास्त्रप्रसिद्धशिष्यगुणसंपन्नाय शुचये ब्राह्मणाय विधिवदुपसन्नाय शिष्याय जातिकर्मवृत्तविद्याभिजनैः परीक्षिताय ब्रूयात् पुनः पुनः यावद्ग्रहणं दृढी भवति ॥ २ ॥

अर्थ —तें मोक्ष मिळवून देणारें ज्ञान वारंवार सांगावें—तें पूर्णपणें ठसेपर्यंत सांगावें. कोणाला ? ( यज्ञयागादिक सांगितलेलीं ) साधनें आणि ( त्यापासून मिळणारे स्वर्ग वगैरे उपभोगाचे पदार्थ हीं ) साध्यें हीं दोन्हींही अनित्य ह्मणजे नाशवंत आहेत, असें समजून त्यांविषयीं ज्याला इच्छा राहिली नाहीं, मुलेंबाळें, द्रव्य, घरदार, स्वर्ग वगैरे लोक ह्यांच्याविषयीं ओढा ज्याला उरला नाहीं,

परमहंस होऊन सर्वांचा त्याग करण्याची ज्याची तयारी असेल; मनोनिग्रह, इंद्रियनिग्रह करून सर्व भूतमात्रांविषयीं दया ज्याच्या ठिकाणीं आली असेल; शास्त्रांत शिष्याच्या अंगीं असले पाहिजेत ह्मणून सांगितलेले गुण ज्याच्या अंगीं असतील; अंतर्बाह्य शुद्ध झालेला असेल; ब्राह्मणाच्या कुलांत जन्मलेला असेल; शास्त्रमार्गाप्रमाणें गुरूला शरण येईल; सात, ह्या जन्मांत त्यानें केलेलीं कर्में, त्याचें वर्तन, त्याची विद्या, कुलगोत्र वगैरे संबंधानें जो योग्य असेल, त्या शिष्यालाच हें ज्ञान द्यावें.

श्रुतिश्च–' परीक्ष्य...तत्त्वतो ब्रह्मविद्यां' इति । दृढगृहीता हि विद्या आत्मनः श्रेयसे संतत्यै च भवति। विद्या संततिश्च प्राण्यनुग्रहाय भवति नौरिव नदीं तितीर्षोः। शास्त्रंच–' यद्यप्यस्मा इमामद्भिः परिगृहीतां धनस्य पूर्णां दद्यादेतदेव ततो भूयः ' इति । अन्यथा च ज्ञानप्राप्त्यभावात् ' आचार्यवान् पुरुषो वेद ' ' आचार्याद्धैव विद्या विदिता ' ' आचार्यः प्लावयिता सम्यग्ज्ञानं प्लव इहोच्यते ' इत्यादिश्रुतिभ्यः, ' उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ' इत्यादि स्मृतेश्च ॥ २ ॥

अर्थः–वर सांगितल्याप्रमाणें तयारी असलेल्या शिष्याला गुरूनें ब्रह्मविद्येचा उपदेश करावा, ह्याबद्दल मुण्डकोपनिषदांतील प्रथम मुण्डकांतील दुसऱ्या खंडांतील बारा आणि तेरा हे दोन श्लोक सांगतात. वारंवार सांगून दृढ झालेल्या विद्येनें ( संशय वगैरे नाहींसे होऊन ) आत्म्याचें कल्याण होतें आणि तशी विद्या दुसऱ्याला सांगतां येते. नदी उतरून जाण्याकरितां एक (चांगली) नाव ठेवली ह्मणजे ती पाहिजे त्याच्या उपयोगी पडते, त्याप्रमाणें दुसऱ्याला सांगतां आलेली विद्या सगळ्यांच्या हिताला कारण होते. यानें

फल शास्त्रांत सांगितलें आहे तें असें:–ही समुद्रानें वेष्टित पृथ्वी द्रव्यानें भरून दान केली तरी विद्यादानाची बरोबरी येणार नाहीं. गुरुशिवाय विद्या प्राप्त होण्याला मार्ग नाहीं. ह्याला आधार पुष्कळ श्रुती आहेत, त्यांपैकीं तीन येथें दिल्या आहेत. गुरूकडे गेलेल्या पुरुषाला ज्ञान झालें; गुरूपासून प्राप्त झालेलीच विद्या कायम रहाते; गुरु नावाडी आहेत, उत्तमज्ञान ही नौका होय. ह्याला स्मृतीचा हि आधार आहे. तो श्रीमद्भगवद्गीतेंतील ४ थ्या अध्यायाचा चौतिसावा श्लोक होय. गुरूला शरण जा, त्यांना शंका विचार, त्यांची सेवा कर ह्मणजे ते तुझ्यावर अनुग्रह करून तुला ज्ञान सांगतील.

शिष्यस्य ज्ञानाग्रहणं च लिङ्गैर्बुध्वा अग्रहणे हेतून् अधर्मलौकिकप्रमादनित्यानित्यविवेकविपर्यासंजातदृढपूर्वश्रुतत्व लोकचिंतावेक्षणजात्याद्यभिमानादीन् तत्प्रतिपक्षैः श्रुतिस्मृतिविहितैः अपनयेत् अक्रोधादिभिरहिंसादिभिश्च यमैः ज्ञानाविरुद्धैश्च नियमैः ॥ ४ ॥

अर्थ:–एकदां ज्ञान सांगून तें शिष्याच्या मनांत ठसत नाहीं. तसें तें त्याला समजलें नाहीं हें त्याच्या मुखावरून, हावभावांवरून, बोलण्याचालण्यावरून ओळखावें. ज्ञान न समजण्याला कारणें असतात तीं:–पूर्वजन्मीचीं पातकें, जन्मापासून केलेलीं दुष्टकृत्यें, शास्त्रनियमाचें उल्लंघन, जगांतील नित्य काय आणि अनित्य काय याचा विचार न केल्यामुळें, जें कांहीं ऐकलें असेल तें ध्यानात ठेवण्याची संवय नसल्यानें, लोक नांवें ठेवतील ह्याची भीति, कुल जाति वगैरेचा अभिमान; हे दोष घालविण्याकरितां त्याच्यावर श्रुतिस्मृतींत सांगितलेले उपाय करावे. सूर्याची सेवा, शास्त्राप्रमाणें भोजनाचे नियम पाळणें, वगैरे. शिवाय संताप, इच्छा वगैरे,

आणि अहिंसा, सत्य वगैरे व ज्ञानाच्या आड येणार नाहींत असले तीर्थयात्रा वगैरे यमनियम ह्या साधारण उपायांनीं ज्ञान दृढ होण्याला विघ्न करणारे दोष घालवावे.

अमानित्वादिगुणं च ज्ञानोपायं सम्यग्ग्राहयेत् ॥ ५ ॥

त्याप्रमाणेंच ज्ञान होण्याला उपाय अभिमान नसणें वगैरे गुण चांगले संपादन करावे.

आचार्यस्तूहापोहग्रहणधारणशमदमदयानुग्रहादिसंपन्नो लब्धागमो दृष्टादृष्टभोगेष्वनासक्तः त्यक्तसर्वकर्मसाधनो ब्रह्मवित् ब्रह्मणि स्थितोऽभिन्नवृत्तो दम्भदर्पकुहकशाठ्यमायामात्सर्यानृताहंकारममत्वादिदोषविवर्जितः केवलपरानुग्रहप्रयोजनो विद्योपयोगार्थी पूर्वमुपदिशेत्—

अर्थः—कोणच्या प्रकारचा गुरु असावा तें सांगतात. शिष्याच्या मनांतले संशय खोडसणारा; त्याची चुकती झालेली समजूत घालविणारा; त्याचे प्रश्न समजणारा; योग्य वेळेला ते प्रश्न आठविणारा; शम, दम, भूतदया यांनीं युक्त असलेला; दुःखिताचा कळवळा करणारा; ( गुरूपासून ) विद्या शिकलेला; ह्या जगांतील किंवा स्वर्गांतील भोगांविषयीं विटलेला; एकंदर कर्मांचीं साधनें सोडलेला (संन्यास केलेला), ब्रह्मज्ञान झालेला; नेहमीं स्वानंदांत दंग असलेला; शास्त्रमार्ग न सुटलेला; ढोंग, गर्व, कपट, दुष्टबुद्धि, लबाडी, मत्सर, खोटेपण, अभिमान, मोह वगैरे दोष नसलेला; दुसऱ्याच्या उपयोगी पडण्याच्या हेतूनेंच केवळ जगांत रहाणारा; आपलें ज्ञान दुसऱ्याच्या उपयोगी पडण्यासारखें करून देण्याची इच्छा धरणारा, अशा गुरूनें प्रथम उपदेश करावा तो असाः—

' सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ' ' यत्र ना-

न्यत्पश्यति ' ' आत्मैवेदं सर्वं ' ' आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् ' ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' इत्याद्या आत्मैक्यप्रतिपादनपराः श्रुतीः ॥ ६ ॥

अर्थः—हे सोम्य सत् हेंच पूर्वी एक होतें, त्याच्या तोडीचें दुसरें कांहीं नाहीं, त्या ठिकाणीं दुसरें कांहीं दिसत नाहीं, आत्माच सर्व ठिकाणीं भरलेला आहे; आत्मा हाच प्रारंभी एकटा होता; हें दिसतें तें सर्व ब्रह्म वगैरे छांदोग्य वगैरे उपनिषदांतील आत्म्याचें अद्वैत सांगणाऱ्या श्रुती ( मंत्र ) प्रथम समजून द्याव्या.

उपदिश्य स ग्राहयेत् ब्रह्मलक्षणम् 'य आत्माऽपहतपाप्मा' ' यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म ' ' योऽशनयापिपासे '' नेति नेति ' ' अस्थूलमनणु ' ' स एष नेति नेति ' ' अदृष्टं दृष्टृ ' ' विज्ञानमानंदं ' ' सत्यं ज्ञानमनन्तं ' ' अदृश्येऽनात्म्ये ' 'सवा एष महानजआत्मा ' ' अप्राणो ह्यमनाः ' ' सबाह्याभ्यंतरो ह्यजः ' ' विज्ञानघन एव ' ' अनन्तरमबाह्यं ' ' अन्यदेव तद्विदितादथो अविदितात् ' ' आकाशो वै नाम ' इत्यादि श्रुतिभिः ॥ ७ ॥

अर्थः—हा उपदेश करून ब्रह्माची खूण पटवून द्यावी. त्याची ओळख होतांच सर्व पापें जातात. प्रत्यक्ष आणि अपरोक्ष ब्रह्मच आहे. त्याला खायला प्यायला नको. दृश्य वस्तूंपैकीं तो कोणचीच नव्हे. त्याच्यापेक्षां मोठें कांहीं नाहीं, त्याच्याहून लहान कांहीं नाहीं. तोच हा, पण हा दृश्यापैकीं नाहीं. सर्व दृश्य पदार्थांच्या पलीकडचा, पहाणारा, अनुभवरूप, आनंदरूप, तो सत्य आहे, ज्ञानस्वरूप आहे, त्याला अंत नाहीं. दृश्यापलीकडे असणारा, सर्व जड व चल वस्तूंत असणारा. तोच हा सर्वांत मोठा, जन्मरहित आत्मा होय.

प्राणाच्या पलीकडे, मनाला न सांपडणारी, आंत बाहेर सर्वत्र भरलेला, जन्मरहित आहे. विज्ञान ( अनुभव ) पूर्ण आहे. तो सर्व ठिकाणीं सारखा भरलेला, आंत बाहेर तोच आहे. माहीत असलेल्या किंवा नसलेल्या वस्तूंहून निराळा आहे. आकाश एवढेंच त्याच्यासारखें आहे. अशा आणखी पुष्कळ श्रुती आहेत.

स्मृतिभिश्च–' न जायते न म्रियते, नादत्ते कस्यचित्पापम्, यथाऽकाशस्थितो नित्यं, क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि,न सत्तन्नासदुच्यते, अनादित्वान्निर्गुणत्वात्,समं सर्वेपु भूतेपु,उत्तमः पुरुषः इत्यादिभिः श्रुत्युक्तलक्षणाविरुद्धाभिः परमात्मासंसारित्वप्रतिपादनपराभिः तस्य सर्वेणानन्यत्वप्रतिपादनपराभिश्च ॥८॥

अर्थः—त्याप्रमाणेंच स्मृतीचेही आधार दाखवावे.ते असे.आत्मा जन्मास येत नाहीं, मरत नाहीं, तो कोणाच्या पापाला अधिकारी नाहीं. ( येवढा मोठा वायु ) तो जसा आकाशांत असतो. मलाच क्षेत्रज्ञ समज. तें सतही नव्हे आणि असतही नव्हें. त्याला आदि ( आरंभ ) नाहीं, गुण नाहीं. सर्व प्राणीमात्रांच्या ठिकाणीं एकसारखा; तोच उत्तम पुरुष ह्या प्रकारच्या श्रुतीत सांगितलेल्या अर्थाच्या,परमात्म्याला संसार लागू नाहीं असें सांगणाऱ्या आणि तो सर्वत्र भरून आहे,निराळा नाहीं असें ह्मणणाऱ्या स्मृतींचे आधार द्यावे.

एवं श्रुतिस्मृतिभिः गृहीतपरमात्मलक्षणं शिष्यं संसारसागरादुत्तितीर्पुं पृच्छेत्-कस्त्वमासि सोम्येति ॥ ९ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें श्रुति आणि स्मृति दोन्ही ठिकाणच्या वचनाचे आधार समजलेला शिष्य, संसार हा समुद्र आहे, ह्यांतून मला परतीराला जाण्याची इच्छा आहे असें ह्मणूं लागला असतां त्यास विचारावें--बेटा, तूं कोण आहेस ( याचा विचार केलास )?

स यदि ब्रूयात्—ब्राह्मणपुत्रः अदोन्वयः ब्रह्मचार्यासम् गृहस्थोवा, इदानीमस्मि परमहंसपरिव्राट् संसारसागरात् जन्ममृत्युमहाग्राहात् उचितीर्षुरिति ॥ १० ॥

अर्थः—त्याची समज पटली नसली तर तो ह्मणेल–महाराज, मी अमुक ब्राह्मणाच्या पोटीं अमक्या कुळात जन्मास आलों, माझी मुंज झाली आहे, मी अविवाहित आहें, किंवा माझीं बायकापोरें आहेत किंवा मी परमहंस दीक्षा घेण्याच्या तयारींत आहें, घरदार सोडलें आहे, त्या जन्ममरणरूपीं सुसरी असलेल्या संसारसमुद्रांतून मला आपण पार न्या.

आचार्यो ब्रूयात्—इहैव तव सोम्य मृतस्य शरीरं वयोभिरद्यते मृद्भावं वापद्यते। तत्र कथं संसारादुद्धर्तुमिच्छसि इति नहि नद्याःअवरे कूले भस्मीभूते नद्याः पारं तरिष्यसि इति॥११॥

अर्थ–[त्याच्या उत्तरावरून हा देहच मी असें ह्मणतो आहे तेव्हां] गुरु ह्मणतील–अरे बाबा, हें तुझें शरीर मरणानंतर [ उघड्यावर पडलें तर ] गिधाडें वगैरे पक्ष्यांच्या भक्षणाला उपयोगीं पडेल, ( तें पुरलें किंवा जाळलें तर ) त्याची माती होईल. तें ह्या संसारांतून पलीकडे जाणार कसें ? नदीच्या अलीकडच्या तीराला ह्याची राख झाल्यावर तूं पलीकडे जाणार कसा ?

स यदि ब्रूयात् अन्योऽहं शरीरात्। शरीरं तु जायते म्रियते वयोभिरद्यते मृद्भावमापद्यते शस्त्राग्न्यादिभिश्च विनाश्यते व्याध्यादिभिश्च प्रयुज्यते । तस्मिन् अहं स्वकृतधर्माधर्मकृतवशात् पक्षी नीडमिव प्रविष्टः पुनः पुनः शरीरविनाशे धर्माधर्मवशात् शरीरान्तरं यास्यामि पूर्वनीडविनाशे पक्षीव नीडान्तरम्।

शिष्य ह्मणतो:—महाराज, मी शरीराहून निराळा आहें. जन्माला येणें, मरण हें शरीराला लागू; पक्षी त्यातील शरीर, माती होईल शरीराची, शस्त्र किंवा विस्तव नाश करणार शरीराचा, आधी व्याधी होणार शरीराला, मी पूर्वजन्मीं केलेल्या पापपुण्याप्रमाणें, पक्षी घरट्यांत शिरतो, त्याप्रमाणें ह्या देहांत आलों आहें; अनेक वेळां शरीराचा नाश झाला तरी मी आपल्या चांगल्या वाईट कृत्याप्रमाणें दुसरें शरीर धारण करीन. एक घरटें मोडलें तर पक्षी जसा दुसऱ्या घरट्यांत जातो त्याप्रमाणेंच माझें होईल.

एवमेवाहमनादौ संसारे देवमनुष्यतिर्यङ्नरयस्थानेषु स्वकर्मवशात् उपात्तमुपात्तं शरीरं त्यजन् नवंनवं चान्यदुपाददानो जन्ममरणप्रबंधचक्रे घटीयंत्रवत् स्वकर्मणा भ्राम्यमाणः क्रमेणेदं शरीरमासाद्य संसारचक्रभ्रमणात् अस्मात् निर्विण्णो भगवंतमुपसन्नोऽस्मि संसारचक्रभ्रमणप्रशमाय । तस्मान्नित्य एवाहं शरीरादन्यः । शरीराणि आगच्छन्त्यपगच्छन्ति च वासांसीव पुरुषस्येति ॥ १२ ॥

अर्थः—त्याप्रमाणें हें जग कर्मांपासून चाललें आहे कोणास ठाऊक, ह्यांत मी आपल्या कर्माप्रमाणें, देव, मनुष्य, पशुपक्षी वगैरे योनींमध्यें त्यांच्या त्यांच्या लोकांत किंवा नरकांत, वारवार शरीर धारण केलें, एक टाकून दुसरें घेतलें. अशा तऱ्हेनें जन्ममरणाच्या ह्या रहाटगाडग्यावर फिरतां फिरतां हलीं दैवयोगानें ह्या शरीरांत आलों आहे. ह्या चक्राच्या फेऱ्यामुळें कंटाळून गेलों आहे. हें भ्रमण बंद कसें होईल तें सांगा ह्मणून आपल्या चरणाजवळ आलों आहे. ह्या शरीरापासून मी निराळा आहें. एक वस्त्र टाकून दुसरें घ्यावें, त्याप्रमाणें हे देह येतात आणि जातात.

आचार्योंब्रूयात्–साध्ववादीः सम्यक्पश्यसि ।

गुरु ह्मणतातः—हें बोललास हें बरोबर, ह्यावरून तुझी नीट समज झाली आहे असें दिसतें.

कथं मृषा अवादीः ब्राह्मणपुत्रोऽदोन्वयो ब्रह्मचार्यासं गृहस्थोवा, इदानीमस्मि परमहंस परिव्राडिति ॥ १३ ॥

अर्थः—पण मघाशीं तूं ह्मणत होतास कीं, मी ब्राह्मणकुळांत अमक्याच्या पोटीं जन्म घेतला, ब्रह्मचारी किंवा गृहस्थ आहें, परमहंस दीक्षा घेतलेला आहें, तें तसें खोटें कां बोललास ?

स यदि ब्रूयात्-भगवन् कथमहं मृषा अवादिषम् ॥ १४ ॥

शिष्यः—महाराज, तें माझें बोलणें खोटें कसें !

तंमति ब्रूयादाचार्यः–यतस्त्वं भिन्नजात्यन्वयसंस्कारं शरीरं जात्यन्वयवर्जितस्यात्मनः प्रत्यभ्यज्ञासीः ब्राह्मणपुत्रोऽदोन्वय इत्यादिना वाक्येनेति ॥ १५ ॥

गुरुः—जात, कुळ लागली कोणाला? मुंज वगैरे झाली कोणाची तुझी किंवा शरीराची? जात, कुळ, संस्कार लागत नाहींत असा जो आत्मा त्याच्या ठिकाणीं मी ब्राह्मणाचा मुलगा वगैरे शब्दांनीं त्या त्या गोष्टी तूं डकवून घेतल्याप्रमाणें बोललास तें खरें आहे कां?

स यदि पृच्छेत्–कथं भिन्नजात्यन्वयसंस्कारं शरीरं, वाऽहं जात्यन्वयसंस्कारवर्जितः इति ।

शिष्यः–तें कसें ? निरनिराळ्या जाती, वंश, संस्कार शरीरालाच कशा लागतात, मी त्यापासून वेगळा कसा ?

आचार्यो ब्रूयात्–शृणु सोम्य यथेदं शरीरं त्वत्तो भिन्नं भिन्नजात्यन्वयसंस्कारं, त्वंच जात्यन्वयसंस्कारवर्जितः इत्युक्त्वा तं स्मारयेत्–स्मर्तुमर्हसि सोम्य परमात्मानं सर्वात्मानं

यथोक्तलक्षणं श्रावितोऽसि 'सदेव सोम्येदम्' इत्यादिभिः श्रुतिभिः स्मृतिभिश्च लक्षणं च तस्य श्रुतिभिः स्मृतिभिश्च ॥ १७ ॥

गुरुः—शिष्या ऐक. हें शरीर तुझ्याहून वेगळें आहेना ? जात, कुळ आणि संस्कार हें त्यालाच होतात ना ? मग ते शब्द तुला कसे लागतील. तूं त्यांच्यापासून निराळा. मागें तुला श्रुतिवाक्यें सांगितलीं त्यांचें स्मरण आहेना ? सर्वांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या परमात्माचीं लक्षणें तुला सांगितलीं. बेटा पूर्वी फक्त सत् तेवढेंच होतें वगैरे श्रुतिस्मृति तुझ्या कानावर घातल्या, त्यांतील लक्षणांची आठवण कर.

लब्धपरमात्मलक्षणस्मृतये ब्रूयात्—योऽसावाकाशनामा नामरूपाभ्यामर्थान्तरभूतः अशरीरः अस्थूलादिलक्षणःअपहतपाप्मादिलक्षणश्च सर्वैः संसारधर्मैरनागंधितः यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरः अदृष्टो द्रष्टा अश्रुतः श्रोता अमतो मंता अविज्ञातो विज्ञाता नित्यविज्ञानस्वरूपः अनन्तरः अबाह्यः विज्ञानघनः एव परिपूर्णः आकाशवत् अनंतशक्तिः आत्मा सर्वस्य अशनयादिवर्जितःआविर्भाव तिरोभाववर्जितश्च स्वात्मविलक्षणयोः नामरूपयोः जगद्बीजभूतयोः स्वात्मस्थयोः तत्त्वान्यत्वाभ्यामनिर्वचनीययोः स्वयंवेद्ययोः स्वभावमात्रेणाचिन्त्यशक्तित्वाद्व्याकर्ता अव्याकृतयोः ॥ १८ ॥

अर्थः-झालेंना मागचें स्मरण. ऐक. तोच हा आत्मा. ज्याला [ कित्येक ठिकाणीं ] आकाशाचें नाव दिलें आहे. ज्याला नांव आणि रूप आहे त्या सर्वाला आधार. शरीराहून वेगळा. स्थूल

वगैरे लक्षणें लागू पडत नाहींत असा, सर्व पातकें नाहींशीं करणारा. संसारांतील कोणचाही धर्म ज्याला लागत नाहीं तो. जो प्रत्यक्ष आणि अपरोक्ष ब्रह्म. तोच आत्मा. सर्वांच्या अंतर्यामी रहाणारा. सर्वांस पहाणारा, पण त्याला कोणी पाहूं शकत नाहीं.' सर्व कांहीं त्याला ऐकूं जातें पण श्रवणेंद्रियानीं त्याचें ज्ञान होत नाहीं. सर्वांच्या मनांतले विचार तो जाणतो, पण तो मनानें जाणला जात नाहीं. सर्वांचें ज्ञान त्याला आहे पण त्याचें ज्ञान. कोणाला नाहीं. तो ज्ञानरूप नेहमीं आहे. सर्वांच्या आंत भरलेला आहे, बाहेर आहे. विज्ञानाचा तो सांठाच आहे. आकाशाप्रमाणें' सर्वत्र भरलेला आहे. त्याच्या सामर्थ्याला पारावार नाहीं. तो सर्वांचा आत्मा आहे. त्याला भूक वगैरे बाधा नाहीं. प्रगट होणें किंवा गुप्त होणें ही त्याच्या ठिकाणीं नाहींत. त्याचें सामर्थ्य असें विलक्षण आहे कीं तो आपल्या निव्वळ सत्तारूप स्फुरणानें नामरूपाकार जग दाखवितो. -आत्म्याहून निराळें जग उत्पन्न होण्याला उपादान कारण, परंतु आत्म्याच्या आधारावर रहाणारें, त्याच्याहून निराळें असून त्याच्याच आधारावर असल्यामुळें शब्दांनीं ज्याचें वर्णन होत नाहीं असें, त्याचें ज्ञान होण्याला इतराचा उपयोग नाहीं, अशी जी प्रकट नसलेली नामरूपें त्यांना तो प्रकट करतो.

ते नामरूपे अव्याकृते सती व्याक्रियमाणे तस्मादेतस्मादात्मनः आकाशनामाकृती संवृत्ते ।

अर्थः–तीं प्रकट नसलेलीं नामरूपें ह्याप्रमाणें स्पष्ट दशेला आल्यानंतर ह्याच आत्म्यापासून आकाश हें नांव आणि त्याची आकृति झाली.

**तच्चाकाशाख्यं भूतमनेन प्रकारेण परमात्मनः संभूतं प्रसन्नादिव सलिलान्मलमिव फेनम् ।**

अर्थः—ह्याप्रमाणें त्या परमात्म्यापासून आकाश नांवाचें एक भूत उत्पन्न झालें. पाणी स्वच्छ असतां त्यापासून मळकट फेंस होतो त्याप्रमाणें हें झालें.

**न सलिलं नच सलिलादत्यन्तभिन्नं फेनम् सलिलव्यतिरेकेणादर्शनात् । सलिलंच स्वच्छं अन्यत् फेनान्मलरूपात्।**

अर्थः—फेंस कांहीं पाणी नव्हे. पण पाण्याहून अगदीं निराळी वस्तु फेंस आहे, असें ह्मणतां येत नाहीं, कारण पाण्याचें व फेंसाचें स्वरूप एकच आहे. पण पाण्याहून तो फेंस निराळा खरा. पहा बरें, पाणी स्वच्छ असतें, फेंस मळकट, ह्मणेरद्या वेगळा दिसतो नव्हे ?

**एवं परमात्मा नामरूपाभ्यामन्यः फेनस्थानीयाभ्यां शुद्धः प्रसन्नस्तद्विलक्षणः ।**

अर्थः—ह्याप्रमाणें, पाण्यांतल्या फेंसाच्या ठिकाणीं इकडे नाम आणि रूप घ्यावें, त्यांच्याहून परमात्मा निराळा, पवित्र, नेहमीं सुप्रसन्न, त्या नामरूपांहून मात्र निराळा आहे.

**ते नामरूपे अव्याकृते सती व्याक्रियमाणे फेनस्थानीये आकाशनामाकृती संवृत्ते ॥ १९ ॥**

अर्थ.—प्रथम प्रगट नसलेलें तें नाम आणि रूप प्रगट होतांच फेंसासारखें समजावें. त्याला प्रथम आकाश हें नांव आणि आकृति आली.

**ततोऽपि स्थूलभावमापद्यमाने नामरूपे व्याक्रियमाणे वायुभावमापद्येते, ततोऽप्यग्निभावं, अग्नेरब्भावं, ततः पृथ्वी-**

**भावं इत्येवं क्रमेण पूर्वपूर्वानुप्रवेशेन पञ्चमहाभूतानि पृथिव्यन्तान्युत्पन्नानि ।**

अर्थ —हीं नामरूपें त्यापुढें आणखी व्यक्त होता होतां त्याचें स्थूलरूप होतें, त्यामुळें त्याना वायुस्थिति येते, त्यापासून पुढें अग्नि, त्याच्यापासून पाणी, तेथून पृथ्वी, ह्या क्रमानें एकापासून दुसरें निघून पंचमहाभूतें, अखेर पृथ्वी, आकाराला आली.

ततः पञ्चमहाभूतगुणविशिष्टा पृथ्वी ।

त्यामुळें पृथ्वीच्या ठिकाणीं पाचही महाभूताचे गुण आले.

**पृथ्व्याश्च पञ्चात्मक्यो व्रीहियवाद्या ओषधयः जायंते ।**

अर्थ – पृथ्वीपासून व्रीहि, यव वगैरे धान्य वनस्पति निर्माण झाल्या. त्याच्यामध्येंही ते पचमहाभूताचे गुण उतरले.

**ताभ्यो भक्षिताभ्यो लोहितं शुक्रंच स्त्रीपुंसशरीरसंबन्धि जायते ।**

अर्थः–तीं खाल्यामुळें बायका आणि पुरुष याच्या शरीरात रक्त व रेत उत्पन्न होतात.

**तदुभयदृतुकाले अविद्यामयुक्तकामखजनिर्मथनोद्भूतं मंत्रसंस्कृत गर्भाशये निषिच्यते ।**

अर्थ – स्त्रीच्या ऋतुकालीं अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या कामवासनेनें दोघाची इच्छा झाली असता मत्राचा सस्कार झाल्यावर गर्भाशयात त्या दोन्हींचा ह्मणजे रेतरक्ताचा मिलाफ होतो.

**तत्स्वयोनिरसानुप्रवेशेन विवर्धमानं गर्भीभूतं नवमे दशमे वा मासि संजायते ॥ २० ॥**

अर्थः—त्या योनिमध्यें स्त्रीच्या जननेंद्रियातील पोषक रस

मिळतो आणि तो गर्भ वाढूं लागतो. पुढें नवव्या किंवा दहाव्या महिन्यांत तो जन्माला येतो.

तज्जातं लब्धनामाकृतिकं जातकर्मादिभिः मन्त्रसंस्कृतं पुनः उपनयनसंस्कारयोगेन ब्रह्मचारिसंज्ञं भवति ।

अर्थः—जन्मास येतांच त्याला नांव व आकार प्राप्त होतात. त्याचे जातकर्म वगैरे संस्कार होतात. मुंज लागली म्हणजे तोच ब्रह्मचारी बनतो.

तदेव वनस्थसंस्कारेण तापससंज्ञं भवति ।

अर्थः—त्यालाच वानप्रस्थाची दीक्षा दिली की तो तपस्वी झाला.

तदेव क्रियाविनिवृत्तिनिमित्तसंस्कारेण परिव्राट् संज्ञं भवति ।

अर्थः—त्यालाच सर्वकर्म परित्यागाचा उपदेश झाला की तो संन्यासी होतो

इत्येवं त्वत्तोभिन्नं भिन्नजात्यन्वयसंस्कारं शरीरं ॥ २१ ॥

सारांश असले हे नानाप्रकारचे संस्कार घडलेलें शरीर तुझ्याहून निराळें आहे. लक्षांत आलें ना!

मनश्चेंद्रियाणिच नामरूपात्मकानेव 'अन्नमयं हि सोम्य मनः' इत्यादि श्रुतिभ्यः ॥ २२ ॥

अर्थः—(आतां देहापेक्षां सूक्ष्म) मन आणि इंद्रियेंसुद्धां नामरूपाचाच प्रकार. ह्या म्हणण्याला आधार श्रुति 'बेटा मन हें अन्नमयच आहे' म्हणजे भूतपदार्थरूप आहे, तें आत्मा नव्हे.

कथं चाहं भिन्नजात्यन्वयसंस्कारवर्जितः इत्येतच्छृणु—

योऽसौ नामरूपयोर्व्याकर्ता नामरूपधर्मविलक्षणः स एव नामरूपे व्याकुर्वन् मृष्टेदं शरीरं स्वयं संस्कारधर्मवर्जितो

नामरूपे इह प्रविष्टः अन्यैरदृष्टः स्वयं पश्यन् तथाश्रुतः शृण्वन् अमतो मन्वानोऽविज्ञातो विजानन् ' सर्वाणिरूपाणि विचित्य धीरो नामानि कृत्वाभिवदन् यदाऽस्ते ' इति ।

अर्थः —मला जात, कुळ, संस्कार कसे लागत नाहीं. ' हा तुझा प्रश्न आहे त्याचें उत्तर ऐक. नाम आणि रूप ह्यांना प्रगट करणारा पण नामरूपाच्या धर्मांपासून अलिप्त रहाणारा जो आत्मा, त्यानेंच नामरूप प्रगट करण्याकरिता हें शरीर निर्माण केलें आणि संस्कार धर्मबाध आपल्याला न होऊं देता ह्या नामरूपात तो शिरला. तो सर्व पहातो पण कोणाला दिसत नाहीं, तो सर्व ऐकतो पण त्याचें ज्ञान श्रवणेंद्रियाला होत नाहीं. तो सगळ्याच्या विचाराचा प्रेरक आहे पण मनाला गोचर नाहीं, त्याला सर्वांचें ज्ञान आहे पण त्याची जाणीव कोणाला नाहीं. सर्व रूपावर आपली सत्ता गाजवून तो बुद्धिमान् आत्मा नावें देऊन तसें म्हणत रहातो.

अस्मिन्नर्थे श्रुतयः सहस्रशः—' तत्सृष्ट्वा । तदेवानुप्राविशत् ' ' अन्तः प्रविष्टः शास्ता जनानां ' ' स एष इह प्रविष्टः ' ' एष त आत्मा ' ' स एतमेवं सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत ' ' एष सर्वेषु भूतेषु गूढो ऽत्मा ' ' सेयं देवतैक्षत हन्ताहमिमास्तिस्रो देवता ' इत्याद्याः श्रुतयः ॥ २३ ॥

अर्थ—अशा अर्थाचीं हजारो श्रुतिवचनें आहेत. तें उत्पन्न करून त्यांत्च तो शिरला. तो सृष्टीमध्यें शिरून लोकांना योग्य मार्गाला लावतो. तोच हा आंत शिरतो. हाच तुझा आत्मा. तो ह्या कपाळाच्या चिरणीला फाडून ह्या [ ब्रह्मरंध्र ] ह्या मार्गानें आंत पोहोंचला सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं हा आत्मा गुप्तरूपानें असतो. हीच ती देवता हीच मी, हींच ह्या तिन्ही देवता. वगैरे श्रुतिवचनें आहेत.

स्मृतयोऽपि–आत्मैव देवताः सर्वाः, नवद्वारे पुरे देही, क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि, समः सर्वेषु भूतेषु, उपद्रष्टाऽनुमंताच, उत्तमः पुरुषस्त्वन्यः, अशरीरं शरीरेषु, इत्याद्याः।

तशीच स्मृतिवचनेंही आहेत–आत्मा हाच सार्‍या देवता. नऊदारें असलेल्या नगरांत रहाणारा. देह धारण करणारा. मीच क्षेत्रज्ञ असें जाण. मी सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं सारखा आहें. उपदेश देणारा व संमति देणारा, उत्तम पुरुष निराळाच आहे. शरीराहून निराळा असून ह्या शरीरांत असतो. वगैरे वचनें आहेत.

तस्मात् जात्यन्वयसंस्कारवर्जितः त्वमिति सिद्धम् ॥२४॥

अर्थः– तेव्हां; जात, कुल व संस्कार [ तुला चिकटत नाहींत ] त्यांना सोडून तूं निराळा आहेस, हें सिद्ध झालें.

.. स यदि ब्रूयात्–अन्य एवाहं अज्ञः सुखी दुःखी बद्धः संसारी, अन्योऽसौ मद्विलक्षणः असंसारी देवः तमहं बल्युपहारनमस्कारादिभिः वर्णाश्रमकर्मभिश्चाराध्य संसारसागरात् उत्तितीर्षुः अस्मि कथं अहं स एव इति ॥ २५ ॥

अर्थः–तो जर म्हणेलः–( छे छे हें काय मलतेंच ) मी निराळाच आहें. मला सुख दुःख भोगावें लागतें, मी संसारांत बद्ध होऊन पडलों आहे. तो परमात्मा निराळा आहे, माझ्याहून तो फार वेगळा, तो प्रकाश करणारा, त्याला संसाराचा संबंध नाहीं. त्यानें मजवर कृपा करावी म्हणून मी त्याला बळी देईन, नैवेद्य दाखवीन, नमस्कार घालीन, मी ज्या जातींत उत्पन्न झालों, माझा जो आश्रम असेल त्याप्रमाणें कर्में मी करीन, आणि त्या योगानें ह्या संसाररूपी समुद्रांतून तरून जाईन. तेव्हां मी तो कसा होईन?

आचार्यो ब्रूयात्—नैवं सोम्य प्रतिपत्तुमर्हसि, प्रतिषिद्धत्वात् भेदप्रतिपत्ते ।

अर्थ —गुरु–बेटा, अशी समजूत धरून बसूं नको. असा भेद मानूं नको, असें ( शास्त्रात ) सांगितलें आहे.

कथं प्रतिषिद्धा भेदप्रतिपत्तिरित्यत आह–' अन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद ' ' ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद ' ' मृत्योस्स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ' इत्येवमाद्याः ॥ २६ ॥

अर्थ —भेद धरू नये असें कोठें सांगितलें आहे म्हणशील तर या श्रुति पहा–तो निराळा, मी निराळा, असें म्हणतो त्याला ज्ञान झालें नाहीं आत्म्याहून ब्रह्म निराळें म्हणेल त्याला ब्रह्म समजलेंच नाहीं. या दृश्यसृष्टीमध्यें ( ज्याला सर्व एकरूप दिसत नाहीं ) सर्व वेगवेगळे रूपानें जो पहातो तो एका मृत्यूनंतर दुसऱ्या मृत्यूकडे जातो ( जन्ममरणाच्या फेऱ्यात पडतो ) अशीं आणखी वचनें आहेत.'

एता एव श्रुतय भेदप्रतिपत्तेः संसारगमन दर्शयंति॥२७॥

अर्थः—या वर सांगितलेल्या श्रुतिवचनांतील तात्पर्य असें आहे कीं जो असला भेदाचा प्रकार मानील त्याला संसारात पडावें लागेल.

अभेदप्रतिपत्तेश्च मोक्षं दर्शयंति सहस्रशः ।

अर्थः—त्याचें ऐक्य जो मानील त्याला मोक्ष मिळेल असें सांगणारीं श्रुतिवचनें हजारों आहेत.

' स आत्मा तत्त्वमसि ' इति परमात्मभावं विधाय ' आचार्यवान् पुरुषो वेद ' इत्युक्त्वा ' तस्य तावदेव चिरं ' इति मोक्षं दर्शयंति अभेदविज्ञानादेव ।

अर्थः—तो आत्मा तो तूंच आहेस. यात आत्मा आणि पर-

मात्मा ह्याचें ऐक्य सांगून, गुरूला शरण जाईल त्याला ज्ञान होई ल, असें बोलून, त्याला मग तें शाश्वत मिळेल; ह्या वचनावरून ऐक्यज्ञान होईल तरच मोक्ष मिळेल असें होतें.

सत्याभिसन्धस्यातस्करस्येव दाहाद्यभाववत् संसाराभावं दर्शयंति दृष्टांतेन । भेददर्शनादसत्याभिसन्धस्य संसारगमनं दर्शयंति तस्करस्येव दाहादिदृष्टांतेन ॥ २८ ॥

अर्थः—खरें बोलणारा आणि चोरी न करणारा जसा शिस्तचानें गाजत नाहीं, त्याप्रमाणें ह्या दृष्टांतावरून त्या ( ऐक्यबोध झालेल्या पुरुषा ) ला संसार लागत नाहीं असें श्रुतिवाक्यें सांगतात. त्याप्रमाणेंच खोटें भाषण करणाऱ्या चोराला जसा दाह होतो तेंमें भेद पहाणाराच्या गळ्यांत संसार पडतो, असें श्रुति सांगतात.

'त इह व्याघ्रो वा' इत्यादिना च अभेददर्शनात् 'सस्वराड्भवति' इत्युक्त्वा तद्विपरीतेन भेददर्शनेन संसारगमनं दर्शयंति ।

अर्थः—तोच ह्यावेळीं [ स्वप्नात ] वाघ होऊन भीति दाखवितो वगैरेवरून ऐक्य दिसतें, तोच स्वराट् होतो. त्याच्या उलट समजूत करून घेऊन जो आपल्याला भिन्न मानतो त्याला संसारांत पडावें लागतें.

'अथ येऽन्यथातो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति इति प्रतिशाखम् ।

अर्थः—जे कोणी त्याच्याहून त्याला भिन्न मानतात, ते आपल्या निराळ्या समजुतीमुळें नाश पावणाऱ्या लोकांमत जातात. त्याप्रमाणें पुष्कळ श्रुति आहेत.

तस्मात् गृहैवैवमवादीः ब्राह्मणपुत्रोऽदोऽन्वयः संसारी परमात्मविलक्षण इति ॥ २९ ॥

अर्थः—सारांश, मी ब्राह्मणाच्या पोटीं अमक्या कुळांत उत्पन्न झालों, हा संसार मला लागला आहे, मी परमात्म्याहून निराळा आहें असें जें तूं ह्मणालास तें खोटें ठरलें.

तस्मात् प्रतिषिद्धत्वाद्भेददर्शनस्य, भेदविषयत्वाच्च कर्मोपादानस्य, कर्मसाधनत्वाच्च यज्ञोपवीतादेः कर्मसाधनोपादानस्य परमात्माभेदप्रतिपत्त्या प्रतिषेधः कृतो वेदितव्यः कर्मणां तत्साधनानां च यज्ञोपवीतादीनां परमात्माभेदप्रतिपत्तिविरुद्धत्वात् ।

अर्थः—तेव्हां, भेद मानण्याबद्दल शास्त्रांनीं प्रतिषेध केला आहे, कर्म करण्याला मूळ भेद मानावा लागतो, आणि जानवें वगैरे हीं सर्व कर्म करण्याचीं साधनें आहेत; त्यावरून कर्म व त्यांचीं साधनें जानवें वगैरे हीं परमात्म्याचें ऐक्याचें ज्ञान करून देण्याला जर आड येतात तर परमात्म्याशीं ऐक्य होण्याकरितां कर्मे व त्यांचीं साधनें हीं सर्व सोडून देण्यास सांगितलें आहे असें समजावें.

संसारिणो हि कर्माणि विधीयन्ते तत्साधनानि च यज्ञोपवीतादीनि ।

अर्थः—(जाति वगैरेचा अभिमान धरणारे ) संसारी लोक कर्मे करतात व त्याकरितां त्यांचीं साधनें जीं जानवें वगैरे तीं त्यांना लागतात.

( न परमात्मनोऽभेददर्शिनः ) । भेददर्शनमात्रेण च ततोऽन्यत्वम् ॥ ३० ॥

अर्थः—( परमात्म्याशीं ऐक्य मानणाऱ्यांना त्या गोष्टी लागत

नाहींत. ) आपल्याहून परमात्मा निराळा असें मानूं लागताच निराळा प्रकार दिसू लागतो.

यदि कर्माणि कर्तव्यानि न निवर्तयिषितानि कर्मसाधनासंबंधिन कर्मनिमित्तजात्याश्रमाद्यसंबंधिनश्च, परमात्मनश्च आत्मनैवाभेदप्रतिपत्तिं नावक्ष्यत् ' स आत्मा तत्त्वमसि ' इत्येवमादिभिर्निश्चितरूपैर्वाक्यैः

अर्थः—कर्मसाधनाचा संबंध ज्यानीं ठेवला नाहीं, त्याप्रमाणेंच कर्मामुळेंच उत्पन्न झालेली जात, आश्रम वगैरेचाहि संबंध ज्यानीं सोडला, त्यांनीं कर्मेंच करावीं, तीं सोडून देऊं नये असें असतें तर तो आत्मा तूंच आहेस वगैरे निश्चय दाखविणारी वाक्यें सांगून आत्मा आणि परमात्मा यांचें ऐक्य शास्त्रांत सांगितलें नसतें.

भेदप्रतिपत्तिनिंदां च नाभ्यधास्यत् ' एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य ' ' अनन्वागतं पुण्येन अनन्वागतं पापेन ' " अत्र स्तेनोऽस्तेनः " इत्यादिना ॥ ११ ॥

अर्थः—त्याप्रमाणेंच हा ब्राह्मणाचा ( ब्रह्म जाणणाराचा ) मोठेपणा नेहमींचाच आहे, पुण्य मागाहून येत नाहीं, तसेंच पापही येत नाहीं, चोर तसा चोरी न करणाराहि, याप्रमाणें ही भेद मानणाऱ्याची निंदा केलेली आहे.

कर्मासंबंधि स्वरूपत्वं कर्मनिमित्तवर्णाद्यसंबंधरूपतां च नाभ्यधास्यत् कर्माणि च कर्मसाधनानि च यज्ञोपवीतादीनि यद्यपरित्याजयिषितानि ।

अर्थः—जर कर्में व कर्माला लागणारी साधनें-जानवें, वगैरे टाकावयाचीं नसतीं तर कर्माचा संबंध स्वरूपाला नाहीं आणि कर्मा-

ण्यासंबंधानें धरलेला वर्ण वगैरे ह्याचाही संबंध त्याला नाहीं, असें सांगितलें नसतें.

तस्मात्ससाधनं कर्म परित्यक्तव्यं मुमुक्षुणा, परमात्माभेदृदर्शनविरोधात् ।

अर्थः--ह्यासाठीं साधनासहित कर्मांचा त्याग मुमुक्षूनें करावयाचा आहे, कारण ( तसें नसतें तर ) परमात्म्याचें ऐक्य समजण्याला विरोध येईल.

आत्मा च पर इति प्रतिपत्तव्यो यथाश्रुत्युक्तलक्षणः॥१२॥

अर्थः--आत्मा हा ( स्वतः सगळ्यापेक्षां ) श्रेष्ठ आहे असें समजलें पाहिजे. त्याची लक्षणें श्रुतींमध्यें सांगितली आहेतच.

स यदि ब्रूयात्-भगवन् ! दह्यमाने छिद्यमाने वा देहे प्रत्यक्षवेदना अशनायादिनिमित्तं च प्रत्यक्षं दुःखं मम ।

अर्थः--तो म्हणेल-महाराज, या शरीराला कोलीत लावलें किंवा ( शस्त्रानें ) कापलें तर मला वेदना होतात, ह्या प्रत्यक्ष आहेत. खायला मिळालें नाहीं तर प्रत्यक्ष दुःख मला होतें.

परश्चायमात्माऽपहतपाप्मा विरजो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सर्वगंधरसवर्जितः श्रूयते सर्वश्रुतिषु स्मृतिषु च ।

अर्थः--हा आत्मा सर्वांहून श्रेष्ठ, ह्याला पाप नाहीं, हा रजोगुणाचा नाहीं, ह्याला मृत्यु नाहीं, शोक नाहीं, ह्याला खायला नको, तहान लागत नाहीं, सर्व रस आणि गंध ह्याची त्याला जरूर नाहीं असें सर्व श्रुतिस्मृतींत सांगितलें आहे.

कथं तद्विलक्षणः अनेकसंसारधर्मसंयुक्तः परमात्मानं आत्मत्वेन च मां संसारिणं परमात्मत्वेन अग्निमिव शीतत्वेन प्रतिपद्येयम् ।

अर्थः--मी त्याहून अगदी निराळा, सर्व संसारधर्मांत गुरफटलेला असा असून त्या परमात्म्याला आत्मा, किंवा संसारी मला परमात्मा कसा समजूं, विस्तवाला थंड म्हटल्याप्रमाणें हें होईल.

संसारीच सन् सर्वाभ्युदयनिःश्रेयससाधने अधिकृतः अभ्युदयनिःश्रेयससाधनानि कर्माणि तत्साधनानि च यज्ञोपवीतादीनि कथं परित्यजेयम् इति ॥ २३ ॥

अर्थः--मी तर संसारी असून सर्व प्रकारचें कल्याण व मोक्ष मिळण्याच्या साधनांचा अधिकार मला मिळाला आहे. तेव्हां कल्याण व मोक्ष ह्यांची साधनें जीं कर्में आणि त्या कर्माला लागणारीं जीं जानवें वगैरे उपकरणें ती सोडून कशीं देऊं.

तं प्रति ब्रूयात् यदवोचो दह्यमाने छिद्यमाने वा देहे प्रत्यक्षा वेदनोपलभ्यते ममेति, तदसत् । कस्मात् ।

अर्थः--तूं जें म्हणालास कीं देह जाळला किंवा तोडला तर प्रत्यक्ष वेदना मला होते, तें खरें नाहीं. कां म्हणशील !

दह्यमाने छिद्यमान इव वृक्षे उपलब्धुरुपलभ्यमाने कर्मणि शरीरे दाहच्छेदवेदनाया उपलभ्यमानत्वात् दाहादिसमानाश्रयैव वेदना ।

अर्थः--झाड जाळलें किंवा तोडलें तर त्याच्या ठिकाणीं विस्तव वगैरे असतो त्याप्रमाणें आपल्याला ह्या प्राप्त झालेल्या शरीराला जाळपोळ किंवा तोड झाली तर त्याचें होणारें दुःख शरीरावर दिसतें, ह्यावरून त्या जाळतोडीबरोबर दुःख रहातें असें झालें.

यत्रहि दाहः छेदो वा क्रियते तत्रैव व्यपदिशति दाहादिवेदनां लोकः, न वेदनां दाह्युपलब्धरीति ।

अर्थः--ज्याठिकाणीं जाळ किंवा तोड झाली असेल त्याठिका-

णावर त्याची वेदना लोक दाखवितात, ( पण ) ज्याला हा दाह वगैरे झाला त्याच्यावर ती वेदना कोणी दाखवीत नाहीं.

कथं ? क ते वेदनेति पृष्टः शिरसि मे वेदना उरसि उदरे इति वा यत्र दाहादिस्तत्रैव व्यपदिशति, नतूपलब्धरीति ।

अर्थ -तें कसें ? वेदना कोठें होते असें विचारलें तर डोक्यावर होते, छातीवर किंवा पोटावर ( सारांश ) जेथें जाळपोळ वगैरे असेल त्या ठिकाणावर दाखवितात, त्या वेदना होतो म्हणणाऱ्यावर कोणी ( संकेतानें ) दाखवीत नाहीं.

यद्युपलब्धरि वेदना स्यात् वेदनानिमित्तं वा दाहच्छेदादिवेदनाश्रयत्वेनोपदिश्येदाहाद्याश्रयवत् ॥ २४ ॥

अर्थ.-जर त्या ( पुरुषा ) च्या ठिकाणीं वेदना किंवा वेदना करणारी जाळपोळ वगैरे झाली असती तर जशी अमुक एक ठिकाणीं जाळपोळ वगैरे दाखविली जाते त्याप्रमाणें वेदनेचा आश्रयहि तो [ पुरुष ] दाखविला गेला असता.

स्वयं च नोपलभ्येत, चक्षुर्गतरूपवत् ।-

अर्थः-( बरें तसें असवें तरी ) ती स्वतः आत्म्याला दाखविता आली नसती. डोळ्यात पडलेलें ( प्रतिबिंब ) रूप डोळ्याला कधीं दिसतें का !

तस्मात् दाहच्छेदादिसमानाश्रयत्वेन उपलभ्यमानत्वात् दाहादिकर्मवत् कर्मभूतैव वेदना ।

अर्थः-ह्यावरून जाळपोळीबरोबरच एकाच ठिकाणीं वेदना दाखविली जाते. ह्यावरून जाळपोळ जसें एक कर्म आहे तशी वेदना ही कर्मच आहे. ( ती आत्म्याला होत नाहीं हें वर सांगितलेंच.

आतां शरीर हें अचेतन-जड त्याला वेदना होणें शक्य नाहीं. तेव्हा वेदनेला आश्रय नाहीं. )

भावरूपत्वाच्च साश्रया तण्डुलपाकवत् ।

अर्थ :—( तुम्ही म्हणाल की ) वेदना हें कार्य आहे; तेव्हां तिला आश्रय असलाच पाहिजे. तांदुळ आणि पेज दोन्ही एकत्रच भांड्यांत असतात त्याप्रमाणेंच ही असेल.

वेदनासमानाश्रय एव तत्संस्कारः स्मृतिसमानकाल एवो- पलभ्यमानत्वात् वेदनाविषयः तन्निमित्तविषयश्च द्वेषोऽपि संस्कारसमानाश्रय एव ।

अर्थः—वेदना ज्याठिकाणीं वाटते त्याठिकाणींच त्याचा संस्कार, त्याची खूण म्हाणे आणि आठवण झाल्याबरोबर ती लक्षांत येते. तसेंच वेदनेचा प्रकार, तिच्यापासून उत्पन्न झालेला द्वेष हे सर्व संस्काराच्या ठिकाणींच एका जागींच अनुभवास येतात.

तथा चोक्तम् ।

अर्थः—ह्याच अर्थाचें ( वृद्ध ) वचन आहे तें असें:—

रूपसंस्कारतुल्यार्थी रागद्वेषौ भयंच यत् ।

गृह्यते धीश्रयं तस्मात् ज्ञाता शुद्धोऽभयस्तदा ॥

अर्थः— ( तांबडा काळा वगैरे ) रंग व त्याची आठवण व त्या संबंधाची बुद्धि, तसेंच त्याबद्दल आवड व तिटकारा, त्या संबंधाची भीति ही सर्व ( उत्पन्न होतात व ) रहातात, तें ठिकाण बुद्धि हें होय. तेव्हां ( हें ) जाणणारा तो याहून निराळा आहे, त्याला कशाचीच भीति नाहीं.

क्रियाश्रयाः पुनः रूपादिसंस्कारादय इति ।

अर्थः—रंग वगैरे आठवणीला आश्रय कोणाचा ?

उच्यते यत्र कामादयः । क पुनस्ते कामादय ?

उत्तर--इच्छा वगैरेचा आश्रय तोच ह्याचा. पण इच्छा वगैरे ह्याचा आश्रय काय ?

'काम संकल्पो विचिकित्सा' इत्यादिश्रुतेः बुद्धावेव ।

अर्थः--बुद्धि. ह्याला आधार 'इच्छा' संकल्प, निवड वगैरे अशा अर्थाची श्रुतिवचनें आहेत.

तत्रैव रूपादिसंस्कारादयोऽपि, 'कस्मिन्नु रूपाणि प्रतिष्ठितानीति हृदये' इति श्रुतेः ।

अर्थः--त्याच आश्रयावर रूप वगैरे संस्कार रहातात. ह्यास प्रमाण, रूप कशाच्या आश्रयानें रहातें ? हृदयाच्या अशी श्रुति आहे.

'कामा येऽस्य हृदि श्रिताः' 'तीर्णो हि यदा सर्वान् शोकान् हृदयस्य' 'असङ्गो ह्ययं' 'तद्वा अस्यैतदतिच्छन्दाः' इत्यादि श्रुतिशतेभ्यः,

अर्थः--याच्या हृदयातील सर्व इच्छा; जेव्हा हृदयातील सर्व दुःखें जातील, ह्याला कशाचें बंधन नाहीं, तेंच ह्याचें रूप सर्व इच्छेच्या पलीकडे आहे, अशा शेकडों दुसऱ्या श्रुति आहेत त्यावरून, ( आणि )

'अविकार्योऽयमुच्यते' 'अनादित्वान्निर्गुणत्वात्'इत्यादि इच्छाद्वेषादि च क्षेत्रस्यैव विषयस्य धर्मो नात्मन इति स्मृतिभ्यश्च

अर्थः--हा अविकारी आहे, ह्याला आदि नाहीं व गुण नाहींत; वगैरे-इच्छा, द्वेष वगैरे क्षेत्र ( शरीर ) जें विषय त्याचे धर्म आहेत, आत्म्याचे नाहींत वगैरे स्मृतीवरून

कर्मस्थैवाशुद्धिः नात्मस्था ॥ ३६ ॥

अर्थः--दोष वगैरे सर्व त्या कर्मांच्या ठिकाणीं रहाणार, ते आत्म्याला लागत नाहीत.

अतो रूपादिसंस्काराद्यशुद्धिसंबंधाभावात् न परस्मादात्मनो विलक्षणत्वमिति प्रत्यक्षादिविरोधाभावात् युक्तं पर एवात्माऽहमिति प्रतिपत्तुम्,

अर्थः--ह्याकरतां, रूप वगैरेचे जे संस्कार इत्यादि त्यांच्यापासून होणारी जी अपवित्रता ती लागत नाहीं म्हणून; प्रत्यक्ष वगैरेचा विरोध येत नाहीं यावरून, सर्वांहून श्रेष्ठ जो परमात्मा त्याच्याहून तूं विलक्षण ( निराळ्या प्रकारचा ) नाहींस, ह्यावरून पर जो आत्मा तोच मी असें म्हटलें तर योग्यच झालें.

'तदात्मानमेवावेदहं ब्रह्मास्मि' 'एकधैवानुद्रष्टव्यम्' 'अहमेवाधस्तात्' 'आत्मैवाधस्तात्' 'सर्वमात्मानं पश्येत्' 'यत्र त्वस्य सर्वमात्मैव' 'इदं सर्वं यदयमात्मा' 'स एषोऽकलः' 'अनन्तरमबाह्यम्' 'सबाह्याभ्यंतरो ह्यजः' 'ब्रह्मैवेदम्' 'एतया द्वारा प्रापद्यत' 'प्रज्ञानस्य नामधेयानि' 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' 'तस्माद्वा' 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्'

अर्थ--तेव्हां आत्मा ओळखून मी ब्रह्मच झालों; सर्वत्र एकरूपानें पहावें; मीच बाकी शिल्लक; आत्माच शिल्लक; सर्वत्र आत्मा आहे असें पहावें; जें जें कांहीं यत्वें म्हणून आहे तें आत्माच; हें सर्व आत्माच; तोच हा प्राण वगैरे ( ज्या कला ) ह्यांचा संबंध नसलेला; सर्वांच्या आंत बाहेर भरलेला; हा जन्माला येत नाहीं; तो आंत बाहेर व्यापून आहे; हें सर्व ब्रह्म; ह्या द्वारानें तो आला; हीं

सर्व एका ज्ञानस्वरूपाचीं नावें आहेत; सत्य, ज्ञान, अनंत असें ब्रह्माचें रूप आहे; त्यापासून अथवा; तें उत्पन्न करून त्यांतच तो शिरला.

'एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी' अशरीरं शरीरेषु' 'न जायते म्रियते' 'स्वप्नान्तं जागरितान्तं' 'स म आत्मेति विद्यात्' 'यस्तु सर्वाणि भूतानि' 'तदेजति तन्नैजति' 'वेनस्तत्पश्यन्' 'तदेवाग्निः' 'अहं मनुरभवं सूर्यश्च' 'अन्तः प्रविष्टः शास्ता जनानां' 'तदेव सोम्य' 'तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि' इत्यादिश्रुतिभ्यः ॥ २७ ॥

अर्थ—सर्व भूतांच्या ठिकाणीं गुप्त असणारा व सर्व व्यापणारा एक देव; शरीरांत शिरला तरी त्याचा त्याला संबंध नाहीं; तो जन्माला येत नाहीं व मरतही नाहीं; स्वप्न, जागृति ह्या अवस्थांच्या पलीकडचा; तोच माझा आत्मा असें जाणावें; जो सर्व भूतांच्या ठिकाणीं आहे; तो वाढत नाहीं, कमी होत नाहीं; असें ज्ञान झालें असतां तो वेन क्षणांत ज्ञानी होतो; तोच अग्निरूप आहे; मी मनु झालों होतों, सूर्यहि झालों होतों, तो सर्व जनांत शिरून त्यांचें नियमन करतो; हे सोम्य तेंच तो, तेंच खरें; तोच आत्मा; तोच तूं वगैरे प्रश्नोपनिषत्, बृहदारण्यक, मुण्डक, ऐतरेय, श्वेताश्वतरीय, काठक, कौषीतकेय, ईशावास्य, याज्ञवल्क्य, तैत्तिरीय, छांदोग्य-इतक्या उपनिषदांतील वाक्यें आधाराकरितां दिलीं.

स्मृतिभ्यश्च 'पूः प्राणिनः सर्वगुहाशयस्य' 'आत्मैव देवताः' 'नवद्वारे पुरे' 'समं सर्वेषु भूतेषु' 'विद्याविनयसंपन्ने' 'अविभक्तं विभक्तेषु' 'वासुदेवस्सर्वम्' इत्यादिभ्यः

अर्थः—त्याचप्रमाणें स्मृतिवाक्यें, सर्वांच्या अंतर्यामी रहाणाऱ्याचीं हीं शरीरें; आत्मा हाच देवता, नऊ दारें असलेल्या नग-

रांत ( रहाणारा ); सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी एकसारखा; ज्ञानी असून नम्र पुरुषाला; निरनिराळ्या दिसणाऱ्या सर्वांत एक असणारा; आहे तें सर्व वासुदेवच, अशा वाक्यांवरून

एक एवात्मा परं ब्रह्म सर्वे संसारधर्मविनिर्मुक्तस्त्वमिति सिद्धम् ॥ ३८ ॥

अर्थः–आत्मा एकच आहे, तो श्रेष्ठ ब्रह्म आहे, व सर्व संसारधर्मांपासून अलिप्त असा तो तूंच आहेस हें सिद्ध झालें.

स यदि ब्रूयात्–यदि भगवन् अनन्तरः अबाह्यः सबाह्याभ्यन्तरो ह्यजः कृत्स्नः प्रज्ञानघन एव सैन्धवघनवदात्मा सर्वमूर्तिभेदवर्जितः आकाशवदेकरसः किमिदं दृश्यते श्रूयते वा साध्यं साधनं वा साधकश्चेति श्रुतिस्मृतिलोकप्रसिद्धं वादिशतविप्रतिपत्तिविषय इति ॥ ३९ ॥

अर्थः–जर तो म्हणेलः–महाराज, जर सर्व परिपूर्ण, अंतर्गत, आंत बाहेर भरलेला, जन्मरहित, संपूर्ण, ज्ञानाचा सांठा, मिठाच्या सांठ्याप्रमाणें सर्व एकरूप, नानाप्रकारच्या रूपांचा भेद नसलेला, आकाशाप्रमाणें सर्वत्र सारखा, असा आत्मा आहे, मग श्रुतिस्मृतिमध्यें त्याच्याविषयीं इतका खटाटोप, शेंकडों वादविवाद करणाऱ्या लोकांच्या तोंडीं असलेला भाषणाचा विषय तो कां झाला ? त्याप्रमाणें साध्य, साधन, आणि साधक असे तीन भेद ( या जगतांत ) दिसतात व ( स्वर्गलोकाबद्दल ) सांगतात, हें कसें ?

आचार्यो ब्रूयात् अविद्याकृतमेतत् यदिदं दृश्यते श्रूयते वा।

गुरु म्हणतात—हें जसें दिसतें किंवा लोक सांगतात, तें सर्व अज्ञानाचा परिणाम.

परमार्थतस्त्वेक एवात्मा अविद्यादृष्टेः अनेकवत् आभासते, तिमिरदृष्ट्या अनेकचंद्रवत्।

अर्थः—डोळ्याला कांहीं विकार झाला म्हणजे चंद्र एक असून पुष्कळ चंद्र आहेत असें दिसतें, त्याप्रमाणें वास्तविक एक आत्मा असून अज्ञान्याच्या दृष्टीला तो अनेक वाटतो.

'यत्र वा अन्यदिव स्यात्' 'यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति'

अर्थः—ज्याच्या ठिकाणी दुसरा असल्यासारखें वाटतें, त्याच्याच ठिकाणी द्वैत असल्यासारखें वाटतें, त्याच्याहून निराळें मानल्यावर मग इंद्रियें वगैरे यांनी निराळेपणा दिसतो.

'मृत्योस्स मृत्युमाप्नोति' 'अथ यत्रान्यत्पश्यति अन्यच्छृणोति अन्यद्विजानाति तदल्पम्' 'अथ यदल्पं तन्मर्त्यम्', 'वाचारंभणं विकारो नामधेयं' 'अनृतम् अन्योऽसावन्योऽहम्' इति भेददर्शननिंदोपपत्तेरविद्याकृतं द्वैतम्'

अर्थः—तो ( भेद पाहणारा ) एका मृत्युपासून दुसऱ्या मृत्यूला जातो ( जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो ), त्याच्याशिवाय दुसरें पाहील, ऐकेल, ओळखील तें सर्व थोडें ( समजावें ), थोडें म्हणजेच नाशवंत; विकार म्हणजे तें बोलून न दाखविता येणारें म्हणून खोटें, तो निराळा मी निराळा असें बोलणें तें खोटें; ह्याप्रमाणें भेद पहाणाऱ्याची निंदा केली असल्यामुळें द्वैत वाटतें तें अज्ञानानें असें समजावें.

'एकमेवाद्वितीयम्' 'यत्र त्वस्य' 'को मोहः कः शोकः' इत्यादि एकत्वविधिश्रुतिभ्यश्चेति ॥ ४० ॥

अर्थः—तसेंच; तें एक आहे, त्याच्या जोडीला दुसरें नाहीं;

जेथें त्याच्याशिवाय कांहीं नाहीं. 'मग मोह कशाला व शोक कशाचा' वगैरे श्रुतिवचनांत ऐक्यप्रतिपादन केलें आहे.

यद्येवं, भगवन् किमर्थं श्रुत्या साध्यसाधनादिभेद उच्यते उत्पत्तिः प्रलयश्चेति ॥ ४१ ॥

अर्थः--शिष्यः--महाराज, हें जर खरें तर श्रुतिमध्यें साध्य साधन वगैरे ( कर्मकाण्ड ) सांगितलें कशाला? तसेंच उत्पत्ति व प्रलय हें ( ज्ञानकाण्ड ) तरी कशाला लिहिलें?

अत्रोच्यते-अविद्यावतः उपात्तशरीरादिभेदस्य इष्टानिष्टयोगिनमात्मानं मन्यमानस्य साधनैरेव इष्टानिष्टप्राप्तिपरिहारोपायविवेकं अजानतः इष्टप्राप्तिं चानिष्टपरिहारं चेच्छतः शनैस्तद्विषयमज्ञानं निवर्तयितुं शास्त्रं न साध्यसाधनादिभेदं विधत्ते, अनिष्टरूपः संसारो हि सः इति।

गुरुः-अज्ञानाच्या योगानें शरीर वगैरे भेद मानणाऱ्याला आणि आवडीची अमुक गोष्ट, नावडीची अमुक असें बोलणाऱ्याला, आवडणारी वस्तु कशी कोणच्या साधनांनीं मिळवावी व नावडती वस्तु कशी घालवावी,ह्याबद्दल माहिती नसते आणि त्याच्या मनांत तर आवडती वस्तु पाहिजे, नावडती नको असें असतें; तेव्हां त्याचें तें अज्ञान हळू हळू घालविण्याकरितां शास्त्र आहे.तें साध्य साधन असा भेद सांगत नाहीं. कारण हा संसार म्हणजे अत्यंत वाईट आहे.

तद्भेददृष्टिमेवाविद्यां संसारमूलमुन्मूलयति उत्पत्तिप्रलयाद्येकत्वोपपत्तिप्रदर्शनेन ॥ ४२ ॥

अर्थः-अज्ञानामुळें होणारा हा संसार, त्याचें मूळ जो भेदभाव तो नाहींसा करण्याकरितां उत्पत्ति, प्रलय वगैरे सांगून सर्व एकच आहे असें ( शास्त्रानें ) स्थापित केलें आहे.

अविद्यायामुन्मूलितायां श्रुतिस्मृतिन्यायेभ्यः अनन्तरम-बाह्यं सबाह्याभ्यन्तरो ह्यजः सैन्धवघनवत्प्रज्ञानघन एवैक आत्मा आकाशपरिपूर्ण इत्यैव एका प्रज्ञा प्रतिष्ठा परमार्थ-दर्शिनो भवति ।

अर्थः–श्रुतिस्मृतिमधील वचनांच्या विचारानें अज्ञान मुळासकट गेलें असतां, हा आत्मा सगळीकडे, आंत बाहेर, जन्मरहित, सैन्धवा-सारखा एकसारखा ज्ञानरूप, असा एकच आत्मा, आकाशाप्रमाणें पूर्ण आहे अशी एकनिष्ठ बुद्धि त्या तत्त्वज्ञ पुरुषाची होते.

न साध्यसाधनोत्पत्तिमलयादिभेदेन अशुद्धिगंधोप्यु-पपद्यते ॥ ४३ ॥

अर्थः—हें साध्य, हीं त्याची साधनें, किंवा प्रलय आणि उत्पत्ति वगैरे नानाप्रकार पाहून त्या [ तत्त्वज्ञा ] च्या ठिकाणीं अपवित्रतेचा [ संशयाचा ] थोडासुद्धां अंश रहात नाहीं.

तदेतत् परमार्थदर्शनं प्रतिपत्तुमिच्छता वर्णाश्रमाद्यभिमान-कृतपाङ्क्तरूपपुत्रवित्तलोकैषणादिभ्यो व्युत्थानं कर्तव्यम्, सम्यक्प्रत्ययविरोधात्तदभिमानस्य ।

अर्थः—तें हें तत्त्वज्ञान समजावें अशी ज्याला इच्छा होईल, त्यानें जात, आश्रम वगैरे अभिमान धरल्यामुळें उत्पन्न झालेल्या पांच प्रकारच्या आशा ह्मणजे मुलगा, द्रव्य, प्रतिष्ठा, वगैरे त्या सर्व सोडून निराळें व्हावें. त्याचा अभिमान धरून राहिल्यास तो खरें ज्ञान होऊं देणार नाहीं.

भेददर्शनमतिषेधार्थोपपत्तिश्चोपपद्यते ।

अर्थः–आत्मा निराळा आहे असें मानूं नये असा निषेध कां केला तेंही आतां नीट समजलें असेलच.

न ह्येकस्मिन्नात्मनि असंसारित्वबुद्धौ शास्त्रन्यायोत्पादितायां तद्विपरीता बुद्धिर्भवति ।

अर्थः—शास्त्रांतील आधारावरून आत्मा संसारी नाहीं अशी बुद्धि उत्पन्न झाल्यावर त्याच आत्म्याच्या ठिकाणीं ह्याच्या उलट बुद्धि होणार नाहीं.

न ह्यग्नौ शीतत्वबुद्धिः शरीरे वा अजरामरणबुद्धिः ।

अर्थः—उदाहरणार्थ, विस्तवाच्या ठिकाणीं थंडाईचा अनुभव, तसा ह्या देहाच्या ठिकाणीं म्हातारपण, मरण नाहीं असा अनुभव संभवेल कसा ?

तस्मात् अविद्याकार्यत्वात् सर्वकर्मणां तत्साधनानां च यज्ञोपवीतादीनां परमार्थदर्शननिष्ठेन त्यागः कर्तव्यः ।

अर्थः—तेव्हां सर्व कर्म व त्यांचीं साधनें जानवें वगैरे हीं सर्व अज्ञानाचीं कार्ये असल्यामुळें मोक्षप्राप्ति व्हावी अशी दृढ बुद्धि झालेल्या मनुष्यानें त्या सर्वांचा त्यागच केला पाहिजे.

इति शिष्यप्रतिबोधनविधिः ।

अर्थः—येथें शिष्याला जागा करण्याचें प्रकरण संपलें.

---

सुखमासीनं ब्राह्मणं ब्रह्मनिष्ठं कश्चित् ब्रह्मचारी जन्ममरणलक्षणात् संसारात् निर्विण्णो मुमुक्षुः विधिवदुपसन्नः पप्रच्छ।

अर्थः—कोणी एक ब्रह्मज्ञान झालेला ब्राह्मण आनंदामध्यें असता त्याच्याकडे ह्या जन्ममृत्युरूप संसाराला कंटाळून ह्यापासून मी कसा सुटेन असें चिंतन करणारा कोणी एक ब्रह्मचारी, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें शरण येऊन विचारता झाला.

भगवन् कथमहं संसारान्मोक्षिष्ये शरीरेंद्रियविषयवेदनावान् ।

अर्थः–महाराज, हें शरीर, हीं इंद्रियें, हे विषय ह्या-सर्वांपासून दुःख मला होत आहे, मी ह्या संसाराच्या फेऱ्यांतून कसा सुटेन ?

जागरिते दुःखमनुभवामि तथा स्वप्ने अनुभवामि च पुनः पुनः सुषुप्तिप्रतिपत्त्या विश्रम्य विश्रम्य ।

अर्थः—जागा असताना मला दुःख होतें, स्वप्नांतही तेच अनुभव आहे, ( फक्त ) गाढ झोंप लागली ह्मणजे तेवढी विश्रांति मिळते.

किमयमेव मे स्वभावः ? किंवा अन्यस्वभावस्य सतो नैमित्तिकः इति ।

अर्थः–हा असा माझा स्वभावच आहे किंवा दुसरा स्वभाव असून त्याला हें वर निमित्त उसनें आलें आहे ?

यदि स्वभावः न मे मोक्षाशा, स्वभावस्यावर्जनीयत्वात् ।

अर्थः–जर स्वभावच असेल, तर तो बदलणें शक्य नाहीं, मग मला मोक्ष मिळण्याची आशा करायला नको.

अथ निमित्तिकः, निमित्तपरिहारे स्यान्मोक्षोपपत्तिः ॥४५॥

अर्थः—उसना आलेला असला तर निमित्त घालविल्यावर मोक्ष मिळणेंचा संभव आहे.

तं गुरुरुवाच–शृणु वत्स! न तवायं स्वभावः, नैमित्तिकः ४६

गुरु ह्मणतातः–बाळ ऐक, हा तुझा स्वभाव नव्हे. हें उसनें आलेलें आहे.

इति उक्तः शिष्य उवाच–किं निमित्तं ? किं वा तस्य निवर्तकं, को वा मम स्वभावः ? यस्मिन्निमित्ते-निवर्तिते नैमि-

त्तिकाभावः रोगनिमित्तनिवृत्ताविव रोगी स्वभावं प्रपद्येयेति ॥ ४७ ॥

अर्थः—तेव्हां शिष्यः—हें काय आलें आहे? तें जाईल कशानें, माझा स्वभाव [ स्वरूप ] काय? हें उसनें आलेलें गेलें ह्मणजे त्याच्यापासून झालेल्या गोष्टीहि जातील, रोग नाहींसा झाला ह्मणजे रोग्याचें पहिलें रूप येतें त्याप्रमाणें होईल. नव्हे काय?

गुरुरुवाच—अविद्यानिमित्तं, विद्या तस्य निवर्तिका।

गुरुः—अज्ञान हें निमित्त, तें ज्ञानानें जाईल.

अविद्यायां निवृत्तायां तन्निमित्ताभावात् मोक्ष्यसे जन्ममरणलक्षणात् संसारात् ।स्वमजाग्रदुःखं नानुभविष्यसीति४८

अर्थः—अज्ञान गेल्यावर त्याचें सर्व कार्य नाहींसें होईल आणि जन्ममृत्युरूपी संसारांतून सुटशील. त्याप्रमाणेंच जागेपणीं आणि स्वप्नांत जें दुःख होतें तें होणार नाहीं.

शिष्य उवाच—का सा अविद्या? किं विषया वा? विद्या च का अविद्यानिवर्तिका यथा स्वभावं प्रतिपद्येयेति ॥ ४९ ॥

शिष्यः—तें अज्ञान काय? तें रहातें कशावर! ज्ञानानें अज्ञान जाऊन कसा मूळस्वभाव मिळणार?

गुरुरुवाच—त्वं परमात्मानं संतं असंसारिणं संसार्यहमस्मीति विपरीतं प्रतिपद्यसे अकर्तारं संतं कर्तारं, अभोक्तारं संतं भोक्तारं, विद्यमानं चाविद्यमानमिति इयमविद्या ॥५०॥

अर्थः—परमात्मा संसारी नसून आहे असें ह्मणत आहेस, तो कांहीं करीत नसून त्याला कर्ता ह्मणतोस, उपभोग घेत नसून उपभोग घेतो ह्मणतोस, तो नेहमीं असून नाहींसा होणार ह्मणतोस, अशी जी तुझी उलट समज होते, हिलाच अज्ञान ह्मणावयाचें.

शिष्य उवाच—यद्यप्यहं विद्यमानः, तथापि न परमात्मा । कर्तृत्वभोक्तृत्वलक्षणः संसारो मम स्वभावः, प्रत्यक्षादिभिः प्रमाणाभिः अनुभूयमानत्वात् ।

शिष्यः— (बरें तर) मी जर सदा आहें असें धरलें तरी (तेवढ्यानें) मी परमात्मा [ होत ] नाहीं. कर्में मी करतों, त्यांचीं फलें भोगतों, ह्याप्रमाणें संसार करणें हा माझा स्वभाव आहे, हें प्रत्यक्षप्रमाणावरून अनुभवाला येत आहे.

न अविद्यानिमित्तः अविद्यायाः स्वात्मविषयानुपपत्तेः ।

अर्थः—हा स्वभाव अज्ञानानें झालेला नाहीं. अज्ञान आत्म्याच्या ठिकाणीं विषय होऊं शकत नाहीं.

अविद्या नाम अन्यस्मिन् अन्यधर्माध्यारोपणा, यथा प्रसिद्धं रजतं प्रसिद्धे शुक्तिकायां, यथा प्रसिद्धं पुरुषं स्थाणौ अध्यारोपयति, प्रसिद्धं वा स्थाणुं पुरुषे, नाप्रसिद्धं प्रसिद्धे, प्रसिद्धं चाप्रसिद्धे ।

अर्थः—अज्ञान म्हणजे एका पदार्थाचे धर्म दुसऱ्याच्या ठिकाणीं समजणें हें होय. उदाहरणार्थ—रुपें काय हें ठाऊक आहे, शिंप माहीत आहे म्हणून शिंपीवर रुप्याचा भास होतो, तसेंच ठाऊक असलेल्या माणसाचा खांबाच्या ठिकाणीं भास होतो अथवा माहीत असलेला खांब माणसाच्या ऐवजीं दिसतो. तेव्हां [ दोन्ही पदार्थ माहीत असावे लागतात. ] माहीत नसलेला पदार्थ माहीत असलेल्याच्या ठिकाणीं किंवा माहीत असलेली वस्तु माहीत नसलेल्याच्या ठिकाणीं भासत नाहीं.

नच आत्मनि अनात्मानं अध्यारोपयति आत्मनः अप्र-

सिद्धत्वात्; तथा आत्मानं अनात्मनि, आत्मनो अप्रसिद्धत्वादेव ॥ ५१ ॥

अर्थः-तेव्हां आत्म्याच्या ठिकाणी, आत्म्याहून इतर वस्तूचा भास होणें नाहीं, कारण आत्मा काय आहे ठाऊक नाहीं; त्याप्रमाणेंच आत्म्याहून इतर वस्तूच्या ठिकाणी आत्म्याचा भास होणें नाहीं, ह्यालाही कारण आत्म्याचें माहीत नसणेंच होय.

तं गुरुरुवाच–न व्यभिचारात् ! न हि वत्स ! प्रसिद्धं प्रसिद्ध एव अध्यारोपयतीति नियंतुं शक्यं,आत्मनि अध्यारोपणदर्शनात्, गौरोऽहं कृष्णोऽहं इति देहधर्मस्य अहंप्रत्ययविषये आत्मनि, अहंप्रत्ययविषयस्य च आत्मनः देहे अयं अस्मीति ॥ ५२ ॥

गुरुः—असें नाहीं, कारण तुझा नियम लागूं पडत नाहीं. बाळ, एकाचा अध्यारोप- ( भास ) दुसऱ्यावर होण्याला दोन्ही पदार्थ ठाऊक असलेच पाहिजेत असा नियम दिसत नाहीं. आत्मा हा [ ठाऊक नसून ] त्याच्या ठिकाणीं असा भास होतो-ना ! मी गोरा, मी काळा असें ह्मणतोस तेव्हां देहाचा काळा, गोरा रंग [ धर्म ] अहं शब्दानें दाखविल्या जाणाऱ्या आत्म्यावर लावला असें होतें. त्याप्रमाणेंच हा अहं शब्दानें दाखविला जाणारा आत्मा [ त्याचा धर्म ] हा मी ह्मणून देहावर लावला गेला असें दिसतें.

शिष्य आह–प्रसिद्ध एव तर्ह्यात्मा अहं प्रत्ययविषयतया, देहश्च अयं इति

शिष्यः—तर मग ( आपल्या बोलण्यावरूनच हें ठरलें कीं )

अहं शब्दानें बोध होणारा आत्मा आणि हा देह असा दाखविला जाणारा जो देह तो ( असे दोन्ही ) माहितींचे ठरले.

**तत्रैवं सति, प्रसिद्धयोः एव देहात्मनोः इतरेतराध्यारोपणात् स्थाणुपुरुषयोः शुक्तिकारजतयोरिव,**

अर्थः— असें असल्यावर ओळखीचे असलेले जे दोन्ही देह आणि आत्मा ह्यांचा एकमेकांवर भास होतो, तो आतां जुळला, तो खांब आणि मनुष्य किंवा शिंपी आणि रुपें ह्यांच्या उदाहरणाप्रमाणें जमला.

**तत्र कं विशेषमाश्रित्य भगवतोक्तं प्रसिद्धयोरितरेतराध्यारोपणेति नियंतुं न शक्यते इति ॥ ५२ ॥**

अर्थः–मग महाराज आपण जे ( मघाशीं ) ह्मणालात कीं, अध्यारोपण ( भास ) होण्याला दोन्ही वस्तु प्रसिद्ध पाहिजेत असा नियम धरतां येत नाहीं, त्या ह्मणण्याला आधार काय ?

**गुरुराह--शृणु, सत्यं प्रसिद्धौ देहात्मानौ । न तु स्थाणुपुरुषाविव विविक्तप्रत्ययविषयतया सर्वलोकप्रसिद्धौ ।**

गुरुः–ऐक. देह आणि आत्मा दोन्ही प्रसिद्ध आहेत, हें (-एका अर्थी ) खरें, परंतु खांब आणि मनुष्य ह्या वस्तु जशा स्पष्टपणें दाखवितां येतात तसे सर्व लोकांस माहीत झालेले हे दोन्ही ( देह आणि आत्मा ) नाहींत.

**कथं तर्हि ? नित्यमेव निरंतराविविक्तप्रत्ययविषयतया ।**

अर्थः–मग त्यांची ओळख ( जाणीव ) कोणच्या प्रकारची असते ? ती शब्दांनी तितक्या स्पष्टपणानें केव्हांच दाखवितां येत नाहीं.

**न हि अयं देहः अयं आत्मा, इति विविक्ताभ्यां प्रत्ययाभ्यां देहात्मानौ गृह्णाति यः कश्चित् ।**

अर्थः—हा देह, हा आत्मा अशी स्पष्ट खूण दाखवितां येत नाहीं, आणि तशा प्रकारानें वाटेल त्याला ते ओळखतांहि नाहींत.

**अत एव हि मोमुह्यते लोकः आत्मानात्मविषये एवमात्मा नैवमात्मा इति ।**

अर्थः–त्यामुळें हा आत्मा आणि हा आत्म्याहून निराळा असा भेद करतां येत नाहीं आणि त्या कारणानें आत्मा आहे कोणचा आणि नाहीं कोणचा ह्या संबधानें लोक मोहांत पडतात.

**एवं विशेषं आश्रित्य अवोचं नैव नियंतुं शक्यमिति ॥५४**

अर्थः–तूं सांगितलास तसा नियम सगळीकडे चालणार नाहीं असें जें मीं म्हटलें त्याचें कारण हें.

**ननु अविद्या अध्यारोपितं यत्र यत् तदसत् तत्र दृष्टं, यथा रजतं शुक्तिकायां, स्थाणौ पुरुषः, रज्ज्वां सर्पः, आकाशे तलमलिनत्वं इति ।**

अर्थः—आतां अज्ञानामुळें जें कांहीं ज्या [ दुसऱ्या पदार्थी ] त्यावर भासतें, त्याठिकाणीं तें नसतें, ही अनुभवाची गोष्ट आहे. उदाहरणार्थ, शिंपीवर दिसलेलें रुपें, खांबावर वाटलेला मनुष्य ( भूत ), दोरीबद्दल भासलेला साप, आकाशाच्या ठिकाणीं मानलेला निळा रंग. ( हें सर्व खोटें )

**तथा देहात्मनोरपि नित्यमेव निरंतराविविक्तप्रत्ययेन इतरेतराध्यारोपणा कृता स्यात् ।**

अर्थः—त्याप्रमाणें देह आणि आत्मा ह्यांचा कधींच स्पष्ट अनुभव

येत नसल्यामुळें त्यांचा एकमेकांच्यावरील भास कायमचाच असेल ( ही शिष्याची शंका ).

तत् इतरेतरयोः नित्यमेव असत्वं स्यात् ।

अर्थः—आणि त्यामुळें एकमेकांच्या दृष्टीनें एकमेक ( सारांश दोन्ही ) खोटेच होणार.

यथा शुक्तिकादिषु अविद्याध्यारोपितानां रजतादीनां नित्यमेव अत्यन्तासत्त्वं, तद्विपरीतानां विपरीतेषु, तद्वत् देहात्मनोः अविद्ययैव इतरेतराध्यारोपणा कृता स्यात् ।

अर्थः—ज्याप्रमाणें शिंपी वगैरेच्या ठिकाणीं अज्ञानामुळें भासलेलें रुपें वगैरे कधींच बिलकूल खरें असत नाहीं, किंवा त्याच्या उलट ( रुप्याच्या ठिकाणीं वाटलेली शिंप ) ही तसेंच; त्याप्रमाणें अज्ञानामुळें देह आणि आत्मा ह्यांचा एकमेकावर अध्यास असेल.

तत्र एवं सति देहात्मनोः असत्त्वं प्रसज्येत ।

अर्थः—असें झाल्यास देह आणि आत्मा दोघांकडे खोटेपण आलें.

तच्च अनिष्टं वैनाशिकपक्षत्वात् ।

अर्थः—त्यापासून मुळींच सिद्धान्ताचा नाश होतो ( आत्मा खोटा ठरतो ) तेव्हां हें अनुमान करणें चांगलें नाहीं.

अथ तद्विपर्ययेण देहः आत्मनि अविद्यया अध्यारोपितः देहस्य आत्मनि सति असत्त्वं प्रसज्येत तच्चानिष्टं प्रत्यक्षादिविरोधात् ।

अर्थः—आतां त्यापैकीं देहापुरतें अनुमान घेतलें तर आणि ( असें मानलें कीं ) आत्म्यावर देहाचा भास अज्ञानानें झाला तर आत्म्यावर भासलेला देह खोटा ठरेल. तेव्हां हेंही बरोबर नाहीं; कारण देह तर प्रत्यक्ष दिसतो त्याला विरोध येईल.

तस्मात् देहात्मानौ न अविद्यया इतरेतरस्मिन् अध्या॰
रोपितौ ।

अर्थः—तेव्हां ( असें धरावें कीं ) देह आणि आत्मा ह्यांचा एकमेकांवर होणारा भास अज्ञानानें होत नाहीं.

कथं तर्हि ? वंशस्तंभवत् नित्यसंयुक्तौ ॥ ५१ ॥

अर्थः—तर मग ह्यांचा संबंध कसा झाला ? ( ह्याला असें मानावें कीं ) खांब आणि वेळू ह्यांची कायमची जोड ( होऊन असें घर ) होतें तसा देह आणि आत्मा यांचा संबंध काय॰मचा आहे.

न, अनित्यत्वपरार्थत्वप्रसंगात् । संहतत्वात् परार्थत्वं अनित्यत्वं च वंशस्तंभादिवदेव ।

अर्थः—असें नाहीं. [ असें असतें तर ] आत्मा नाशवंत आणि दुसऱ्यावर अवलंबून आहे असें होईल. कारण वेळू आणि खांब यांची जोड जशी असते तसा जर ( देह आणि आत्मा यांचा ) संघात असला तर तो आत्मा परावलंबी व नाशवंत ठरेल.

किंच-यस्तु परैः देहेन संहतः कल्पितः आत्मा स संहत॰त्वात् परार्थः । तेन असंहतः परो अन्यो नित्यः सिद्धः तावत् ॥ ५२ ॥

अर्थः—शिवाय जो आत्मा देहाच्या बरोबर जोडलेला आहे असें तुम्ही ठरविलें तो त्या संघातामुळें परावलंबी झाला यावरू॰नच त्याच्याशीं [ म्ह. देहाशीं ] न जोडलेला व त्याहून निराळा जो आत्मा तो अविनाशी आहे असें सिद्ध झालें.

तस्यासंहतस्य देहे देहभावनया अध्यारोपितत्वेन अस॰

त्वानित्यत्वादिदोषप्रसंगो भवति । तत्र निरात्मको देह इति वैनाशिकपक्षप्राप्तिदोषः स्यात् ॥ ५७ ॥

अर्थः—तो देहाशीं [ संहत नसलेला ह्म० ] न जोडलेला [ आत्मा ] केवळ देह, ह्मणूनच देहावर त्याचा भास मानला तर [ भास ज्याचा होतो तें खोटें या नियमाप्रमाणें ] तो खोटा, नाशवंत वगैरे दोष येऊं लागतील; मग आत्म्यावांचून देह [ आणि देहावांचून आत्मा ] असा मूळसिद्धांत चुकीचा [ होऊन कांहींच नाहीं असा शून्यवाद उत्पन्न ] होईल.

नं, स्वतः एव आत्मनः आकाशस्येव असंहतत्वाभ्युपगमात् ।

अर्थः—असें नाहीं. आकाश जसें कशालाही जडलेलें नाहीं, त्याप्रमाणेंच स्वतः आत्मा कशालाही जोडलेला नाहीं.

सर्वेणासंहतः सच आत्मेति न निरात्मको देहादिसर्वः स्यात् । यथा चाकाशं सर्वेणासंहतमिति सर्वं न निराकाशं भवति, एवम् । तस्मान्न वैनाशिकपक्षप्राप्तिदोषः स्यात् ॥५८॥

अर्थः—आत्मा कशालाही धरून नाहीं, येवढ्यावरून आत्म्या-शिवाय देह आहे असें मात्र होत नाहीं आकाश कशालाही चिकटलेलें नाहीं यावरून आकाशावांचून सर्व वस्तू आहेत असें होत नाहीं, त्याप्रमाणेंच देहाची गोष्ट. तेव्हां ह्यावरून शून्य-वादाचा दोष येत नाहीं.

यत्पुनरुक्तं—देहस्यात्मन्यसत्त्वे प्रत्यक्षादिविरोधः स्यात इति, तन्न, प्रत्यक्षादिभिः आत्मनि देहस्यसत्त्वानुपलब्धेः ।

अर्थः—तूं आणखी ह्मणाला होतास कीं आत्म्याच्या ठिकाणीं देह खोटा मानला तर प्रत्यक्ष दिसतें त्याच्या उलट ह्मटल्याप्रमाणे ही

गोष्ट होईल. तर तेंही बरोबर नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं देहाचें अस्तित्व हें प्रत्यक्ष प्रमाणानें सांपडणार नाहीं.

न ह्यात्मनि–कुण्डे बदरं, क्षीरे सर्पिः, तिले तैलं, भित्तौ चित्र-मिवच–प्रत्यक्षादिभिः देहः उपलभ्यते । तस्मान्न प्रत्यक्षादि-विरोधः ॥ ५९ ॥

अर्थः–भांड्यांत ठेवलेलें बोर, दुधांतलें लोणी, तिळांतलें तेल, किंवा भिंतीवरलें चित्र ( हीं जशीं प्रत्यक्ष दिसतात ) त्याप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं देह डोळ्यांनीं ( कधीं सुद्धां ) दिसत नाहीं. तेव्हां प्रत्यक्षाला विरोध येतो असें म्हणालास तेंही बरोबर नाहीं.

कथं तर्हि प्रत्यक्षाद्यसिद्धात्मनि देहाध्यारोपणा, देहे चात्मा-रोपणा ॥ ६० ॥

अर्थः—जर हें प्रत्यक्ष दिसत नाहीं तर आत्म्यावर देहाचा भास किंवा देहावर आत्म्याचा अध्यास ( आरोप ) कसा खरा ठरणार ?

नायं दोषः स्वभावप्रसिद्धत्वात् आत्मनः । न हि कदाचि-त्क सिद्धावेव अध्यारोपणा न नित्यसिद्धौ इति नियंतुं शक्यं, आकाशे तलमलाध्यारोपणदर्शनात् ॥ ६१ ॥

अर्थः–त्यांत कांहीं दोष येत नाहीं, आत्म्याचा हा स्वभावच असा आहे. एखादेवेळीं सिद्ध असणाऱ्यावर किंवा नेहमीं सिद्ध असणाऱ्यावर अध्यास होईल असा नियम करतां येत नाहीं. आकाश ( कोणच्याही इंद्रियाच्या आटोक्यांतलें नसून तें ) निळसर आहे असा आरोप त्याच्यावर सर्वत्र करितात.

किं भगवन् ! देहात्मनोः इतरेतराध्यारोपणा देहादिसंघा-तकृता, अथवा आत्मकृता इति ॥ ६२ ॥

अर्थः–महाराज ( मला एक शंका आली आहे ती अशी ) देह आणि आत्मा ह्याचा एकमेकांवर भास होतो तो देह ( इंद्रियें ) वगैरेचा जो समुदाय त्याच्यामुळें होतो किंवा आत्म्यामुळें होतो ?

गुरुरुवाच– यदि देहादिसंघातकृता, यदिवा आत्मकृता, किंतत्र स्यात् ॥ ६३ ॥

अर्थः–गुरुः–बाळ काय तूं काढलेंस? देह वगैरे समुदायानें होवो किंवा आत्म्यामुळें होवो, त्याच्यात फरक काय?

इत्युक्तः शिष्य आह–यद्यहं देहादिसंघातमात्र', ततो ममाचेतनत्वात् परार्थत्वमिति न मत्कृता देहात्मनोः इतरेतराध्यारोपणा ।

अर्थः–शिष्यः–( हा अध्यास करणारा तरी कोण? ) देह वगैरेचा समुदाय जो मी तो म्हणावा, तर हा मी रूपी समुदाय ( चैतन्यरहित ) जड आहे आणि तो परावलंबी आहे तेव्हां अशा मीकडून हा आध्यारोप होणें नाहीं [ मग संसार कसा होणार ? ]

अथाहं आत्मा परोऽन्यः संघातात्, चितिमत्त्वात् स्वार्थ इति मयैव चितिमता आत्मनि अध्यारोपणा क्रियते सर्वानर्थबीजभूता ॥ ६४ ॥

अर्थः–आतां मी जर आत्मा सर्वांत श्रेष्ठ हा [ देहादि ] समुदायाहून निराळा असलों तर मी चैतन्यरूप असल्यामुळें आपल्यावरचा आपण ( फेऱ्याप्रमाणें ) आत्म्याच्या ठिकाणीं मीच हा अध्यारोप [ संसाराचा ] केला असें धरलें तर त्यापासून भयंकर नुकसान होईल. मोक्षाची आशाच धरायला नको.

इत्युक्तो गुरुरुवाच–अनर्थबीजभूतां चेत् मिथ्याध्यारोपणां जानीषे, मा कार्षीस्तर्हि ॥ ६५ ॥

गुरुः—हा खोटा भास मनांत धरल्यामुळें अनर्थ होईल असें जर तुला समजलें आहे तर तो भास कां करतोस, करूं नको.

नैव भगवन् । शक्नोमि न कर्तुम् । अन्येन केनचित् प्रयुक्तोऽहं न स्वतन्त्र इति ॥ ६६ ॥

अर्थः—महाराज, करू नको ह्मणतां पण माझा इलाज नाहीं. मला कोणी तरी दुसरें हें करण्याला लावीत आहे, माझा मी मालक उरलों नाहीं.

न तर्हि अचितिमत्त्वात् स्वार्थः त्वं । येन प्रयुक्तः अस्वतंत्रः प्रवर्तसे स चितिमान् स्वार्थः । संघात एव त्वं ॥ ६७ ॥

अर्थः—तर मग तूं चैतन्ययुक्त नसल्यामुळें परावलंबी आहेस, आणि ज्याच्या प्रेरणेमुळें परस्वाधीनासारखा वागतोस तो चैतन्ययुक्त आणि स्वतंत्र असणार. तेव्हां ( देहादि ) समुदाय तूं आपल्याला समजतो आहेस.

यद्यचेतनोऽहं, कथं सुखदुःखवेदनां भवदुक्तं च जानामि ६८

अर्थः—मी जर चैतन्ययुक्त नसतों तर मग सुखदुःखाचें, तुह्मी बोलत आहां त्याचें ज्ञान मला कसें होतें.

गुरुरुवाच—किं सुखदुःखवेदनाया मदुक्ताच्चान्यः त्वं, किंवा अनन्यः एवेति ? ॥ ६९ ॥

अर्थः—सुखदुःखाचें ज्ञान होतें तो देहादि समुदाय तूं आहेस किंवा निराळा आहेस ?

शिष्य उवाच—नाहं तावदनन्यः कस्मात् ? यस्मात्तदुभयं कर्मभूतं घटादिकमिव जानामि । यद्यनन्योऽहं, तेन तदुभयं न जानीयां, किंतु जानामि, तस्मादन्यः ।

शिष्यः—मी त्याच्याशीं ( देहादि समुदायाशीं ) एकरूप नाहीं.

कारण देह वगैरे आणि त्यांचा समुदाय हीं ( क्रियेचीं ह्म० पहाणें वगैरे इत्यादिकांचीं ) कर्में आहेत व घट वगैरे पदार्थांप्रमाणें [ मजहून निराळ्या रूपानें ] मला समजतात. जर मी निराळा नसतों तर तीं दोन्हीं मला समजलीं नसतीं, आणि तीं ज्याअर्थी मला समजतात त्याअर्थी मी त्यांच्याहून निराळा आहें.

सुखदुःखवेदना विक्रिया च स्वार्थैव भाप्नोति, त्वदुक्तंच स्यात्, अनन्यत्वे ।

अर्थः—माझें जर त्यांच्याहून वेगळेपण नसतें तर सुखदुःखांपासून काहीं पीडा होणें हा जो परिणाम तो त्याच्यापुरता ( त्याचे ठिकाणीं ) कबूल करावा लागेल आणि आपण जें मघाशीं ( खोटेंपण, नाश वगैरे ) ह्मटलें तेंही येईल.

न च नयोः स्वार्थता युक्ता । नहि चंदनकण्टककृते सुखदुःखे चंदनकंटकार्थे, घटोपयोगो वा घटार्थः ।

अर्थः—असला त्याचा त्याच्यावरच परिणाम घरतां येणार नाहीं. हें पहा,चंदन लावल्यानें होणारें सुख किंवा काटा बोचल्यानें होणारें दुःख हें चंदनाला आणि कांट्याला कुठें होतें ? किंवा घटाचा उपयोग घटालाच मिळतो का?

तस्मात् तद्विज्ञातुः मम चंदनादिकृतः अर्थः । अहं हि ततो अन्यः समस्तं अर्थं जानामि बुद्ध्यारूढम् ॥ ७० ॥

अर्थः—तेव्हा तें (सुखदुःख) अनुभवणाऱ्या मजवर चंदन वगैरेचा परिणाम होतो. मी त्याच्याहून निराळा असून बुद्धीच्या आश्रयानें सर्व घडणारे परिणामाचा अनुभव घेतों.

तं गुरुरुवाच—एवं तर्हि स्वार्थस्त्वं चितिमत्वात् न परेण प्रयुज्यसे ।

गुरुः—असें ह्मणशील तर तुझ्यापुरता परिणाम झाला, तूं चैतन्ययुक्त ठरलास, मग तुला दुसरा कोणी प्रेरणा करणारा नाहीं.

नहि चितिमान् परतंत्रः परेण प्रयुज्यते, चितिमतः चितिमदर्थत्वानुपपत्तेः समत्वात् प्रदीपप्रकाशयोः इव ।

अर्थः—चैतन्ययुक्त असणारा परतंत्र असत नाहीं, त्याला दुसऱ्याची प्रेरणा होणें हें जमत नाहीं. चैतन्ययुक्ताचाच परिणाम चैतन्ययुक्तावर झाला असें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण ते दोन्ही सारखे आहेत. दिवा आणि उजेड ह्यांपैकीं एकानें दुसऱ्याचा उपयोग केला ह्मटलें तर तें नीट दिसेल का?

नापि अचितिमदर्थत्वं चितिमतो भवति, अचितिमतो अचितिमत्त्वादेव स्वार्थसंबंधानुपपत्तेः ।

अर्थः—चैतन्यापासून जडावर कांहीं परिणाम झाला ह्मटलें तर तेंही जमत नाहीं. जडाचा स्वभावच जड असल्यामुळें त्याचाच परिणाम त्याच्यावर होतो ह्मणणें योग्य नाहीं.

नापि अचितिमतोः अन्योन्यार्थत्वं दृष्टम् । नहि काष्ठकुड्ये अन्योन्यार्थं कुर्वाते ॥ ७१ ॥

अर्थः—तसेच दोन जड पदार्थांचाही एकमेकांवर परिणाम घडतो असें दिसून येत नाहीं. लांकूड आणि भिंत हीं एकमेकांकरतां कांहीं करीत नाहींत.

ननु चितिमत्त्वे समेऽपि भृत्यस्वामिनोः अन्योन्यार्थं दृष्टं ७२

अर्थः—चैतन्याच्या दृष्टीनें सारखे दोन पदार्थ—उदाहरणार्थ धनी आणि नोकर—हे तर एकमेकांच्या उपयोगीं पडतात.

नैवं, अग्नेरुष्णप्रकाशवत् तव चितिमत्त्वस्य विवक्षितत्वात् ।

अर्थः—तसा ( अनिश्चित ) प्रकार ह्यांत नाहीं. अग्नीचा उष्ण प्रकाश जसा असतो त्याप्रमाणें तुझें चैतन्य स्पष्ट आहे.

प्रदर्शितश्च दृष्टांतः प्रदीपप्रकाशयोः इति ।

अर्थः–दीप आणि त्याचा प्रकाश याचें उदाहरण वर दिलेंच आहे.

**तत्र एवं सति स्वबुद्ध्यारूढमेव सर्वं उपलभसे अभ्युष्ण-प्रकाशतुल्येन कूटस्थनित्यचैतन्यस्वरूपेण ।**

अर्थः—तेव्हां ( ह्या दोन उदाहरणांप्रमाणें ) हें असल्यामुळें अग्नीला सोडून त्याची उष्णता आणि प्रकाश हीं जशीं कधीं नसतात, त्याप्रमाणें कूटस्थ आत्म्यावर असणारें चैतन्यरूप ह्याच्या आधारानें बुद्धीला गोचर झालेलें सर्व तुला समजतें. [ सारांश हा देहादिकांचा समुदाय मी नव्हे व माझा त्याचा संबंध नाहीं असें तुला कळेल. ]

**यदि च एवं आत्मनः सर्वदा निर्विशेषत्वं उपगच्छसि ।**

अर्थः–ह्याप्रमाणें आत्म्याहून कांहीं एक विशेषपणा [ निराळे-पणा ] आपला नाहीं हें तुझ्या ध्यानांत येईल.

**किमिति ऊचिवान् ' सुषुप्ते विश्रम्य विश्रम्य जाग्रत्स्वप्नयोः दुःखं अनुभवामि, किमयमेव मम स्वभावः किंवा नैमित्तिकः ' इति च ।**

अर्थः–मग तुझें तें बोलणें कोठें राहिलें सांग कीं गाढ झोंपेच्या वेळीं तेवढी पूर्ण विश्रांति मिळते, जागा झाल्यावर आणि स्वप्नांत दुःख मी भोगीत असतों, हा माझा ( मूळ ) स्वभाव आहे किंवा उसना आला आहे ?

**किमसौ व्यामोहोपगतः ? किंवा न वा ? ॥ ७३ ॥**

असा जो तुला भ्रम झाला होता तो गेला किंवा नाहीं ?

इत्युक्तः शिष्य आह—भगवन् अपगतः त्वत्प्रसादात् । किंतु मम कूटस्थतायां संशयः । कथं ? शब्दादीनां स्वतः सिद्धिर्नास्ति, अचेतनत्वात्; शब्दाद्याकारप्रत्ययोत्पत्तेः तु तेषाम् ।

अर्थः—तेव्हां शिष्य ह्मणाला:—महाराज, गेला. आपल्या कृपेचें फल हें. पण आत्मा कूटस्थ आहे अशाबद्दल मला शंका आहे. ती कशी? पहा. शब्द वगैरे विषयाना स्वतः ( आपोआप ) सिद्धि ( स्फुरण ज्ञान होणें ) नाहीं. कारण ते जड आहेत. पण त्याना ते शब्द वगैरे जे आकार येतात [ ह्मणजे रंग वगैरे दिसतात ] त्यामुळें त्यांचें स्फुरण अनुभवास येतें.

प्रत्ययानां इतरेतरव्यावृत्तविशेषणानां नीलपीताद्याकारवतां स्वतःसिध्यसंभवात् ।

अर्थः—( वास्तविक पहातां ) निळा, पिंवळा, लाल, आखूड वगैरे विशेषणें इतरांना दूर सारून ( त्यांचा बोध होऊं न देता ) आपण प्रगट होतात. त्यावरून त्यांना स्वतः (तो शब्द उच्चारल्या-बरोबर अर्थ दाखविण्याची ) शक्ति नाहीं.

तस्मात् बाह्याकारनिमित्तत्वं गम्यते इति बाह्याकारवत् शब्दाद्याकारत्वसिद्धिः ।

अर्थः—तेव्हा इंद्रियाच्या योगानें उत्पन्न केलेला बाहेरला आकार ह्मणजे शब्द वगैरे व्हावे लागतात ह्मणून प्रमेयाला अर्थ येतो तो निराळा उत्पन्न केलेला [ सांकेतिक, ] व चैतन्याशिवाय निराळा असतो.

तथा प्रत्ययानां अपि अहंप्रत्ययावलंबनवस्तुभेदानां संहतत्वात् अचैतन्योपपत्तेः ।

अर्थः—अहं-शब्दावर अवलंबून रहाणाऱ्या अंतःकरणाचे जे भेद (म्हणजे विकार) ते दाखविणारे प्रत्ययसुद्धां जड ठरणार, कारण ते संहत म्हणजे अर्थात् नाश पावणारे आहेत.

स्वार्थत्वासंभवात् स्वरूपव्यतिरिक्तग्राह्यग्राहकत्वेन सिद्धिः शब्दादिवत् ।

अर्थः—त्यांच्यावर घडणारा परिणाम स्वतः घडविण्याचें सामर्थ्य त्यांना नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं स्वरूपावांचून इतर तऱ्हेनें ग्रहण करण्याची व कळविण्याची शक्ति धरली पाहिजे. शब्द वगैरे विषयांच्या ठिकाणीं असलीच शक्ति असते.

असंहतत्वे सति चैतन्यात्मकत्वात् स्वार्थोऽपि अहंप्रत्ययानां नीलपीताद्याकाराणां उपलब्धा इति विक्रियावान् एव, कूटस्थ इति संशयः ॥ ७४ ॥

अर्थः—तो ( आत्मा ) देह वगैरे समुदायाहून भिन्न असला आणि चैतन्यरूप असल्यामुळें आपल्याच ठिकाणीं स्फुरण पावणारा असला, तरी अहं दाखविणाऱ्या ज्या अंतःकरणाच्या वृत्ति निळा, पिंवळा वगैरे आकारावरून समजतात,त्या त्या(आत्म्या)च्या योगानें समजतात म्हणून तो विक्रिया (फेरबदल) पावणारा असाच ठरतो, कूटस्थ म्हणतां तसा नसावा अशी शंका आहे.

तं गुरुरुवाच—न युक्तस्तव संशयः, यतः तेषां प्रत्ययानां नियमेन अशेषतः उपलब्धेरेव अपरिणामित्वात् कूटस्थत्वसिद्धौ निश्चयहेतुमेव अशेषचित्तप्रचारोपलब्धिं संशयहेतुं आत्थ ।

गुरुः—तुझा संशय बरोबर नाहीं. कारण तुझ्या संशयाला आधार तूं म्हणतोस हाच ना ? ते प्रत्यय सगळे निश्चयानें ग्रहण,

करितां येतातच. तेव्हां एकंदर अंतःकरणाचे व्यापार समजल्यामुळें कूटस्थाच्या ठिकाणीं परिणाम होत नाहीं असें ह्मणायला तुला हा वरचा निश्चयच साधन सांपडला.

'यदि हि तव परिणामित्वं स्यात्, अशेषस्वविषयचित्तप्रचारोपलब्धिर्न स्यात् चित्तस्येव स्वविषये यथाच इंद्रियाणां स्वविषयेषु ।

अर्थः–तसा विकार पावणारा तूं (आत्मा) असतास, तर तुझें तुला समजलेल्या चित्ताच्या सर्व विकारांचा बोध तुला झाला नसता. उदाहरणार्थ ( विकार पावणाऱ्या ) अंतःकरणाला त्याच्यापुढें येणाऱ्या सर्व विषयांचें ग्रहण होत नाहीं, तसेंच इंद्रियापुढें आलेले सर्व विषय त्यांना ग्रहण होत नाहींत.

न च तथा आत्मनः तव स्वविषयैकदेशोपलब्धिः । अतः कूटस्थता एव तव इति ॥ ७५ ॥

अर्थः–त्याप्रमाणें तुझी ह्मणजे आत्म्याला स्वतःची जी जाणीव असते ती एकदेशी ( परिमित ) नसते (तर संपूर्ण असते.) यावरून तूं ( आत्मा ) कूटस्थ आहेस ( असें सिद्ध झालें )

तत्राह–उपलब्धिर्नाम धात्वर्थो विक्रियैव, उपलब्धुः कूटस्थात्मता च इति विरुद्धम् ॥ ७६ ॥

अर्थः–ह्यावर शंका—उपलब्धि ह्मणजे जाणीव ह्यांतल्या लभ् धातूच्या अर्थावरून विकाराचा बोध होतो; पण अशी जाणीव असणारा आत्मा कूटस्थ आहे ( ह्मणता ); तेव्हां ह्या दोन्हींचा परस्पर मेळ बसत नाहीं.

न, धात्वर्थविक्रियायां उपलब्ध्युपचारात् ।

अर्थः—हें ह्मणणें बरोबर नाहीं. धातूच्या ठिकाणीं अर्थरूपी जो विकार होतो त्याचें ग्रहण हा नुसता उपचार आहे.

योहि बौद्धः प्रत्ययः स धात्वर्थो विक्रियात्मकः आत्मनः उपलब्ध्याभासफलावसान इति उपलब्धिशब्देन उपचर्यते,

अर्थः—धातूचा जो अर्थ बुद्धीच्या ठिकाणीं समजला तो मात्र विकार स्वरूपाचा आहे, पण आत्म्याच्या ठिकाणीं जाणिवेचा भास येवढा परिणाम होऊन जाणीव हा शब्द उपचारासाठीं लावला जातो.

यथा छिदिक्रिया द्वैधीभावफलावसाना इति धात्वर्थेनोपचर्यते तद्वत् ॥ ७७ ॥

अर्थः—(वास्तविक कूटस्थात कांहींच जाणीव नाहीं). तोडणें ह्या क्रियेंत जशी ती एकापासून दुसऱ्यावर परिणाम पावून दोन्ही वस्तूंचा संबंध दाखवून विराम पावते,त्याप्रमाणें जाणिवेच्या ठिकाणीं होत नाहीं.(त्या अंतःकरणवृत्तीमुळें कर्तृत्वाचा नुसता भास आत्म्याच्या ठिकाणीं होतो.)

इत्युक्तः शिष्य आह—ननु भगवन्!मम कूटस्थप्रतिपादनंप्रति असमर्थो दृष्टांतः । कथं ? छिदिः छेद्यविक्रियावसाना उपचर्यते यथा धात्वर्थत्वेन, तथा उपलब्धिशब्दोपचरितोऽपि धात्वर्थो बौद्धप्रत्ययः आत्मनः उपलब्धिविक्रियावसानश्चेत् न आत्मनः कूटस्थतां प्रतिपादयितुं समर्थः ॥ ७८ ॥

अर्थः—तेव्हां शिष्य ह्मणतो—महाराज, मी कूटस्थ आहे हें दाखविण्यासारखा दृष्टांतच नाहीं. कां बरें ? तोडणें या धातूच्या अर्थामध्यें तोडण्याचा झालेला विकार त्या ( कर्म वस्तू ) च्या ठिकाणींच संपेल, आणि त्याप्रमाणें जाणीव ह्या धातूच्या अर्थानें दाखविलेला बोध बुद्धीच्या ठिकाणीं जाणीव ह्या क्रियेच्या ठिकाणींच

बंद होईल, तर मग त्यावरून आत्म्याची कूटस्थता ही स्थिति स-मजणार नाहीं.

गुरुरुवाच—सत्यमेवं स्यात्, यदि उपलब्ध्युपलब्ध्रोः विशेषः। नित्योपलब्धिमात्र एव हि उपलब्धा, न तु तार्किकसमय इव अन्या उपलब्धिः अन्यः उपलब्धा च ॥ ७९ ॥

गुरु—तूं ह्मणतोस तसें खरोखरच झालें असतें, पण त्याला पाहिजे त्याप्रमाणें जाणीव आणि जाणणारा ह्या दोन वस्तू निरनिराळ्या असायला पाहिजे होत्या. जाणणारा हा सदोदित जाणिवेनें युक्तच असा आहे. तर्क करण्याच्या वेळीं ही जाणीव आणि हा जाणणारा जसा निरनिराळा वाटतो तसा तो नाहीं.

ननु उपलब्धिफलावसानो धात्वर्थः कथमिति ॥ ८० ॥

अर्थ—मग धातूच्या अर्थाचा परिणाम जाणीव हें फल देण्यापर्यंत समजावयाचा कसा ?

उच्यते—शृणु, उपलब्ध्याभासफलावसान इति उक्तं, किं न श्रुतं त्वया ? न तु आत्मा विक्रियोत्पादनावसान इति मयोक्तं ॥ ८१ ॥

उत्तर—ऐक. जाणिवेचा आभास हें फल देऊन धात्वर्थ विराम पावतो असें ह्मटलें होतें, तूं ( नीट ) ऐकलें नाहींस वाटतें ! आत्मा विकाराला उत्पन्न करतो असें मीं ह्मटलें नाहीं.

शिष्य उवाच—कथं तर्हि कूटस्थे मयि अशेषस्वविषयचित्तप्रचारोपलब्धृत्वं इति आत्थ ॥ ८२ ॥

शिष्य—तर मग मी जो कूटस्थ त्याच्या ठिकाणीं सर्व जे कांहीं गोचर होणारे विषय त्यांसंबंधाची चित्ताच्या विकाराची जाणीव असते असें आपण ह्मणता तें कसें ?

तं गुरुरुवाच–सत्यं अवोचं, तेनैव कूटस्थतां अनुवं तव८३
गुरुः–मी तसें बोललों खरेंच. त्यावरून तर तूं कूटस्थ आहेस असें मी ह्मणालों.

यद्येवं भगवन्! कूटस्थनित्योपलब्धिस्वरूपे मयि शब्दाद्याकारबौद्धप्रत्ययेषु च मत्स्वरूपोपलब्ध्याभासफलावसानवत्सु उत्पद्यमानेषु कस्त्वपराधो मम? ॥ ८४ ॥

अर्थ–असें असल्यावर मी कूटस्थ, नित्य जाणीव स्वरूपाचा असून माझ्या ठिकाणी, शब्द वगैरेंचा परिणाम आकार बुद्धीमध्यें उत्पन्न होऊन माझ्या स्वरूपाच्या जाणिवेचें फल देतात, त्यांत माझा अपराध कोणचा?

सत्यं, नास्त्यपराधः। किंतु अविद्यामात्रस्तु अपराधः इति प्रागेव अवोचम् ॥ ८५ ॥

अर्थ–खरेंच यांत अपराध नाहीं, पण अज्ञान हाच अपराध असें मागेंच मी सांगितलें आहे.

यदि भगवन्! सुषुप्त इव मम विक्रिया नास्ति, कथं स्वप्नजागरिते? ॥ ८६ ॥

अर्थ–( हा कूटस्थ जर तिन्ही अवस्थांत कायम आहे ) तर महाराज, गाढ झोपेंत मला काहीं विकार होत नाहीं. पण मग स्वप्नांत व जागेपणीं कां होतो?

तं गुरुरुवाच–किंतु अनुभूयेते त्वया सततम् ॥ ८७ ॥
गुरु–त्या दोन्ही अवस्थांमध्यें एकसारखा अनुभव येत असतो काय?

बाढं अनुभवामि, किंतु विच्छिद्य विच्छिद्य, न तु सततम् ८८

अर्थ–होय, अनुभव येतो, पण मधून मधून त्याला खंड पड-तो, एकसारखा येत नाहीं.

तं गुरुरुवाच–तर्ह्यागंतुके स्वेते, न तवात्मभूते ।

गुरु–म्हणून या दोन्ही ( अवस्था- ) आगंतुक आल्या आहेत, मूळच्या नाहींत.

यदि तव आत्मभूते चैतन्यस्वरूपवत् स्वतःसिद्धे संतते एव स्याताम् ।

अर्थ–चैतन्यस्वरूपाप्रमाणें जर त्या मूळच्या असत्या तर त्या आपल्या आपण स्वतः जाणिवेंत येऊन नेहमीं कायम असत्या.

किंच–स्वप्नजागरिते न तव आत्मभूते, व्यभिचारित्वात् वस्त्रादिवत् । न हि यस्य यत् स्वरूपं तत् तद्व्यभिचारी दृष्टं ।

अर्थ––शिवाय, स्वप्न व जागृति ह्या अवस्था मूळच्या नाहींत; कपड्याप्रमाणें त्यांची स्थिति आहे. कधीं आहेत तर कधीं नाहींत. पण ज्याचें जें मूळचें असतें तें त्याच्यापासून कधींच नाहींसें होत नाहीं.

स्वप्नजागरिते तु चैतन्यमात्रत्वात् व्यभिचरतः । सुषुप्ते चेत् स्वरूपं व्यभिचरेत् तत् नष्टं नास्तीति वा बाध्यं एव स्यात्,

अर्थः––( आत्मा ) केवळ चैतन्यरूप असल्यामुळें तेथें स्वप्न आणि जागृति असत नाहींत. गाढ झोपेंत त्या अवस्था असत्या तर स्वरूपाचा विसर पडता. तें नाश पावलें, किंवा मुळींच नाहीं असा बाध येता [ठरलें असतें.]

आगंतुकानां अतद्धर्माणां उभयात्मकत्वदर्शनात् यथा धन-वस्त्रादीनां नाशो दृष्टः स्वप्नभ्रांतिलब्धानां तु अभावो दृष्टः ॥ ८९ ॥

अर्थः—त्या दोन्ही अवस्थांमध्यें उत्पन्न्या आलेल्या ( आ-स्याच्या नाहींत ) अशा वस्तू अनुभवास येतात; उदाहरण ( जा-गृतींत ) द्रव्य, कपडे वगैरे दिसतात व त्यांचा नाश होतो; स्वप्नामध्यें भ्रमामुळें मिळालेल्या वस्तू ( मुळींच ) जाग्या-वर नसतात.

ननु एवं भगवन्! चैतन्यस्वरूपमपि आगंतुकं प्राप्तं, स्वप्न-जागरितयोरेव सुषुप्ते अनुपलब्धेः । अचैतन्यस्वरूपो वा स्यामहम् ॥ ९० ॥

अर्थः—असें असेल तर महाराज, माझें चैतन्यस्वरूपहि उसनें ( मूळचें नाहीं ) असें होईल. स्वप्नांत आणि जागृतावस्थेंत तें जसें नाहीं, तसें गाढ झोपेंतही नाहीं. मग मीच मुळीं जडरूप झालों.

न, पश्य, तदनुपपत्तेः चैतन्यस्वरूपंचेत् आगंतुकं पश्यसि, पश्य, नैतत् वर्षशतेनापि उपपत्त्या कलयितुं शक्नुमो वयं,अन्यो वा अचैतन्योपि ।

अर्थः—तें होणार नाहीं. पहा तसें सिद्ध होत नाहीं. ( तुझी बुद्धि फार तेव्हां ) तुला चैतन्यस्वरूप आगंतुक ( मूळचें नाहीं असें ) वाटत असेल तर वाटो. आम्हीं शंभर वर्षे खटपट करीत बसलों तरी तशी उपपत्ति आम्हाला लावता येणें शक्य नाहीं, दुसरा कोणी जड मूर्ख आला तरी त्याच्या हातून हें होणें नाहीं.

संहतत्वात् पारार्थ्यं अनेकत्वं नाशित्वं च न केनचिदुपपत्त्या वारयितुं शक्यं,अस्वार्थस्य स्वतःसिध्यभावात् इति अवोचाम।

अर्थः—आमचें दुसरें असें ह्मणणें आहे,कीं जें आपला बोध दा-खवीत नाहीं, त्याच्या ठिकाणीं आपोआप प्रगट होणें, ( स्फुरण ) शक्य नाहीं, यावरून जो समुदाय ( देहादिकांचा ) झाला तो दुस-

त्याच्या बोधास उपयोगी पडतो, त्याच्या ठिकाणी अनेक स्वरूपें येतात व तो नाशिवंत असतो, हे (तिन्ही) धर्म त्याच्याकडे येत नाहींत असें दाखवितां येणें शक्य नाहीं.

चैतन्यस्वरूपस्य तु आत्मनः स्वतःसिद्धेः अन्यानपेक्षत्वं न केनचित् वारयितुं शक्यं, अव्यभिचारात् ॥ ९१ ॥

अर्थः—चैतन्यस्वरूप जो आत्मा त्याच्या स्वतःच्या जाणिवेला दुसऱ्याचें सहाय्य लागत नाहीं, ही गोष्ट कोणालाही बदलतां येणार नाहीं. कारण ती त्याच्याबरोबर सदोदित असतेच.

'ननु व्यभिचारो दर्शितो मया सुषुप्ते न पश्यामि इति ९२

अर्थः—ती (जाणीव) गाढ झोंपेंत नसते असें मी तर मघाशीं सांगितलें. मला दिसत नाहीं वगैरे मी तर बोलून दाखविलें.

'न,' व्याहतत्वात्–कथं व्याघातः ?

अर्थः—हें बरोबर नाहीं. तुझें बोलणें तुझ्यावर आलें. यांत कसें काय अडलें ?

पश्यतस्त्वं न पश्यामि इति व्याहतं वचनं–नाहि कदाचित् भगवन् ! सुषुप्ते मया चैतन्यं अन्यद्वा किंचित् दृष्टं–पश्यन् तर्हि सुषुप्ते त्वं;

अर्थः—तूं पहातो म्हणणाराच पहात नाहींस म्हणतोस हें बोलणें कसलें ? महाराज, मी गाढ झोंपेच्या वेळीं चैतन्य किंवा दुसरें कांहींच पाहिलें नाहीं; (तर मग) पहात होतों म्हणतोस आणि तें गाढ झोंपेंत हें काय !

यस्मात् दृष्टमेव प्रतिषेधसि न दृष्टिं । या तव दृष्टिः तत् चैतन्यं इति मया उक्तम् ।

अर्थः—तर मग तूं पाहिलें नाहींस (येवढेंच) म्हणतोस, त्या·

वेळीं [ तुला ] दृष्टि नव्हती असें ह्मणत नाहींस. मग ही तुझी दृष्टि तेंच चैतन्य असें आमचें ह्मणणें.

**यया त्वं विद्यमानया न किंचित् दृष्टं इति प्रतिषेधसि सा दृष्टिः त्वच्चैतन्यम् ।**

अर्थः—जी दृष्टि असल्यामुळें ( च ) तू काहीं पाहिलें नाहीं ह्मणतोस ती दृष्टीच तुझें चैतन्य.

**तर्हि सर्वत्र अव्यभिचारात् कूटस्थनित्यत्वं सिद्धं स्वत एव न प्रमाणापेक्षम् ।**

अर्थः—तेव्हां सर्व ठिकाणीं तें ( चैतन्य ) कायम असल्यामुळें कूटस्थपणा आणि नित्यपणा हे आपोआप सिद्ध झाले, त्याला ( दुसऱ्या ) प्रमाणाची गरज नाहीं.

**स्वतःसिद्धस्य हि प्रमातुः अन्यस्य प्रमेयस्य परिच्छित्तिं प्रति प्रमाणापेक्षा ।**

अर्थः—आपोआप सिद्ध असलेल्या प्रमात्याला दुसरें कांहीं प्रमेयाची स्फूर्ति करावयाची असेल तेव्हां प्रमाण देण्याचें पडतें.

**या तु अन्या नित्या परिच्छित्तिः अपेक्ष्यते अन्यस्य अपरिच्छित्तिरूपस्य परिच्छेदाय सा हि नित्यैव कूटस्था स्वयंज्योतिःस्वभावा ।**

अर्थः—स्फुरणरहित ( जड ) दुसऱ्या पदार्थांच्या जाणिवेसाठीं जें नित्य स्फुरण असावें लागतें, त्यालाच कूटस्थ ह्मणावें, तेंच नित्य आहे, त्या स्फुरणाचा प्रकृतिधर्मच स्वतः प्रकाश करणारा असा आहे.

**आत्मनि प्रमाणत्वे प्रमातृत्वे वा न तां प्रति प्रमाणापेक्षा, तत्स्वभावत्वात् ;**

अर्थः—आत्म्याचें तें ( स्फुरण, प्रकाश ) मूळस्वरूप असल्या-

मुळें त्याच्याठिकाणीं प्रमाण देण्याला किंवा प्रमाता होण्याला ( दुस-
ऱ्या ) प्रमाणाची जरूर नाहीं.

यथा प्रकाशनं उष्णत्वं वा लोहोदकादिषु परतः अपेक्ष्यते अग्न्यादित्यादिभ्य. अतत्स्वभावत्वात्, न अग्न्यादीनां तदपेक्षा, सर्वदातत्स्वभावत्वात् ॥ ९३ ॥

अर्थः–लोखंडाच्या ठिकाणीं उजेड पाडण्याची शक्ति किंवा पाण्यामध्यें उष्णपणा हे त्याचे जातीधर्म नसल्यामुळें ते त्यांच्या ठिकाणीं येण्यास विस्तव आणि सूर्य यांची गरज लागते; पण विस्तवाला वगैरे तशी जरूर नाहीं, कारण त्याचे ते उपजत धर्मच आहेत.

अनित्य वे एव प्रमा स्यात् न नित्यत्वे इति चेत् ॥ ९४ ॥

अर्थः–नाशवंत वस्तूच्या ठिकाणीच प्रमाण करतां येतें, शाश्वत वस्तूच्या ठिकाणीं येत नाहीं, असें असेल तर–

न अवगतेः नित्यत्वानित्यत्वयो. विशेषानुपपत्ते ।

अर्थः––तसें कांहीं नाहीं. जाणीव होते ती नित्याची होते आणि अनित्याची होत नाहीं अशा प्रकारचा भेद दिसून येत नाहीं.

न हि अवगतेः प्रमात्वे अनित्या अवगति. प्रमा न नित्या इति विशेष. अवगम्यते ॥ ९५ ॥

अर्थः––तसेंच जाणिवेच्या संबंधानें पाहिलें तर प्रमाणानें झालेली जाणीव नाशवंत होते किंवा मूळ प्रमाणच शाश्वत नाहीं, असा भेद करतां येत नाहीं.

नित्यायां प्रमातु. अपेक्षाभावः अनित्यायां तु यत्नांतरितत्वात् अवगतिः अपेक्ष्यते इति विशेषः स्यादितिचेत् ॥ ९६ ॥

अर्थः-नित्य वस्तूच्या ठिकाणीं प्रमाता मानण्याचें कारणच नाहीं.

अनित्य वस्तूच्या ठिकाणी प्रयत्न करावा लागत असल्यामुळें जाणीव यावी लागते असा दोन्हींत फरक आहे असें मानलें तर—

सिद्धा तर्हि आत्मनः प्रमातुः स्वतः सिद्धिः प्रमाणनिरपेक्षतयैवेति ॥ ९७ ॥

अर्थः— मग आत्मा जेव्हां प्रमाता होतो तेव्हां त्याची जाणीव आपोआप होते. तेथें प्रमाणाची गरज लागत नाहीं, असें ठरलें.

अभावेऽपि अपेक्षाभावः नित्यत्वात् इतिचेत ॥ ९८ ॥

अर्थः—मग त्याच नित्यपणाच्या कारणानें प्रमेचा अभाव ठरवायला सुद्धां प्रमाणाची जरूर लागणार नाहीं.

न, अवगतेरेव आत्मनि सद्भावादिति परिहृतमेतत् ।

अर्थः—असें नाहीं. [ असला अभाव धरण्याचें कारणच नाहीं. ) आत्म्याच्या ठिकाणीं जाणीव सदोदित असल्यामुळें ही शंका निघतच नाहीं.

प्रमातुश्चेत् प्रमाणापेक्षा सिद्धिः कस्य प्रमित्सा स्यात् ।

अर्थः—( आतां असें धरूं कीं ) प्रमात्याची सिद्धि ( आत्म्याचे ठिकाणची ) व्हायला प्रमाणाची जरूर आहे. मग तेथें प्रमा करावी अशी इच्छा कोणाला झाली म्हणणार ?

यस्य प्रमित्सा स एव प्रमाता अभ्युपगम्यते ।

अर्थः—ज्याला प्रमा करण्याची इच्छा झाली,तोच प्रमाता होतो.

तदीयाच प्रमित्सा प्रमेयविषयैव, न प्रमातृविषया,

अर्थः— ती झालेली प्रमेची इच्छा प्रमेयासंबंधानें असणार, प्रमात्यासंबंधानें असणार नाहीं.

प्रमातृविषये—अनवस्थाप्रसंगात् प्रमातुः तादिच्छायाश्च

मुळें त्याच्याठिकाणीं प्रमाण देण्याला किंवा प्रमाता होण्याला ( दुसऱ्या ) प्रमाणाची जरूर नाहीं.

**यथा प्रकाशनं उष्णत्वं वा लोहोदकादिषु परतः अपेक्ष्यते अग्न्यादित्यादिभ्यः अतत्स्वभावत्वात्, न अग्न्यादीनां तदपेक्षा, सर्वदातत्स्वभावत्वात् ॥ ९३ ॥**

अर्थः–लोखंडाच्या ठिकाणीं उजेड पाडण्याची शक्ति किंवा पाण्यामध्यें उष्णपणा हे त्याचे जातीधर्म नसल्यामुळें ते त्याच्या ठिकाणीं येण्यास विस्तव आणि सूर्य यांची गरज लागते; पण विस्तवाला वगैरे तशी जरूर नाहीं, कारण त्याचे ते उपजत धर्मच आहेत.

**अनित्यत्वे एव ममा स्यात् न नित्यत्वे इति चेत् ॥ ९४ ॥**

अर्थः–नाशवंत वस्तूच्या ठिकाणींच प्रमाण करतां येतें, शाश्वत वस्तूच्या ठिकाणीं येत नाहीं, असें असेल तर–

**न अवगतेः नित्यत्वानित्यत्वयोः विशेषानुपपत्तेः ।**

अर्थः––तसें कांहीं नाहीं. जाणीव होते ती नित्याची होते आणि अनित्याची होत नाहीं अशा प्रकारचा भेद दिसून येत नाहीं.

**न हि अवगतेः प्रमात्वे अनित्या अवगतिः ममा न नित्या इति विशेषः अवगम्यते ॥ ९५ ॥**

अर्थः––तसेंच जाणिवेच्या संबंधानें पाहिलें तर प्रमाणानें झालेली जाणीव नाशवंत होते किंवा मूळ प्रमाणच शाश्वत नाहीं, असा भेद करतां येत नाहीं.

**नित्यायां ममातुः अपेक्षाभावः अनित्यायां तु यत्नांतरितत्वात् अवगतिः अपेक्ष्यते इति विशेषः स्यादितिचेत् ॥ ९६ ॥**

अर्थः–नित्य वस्तूच्या ठिकाणीं प्रमाता मानण्याचें कारणच नाहीं.

अनित्य वस्तूच्या ठिकाणीं प्रयत्न करावा लागत असल्यामुळें जाणीव यावी लागते असा दोन्हींत फरक आहे असें मानलें तर—

**सिद्धा तर्हि आत्मनः प्रमातृ स्वत. सिद्धिः प्रमाणनिरपेक्षतयैवेति ॥ ९७ ॥**

**अर्थ:**— मग आत्मा जेव्हां प्रमाता होतो तेव्हा त्याची जाणीव आपोआप होते. तेथें प्रमाणाची गरज लागत नाहीं, असें ठरलें.

**अभावेऽपि अपेक्षाभावः, नित्यत्वात् इतिचेत ॥ ९८ ॥**

**अर्थ:**—मग त्याच नित्यपणाच्या कारणानें. प्रमेचा अभाव ठरवायला सुद्धा प्रमाणाची जरूर लागणार नाहीं.

**न, अवगतेरेव आत्मनि सद्भावादिति परिहृतमेतत् ।**

**अर्थ:**—असें नाहीं. [ असला अभाव धरण्याचें कारणच नाहीं. ) आत्म्याच्या ठिकाणीं जाणीव सदोदित असल्यामुळें ही शंका निघतच नाहीं.

**प्रमातुश्चेत् प्रमाणापेक्षा सिद्धिः कस्य प्रमित्सा स्यात् ।**

**अर्थ:**—( आतां असें धरू कीं ) प्रमात्याची सिद्धि ( आत्म्याचे ठिकाणी ) व्हायला प्रमाणाची जरूर आहे. मग तेथें प्रमा करावी अशी इच्छा कोणाला झाली म्हणणार ?

**यस्य प्रमित्सा स एव प्रमाता अभ्युपगम्यते ।**

**अर्थ.**—ज्याला प्रमा करण्याची इच्छा झाली,तोच प्रमाता होतो.

**तदीयाच प्रमित्सा प्रमेयविषयैव, न प्रमातृविषया.**

**अर्थ:**— ती झालेली प्रमेची इच्छा प्रमेयासंबंधानें असणार, प्रमात्यासंबंधानें असणार नाहीं.

**प्रमातृविषये अनवस्थाप्रसंगात् प्रमातुः तादिच्छायाश्र-**

तस्याप्यन्यः प्रमाता तस्याप्यन्यः इति, एवमेव इच्छायाः प्रमातृविषयत्वे ।

अर्थः—प्रमात्यासंबंधाची धरली तर अनवस्थेचा प्रसंग येईल, ( त्याला अंतच लागणार नाहीं, ) म्हणजे त्याचा प्रमाता दुसरा, त्याचा तिसरा अशी परंपरा संपावयाची नाहीं. त्याप्रमाणें इच्छा ती प्रमात्याची म्हटली, म्हणजे ती इच्छा करणारा, ती इच्छा करणारा तिसरा असें दोपूट वाढावयाचें.

प्रमातुः आत्मनः अव्यवहितत्वाच्च प्रमेयत्वानुपपत्तिः ।

प्रमाता आणि आत्मा हे एकच ( मध्यें अंतर नसलेले ) असल्यामुळें आत्मा प्रमेय होत नाहीं.

लोके हि प्रमेयं नाम प्रमातुः इच्छास्मृतिप्रयत्नप्रमाणजन्मव्यवहितं सिद्ध्यति, नान्यथा, अवगतिः प्रमेयविषया दृष्टा ।

अर्थः—लोकांमध्यें प्रमेय जे म्हणतात ते प्रमात्यानें इच्छा, स्मरण, खटपट, केल्यावर त्या प्रमाणाचा जन्म होतो, अगोदर नसतो. जाणीव व्हायची ती प्रमेयाची.

नच प्रमातुः प्रमाता स्वस्य स्वयमेव केनचित् व्यवहितः कल्पयितुं शक्यः इच्छादीनामन्यतमेनापि ।

अर्थः—प्रमात्याचा दुसरा प्रमाता असून त्याच्या त्याच्या मध्येंच इच्छा वगैरे सारखें दुसरें कशाचें तरी अंतर ( अडथळा ) आहे अशी गोष्ट मनांत सुद्धां आणायला नको.

स्मृतिश्च स्मर्तव्यविषया न स्मर्तृविषया ।

अर्थः—स्मरण व्हावयाचें तें ज्या वस्तूचें स्मरण करावयाचें असेल तिच्याबद्दल, तें स्मरण करणाऱ्याचें करावयाचें नसतें.

तथा इच्छायाः इष्टविषयत्वमेव, न इच्छावद्विषयत्वं ।

अर्थः-त्याप्रमाणेंच इच्छा होते ती हावी असेल त्या वस्तूविषयीं, इच्छा करणाऱ्या पुरुषाविषयीं होत नाहीं.

**स्मर्त्रिच्छावद्विषयत्वेऽपि हि उभयोः अनवस्था पूर्ववत् अपरिहार्या स्यात् ॥ ९९ ॥**

अर्थः—स्मरण करणारा आणि इच्छा करणारा ह्या दोघांना विषय ( त्या त्या क्रियेचें कर्म ) अशी कल्पना केली तर मागें दाखविल्याप्रमाणें अनवस्थेचा प्रसंग आल्याशिवाय राहणार नाहीं.

**ननु प्रमातृविषयावगत्यनुत्पत्तौ अनवगत एव प्रमाता स्यादितिचेत् ॥ १०० ॥**

अर्थः—बरें तर, प्रमाता जर जाणिवेचा विषयच होत नाहीं तर तो गुप्त [ निजल्यासारखा ] असल्याप्रमाणें नाहीं कां झाला?

**न, अवगन्तुः अवगतेः अवगन्तव्यविषयत्वात् ।**

अर्थः—नाहीं तसा तो नाहीं, तो जाणिवेचा विषय होतो म्हणूनच जाणणारा आणि जाणणें असा प्रचार होतो.

**अवगंतृविषयत्वे च अनवस्था पूर्ववत् स्यात् ।**

अर्थः—त्याला जाणणारा दुसरा कोणी आहे असें म्हटल्यास मात्र मागें सांगितल्याप्रमाणें अनवस्था होईल.

**अवगतिश्च आत्मनि कूटस्थनित्यात्मज्योतिः अन्यतः अनपेक्षैव सिद्धा अग्न्यादित्याद्युष्णप्रकाशवत् इति पूर्वमेव प्रसाधितम् ।**

अर्थः—आत्म्याच्या ठिकाणची जाणीव, कूटस्थपणा, नित्य ( ज्ञानरूपी ) प्रकाश नेहमींच सिद्ध ( तयार ) असतात, ते सिद्ध करण्याला दुसऱ्या कशाची जरूर नसते, अग्नीची - उष्णता आणि

सूर्याचा प्रकाश ह्यांच्याप्रमाणें आत्म्याची जाणीव असते असें मागें स्पष्ट दाखविलें आहे.

अवगतेः चैतन्यात्मज्योतिषः स्वात्मनि अनित्यत्वे आत्मनः स्वार्थतानुपपत्तिः ।

अर्थः—चित्प्रकाशरूप जाणीव आत्म्याच्या ठिकाणीं नेहमीं नसती तर आत्म्याची क्रिया त्याच्यावर न घडून तो स्वत सिद्ध राहिला नसता.

कार्यकारणसंघातत्वात् संहतत्वात् पारार्थ्यं दोषवत्त्वंच अवोचाम ।

अर्थः—एके ठिकाणीं जमलेला ( संयोगानें झालेला ) कार्यकारण यांचा समुदाय परावलंबी असतो आणि म्हणून तो दोषाला पात्र आहे असें आमचें म्हणणें, त्याप्रमाणें आत्मा होईल.

कथं ? चैतन्यात्मज्योतिषः स्वात्मनि अनित्यत्वे स्मृत्यादिव्यवधानात् सान्तरत्वम् । ततश्च तस्य चैतन्यज्योतिषः मागुत्पत्तेः प्रध्वंसाचोर्ध्वं आत्मन्येव अभावात् चक्षुरादीनामिव संहतत्वात् पारार्थ्यं स्यात् ।

अर्थः—कसा? चित्प्रकाश आत्म्याच्या ठिकाणीं नेहमीं नसेल तर स्मरण, इच्छा वगैरे मध्यंतरीं येऊन आत्म्याच्यावर त्याचा एक पडदा होऊन त्याच्यामार्गे तो राहील. नंतर चित्प्रकाश उत्पन्न होण्यापूर्वी किंवा तो संपल्यानंतर मागाहून आत्म्याच्या ठिकाणीं तो नसणार आणि मग डोळा वगैरे ( इंद्रियें ) समुदायामुळें जशीं परावलंबी आहेत तसाच तो होईल.

यदा च तत् उत्पन्नं आत्मनि विद्यते, न तदा आत्मनः

स्वार्थत्वम् । तद्भावाभावापेक्षा हि आत्मानात्मनोः स्वार्थत्व-परार्थत्वसिद्धिः ।

अर्थः—तो चित्प्रकाश उत्पन्न होऊन नंतर आत्म्याच्या ठिकाणीं असतो असें धरलें म्हणजे आत्म्याची स्वार्थता ( स्वतः-सिद्धता किंवा स्वतंत्रता ) नाहीं असें होईल. आत्मा स्वार्थी व अनात्मा परार्थी ( दुसऱ्यावर अवलंबून ) आहे, हें ठरविण्याला मूळ त्या प्रकाशाचें असणें किंवा नसणें ह्या गोष्टी अनुक्रमें कारण आहेत. ।

तस्मात् आत्मनः अन्यनिरपेक्षमेव नित्यचैतन्यज्योतिष्ट्वं सिद्धं ॥ १०१ ॥

अर्थः—ह्यावरून आत्म्याचा नेहमींचा चित्प्रकाश हा दुसऱ्या कशावर अवलबून नाहीं असें झालें.

ननु एवं सति असति प्रमाश्रयत्वे, कथं प्रमातुः प्रमातृत्वं १०२

अर्थः—मग असें जर असेल तर; आत्मा हा प्रमेचा विषयच जर होत नाहीं तर प्रमात्याला प्रमातेपणा कोठून येणार?

उच्यते—प्रमायाः नित्यत्वेऽनित्यत्वे च रूपविशेषाभावात् ।

अर्थः—ऐक. प्रमा नित्य असली काय किंवा नसली काय, स्वरू-पांत कांहीं पालट होत नाहीं.

अवगतिर्हि प्रमा । तस्याः स्मृतीच्छादिपूर्विकायाः अनि-त्यायाः, कूटस्थनित्याया वा, न स्वरूपविशेषो विद्यते, यथा धात्वर्थस्य तिष्ठत्यादेः फलस्य गत्यादिपूर्वकस्य अनित्यस्य अपूर्वस्य नित्यस्य वा रूपविशेषो नास्ति इति तुल्यो व्यपदेशो दृष्टः ' तिष्ठंति मनुष्याः ' ' तिष्ठंति पर्वताः ' इत्यादि,

अर्थः—प्रमेचा अर्थ जाणीव; अगोदर स्मरण, इच्छा वगैरे हो-

ऊन आलेली जाणीव नाशवंत आणि कूटस्थाच्या ठिकाणची काय-मची, ह्या दोन्ही जाणिवांमध्ये कांहीं फरक नाहीं, 'तिष्ठति' उभा रहातो ह्या धातूचा अर्थ दोहींकडे सारखाच लागतो. अगोदर गति होऊन नंतर उभा राहिला म्हणा किंवा अगोदरच उभा होता म्हणा, उभा असण्याच्या क्रियेंत कांहीं भेद नाहीं. माणसें उभीं आहेत, डोंगर उभे आहेत, ह्याप्रमाणें दोन्हीकडे [ चल आणि अचल यांना ] सारखाच तो शब्द लावला जातो.

तथा नित्यावगतिस्वरूपेऽपि प्रमातरि प्रमातृत्वव्यपदेशो न विरुध्यते फलसामान्यात् इति ॥ १०३ ॥

अर्थः—त्याप्रमाणें सदासर्वदा जाणीवरूपानें रहाणाऱ्या आत्म्याच्या ठिकाणी प्रमा शब्द लावला तरी त्याचा परिणाम शेवटीं एकच असल्यामुळें त्याला कांहीं बाध येत नाहीं. ( कूटस्थ चैतन्याला अंतःकरणाच्या उपाधिमुळें प्रमाणाला धरलें काय किंवा विषयाच्या द्वारानें पाहिलें काय, दोन्हींपासून जर आत्म्याची जाणीव हें सारखेंच फल येणार तर त्यांत कांहीं दोष नाहीं. हें तात्पर्य. )

अत्राह शिष्यः—नित्यावगतिस्वरूपस्य आत्मनः अविक्रियत्वात् कार्यकरणैः असंहत्य तक्षादीनां इव वास्यादिभिः कर्तृत्वं नोपपद्यते ।

अर्थः—यावर शिष्य—सदोदीत जाणीवरूपाचा ह्या आत्मा कार्य व साधनें ह्यांच्या योगानें विकार पावत नाहीं ! सुतारानें आपली पटाशी वगैरे हत्यारें घेतली तरी त्याला कर्तेपणा येत नाहीं कसा !

असंहतस्वभावस्य च कार्यकरणोपादाने अनवस्था प्रसज्यते ।

अर्थ— त्याचा स्वभाव समुदायापासून अलिप्त तुम्ही म्हणणार मग त्या कार्याची साधनें वगैरे दिलीं तरी त्याचा उपयोग काय, कितीही केलें तरी व्यर्थच असेर तड लागत नाहीं.

तक्षादीनां तु कार्यकरणैः नित्यमेव संहतत्वामिति चास्यानुपादाने न अनवस्था स्यात् इति ॥ १०४ ॥

अर्थः—सुतार वगैरे लोकांना कार्याला लागणाऱ्या साधनांवांचून केव्हांच चालावयाचें नाहीं. म्हणून त्यांच्या संबंधानें पदार्थी वगैरे हत्यारें असणें अवश्य होतें, त्यामुळें कांहीं चूक होत नाहीं.

इह तु असंहतस्वभावस्य करणानुपादाने कर्तृत्वं नोपपद्यते इति करणं उपादेयम्, तदुपादानं अपि विक्रिया एव इति तत्कर्तृत्वे करणान्तरमुपादेयं, तदुपादानेऽपि अन्यत् इति प्रमातुः स्वातन्त्र्ये अनवस्था अपरिहार्या स्यात् ।

अर्थः—इकडे समुदायवाचक स्वरूप नसलेल्या आत्म्याला कांहीं साधनें दिल्याशिवाय कर्तेपणा येत नाहीं, म्हणून कांहीं साधन लावा, तें साधन म्हणजे तरी कांहीं क्रियेपासून झालेलें, तेव्हां त्याच्या कर्त्याला दुसरें साधन पाहिजे, त्याच्या कर्त्याला तिसरें पाहिजे, याप्रमाणें मूळच्या प्रमात्याला ठिकाणच रहाणार नाहीं, त्याची स्वतंत्रता नाहींशी होईल.

न च क्रियैव आत्मानं कारयति, अनिर्वर्तितायाः स्वरूपाभावात् ।

अर्थः—क्रिया आत्म्याला कर्तृत्व लावते असेंही होत नाहीं, कारण क्रिया झाली नाहीं तोंपर्यंत तिला स्वरूप नाहीं.

अथ अन्यत् आत्मानं उपेत्य क्रियां कारयति इतिचेत् नः अन्यस्य स्वतःसिद्धत्वाविषयत्वाद्यनुपपत्तेः ।

अर्थः—आतां दुसरा कोणी आत्म्याजवळ येऊन त्याच्याकडून क्रिया करवितो असें ह्मणशील तर-तसें नाहीं; तूं जो दुसरा कोणी आणणार त्याच्या अंगीं आपोआप स्फुरण, ( किंवा प्रेरकत्व ) वगैरे धर्म नसणार.

न हि आत्मनः अन्यत् अचेतनं वस्तु स्वप्रमाणकं दृष्टं ।

अर्थः—आत्म्याहून भिन्न असणारी दुसरी जड वस्तु स्वतःसिद्ध पदार्थांत नाहीं

शब्दादि सर्वमेव अवगतिफलावसानप्रत्ययमाश्रितं सिद्धं स्यात् ।

अर्थः—शब्द वगैरे सर्व विषयांची मजल जाणीवरूपीं फल उत्पन्न होईपर्यंत असते हें ठरलेंच.

अवगतिश्चेत् आत्मनोऽन्यस्य स्यात् सोऽपि आत्मैव असंहतः स्वार्थः स्यात्, न परार्थः ।

अर्थः—ज्याची जाणीव होणार तो आत्म्याशिवाय दुसरा ( ईश्वर वगैरे ) धरला तरी तो सुद्धां आत्म्याप्रमाणेंच ( देह वगैरे ) संघातापासून अलिप्त, स्वतंत्र असला पाहिजे, परतंत्र असणार नाहीं.

[ सारांश आत्म्याकडे कर्तृत्व देणें भ्रम आहे, ईश्वराकडे देणें मायेचें कार्य आहे. ]

नच देहेन्द्रियविषयाणां स्वार्थतां अवगन्तुं शक्नुमः अवगत्यवसानप्रत्ययापेक्षसिद्धिदर्शनात् ॥ १०५ ॥

अर्थः—देह, इंद्रियें, विषय ह्यांना स्वतंत्रता आहे असें आ

मच्यानें क्षणवत नाहीं. कारण जाणीव होईपर्यंत ( त्याचा बोध देणारे ) शब्दाची त्या त्या ठिकाणीं जरूर दिसून येते. ( तेव्हां जाणिवेचे विषय ते होतील पण आश्रय होणार नाहींत )

**ननु देहस्यावगतौ न कश्चित् प्रत्यक्षादि प्रत्ययांतरं अपेक्षते ॥ १०६ ॥**

अर्थः—हें पहा, देहाची जाणीव होण्याकरितां कोणी कधीं प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय दुसरा कांहीं उपाय शोधतो काय ? नाहीं.

**बाढं, जाग्रति एवं स्यात् । मृतिसुषुप्तयोस्तु देहस्यापि प्रत्यक्षादिप्रमाणापेक्षैव सिद्धिः ।**

अर्थः—कबूल, जागृत अवस्थेंत असें असतें. मेल्यावर किंवा गाढ झोपेंत सुद्धां देहाविषयीं प्रत्यक्षप्रमाणाशिवाय ती अवस्था ठरण्याला दुसऱ्याची जरूर लागत नाहीं.

**तथैव इंद्रियाणां । बाह्या एव हि शब्दादयो देहेंद्रियाकारपरिणता इति प्रत्यक्षादिप्रमाणापेक्षैव हि सिद्धिः ।**

अर्थः—त्याप्रमाणेंच इंद्रियांची गोष्ट. शब्द वगैरे सर्व बाहेर दिसणारे देह वगैरे इंद्रियांच्या आकारानें परिणाम पावतात ( समजतात ) व ते समजायला प्रत्यक्ष प्रमाणच तेवढें जरूर पडतें.

**सिद्धिः इति प्रमाणफलं अवगतिं अवोचाम, साच अवगतिः कूटस्था स्वयंसिद्धात्मज्योतिःस्वरूपेतिच ॥ १०७ ॥**

अर्थः—सिद्धि म्हणजे प्रमाणाच्या योगानें होणारी प्राप्ति जी जाणीव ती म्हणावी. ती जाणीव कूटस्थ असून स्वतःसिद्ध आत्मप्रकाश हें तिचें रूप आहे.

**अत्राह चोदकः—अवगतिः प्रमाणानां फलं कूटस्थानित्यात्मज्योतिःस्वरूपेतिच प्रतिषिद्धम् ॥**

**अथ अन्यत् आत्मानं उपेत्य क्रियां कारयति इतिचेत् न; अन्यस्य स्वतःसिद्धत्वाविषयत्वाद्यनुपपत्तेः ।**

अर्थः—आतां दुसरा कोणी आत्म्याजवळ येऊन त्याच्याकडून क्रिया करवितो असें ह्मणशील तर-ठसें नाहीं; तूं जो दुसरा कोणी आणणार त्याच्या अंगीं आपोआप स्फुरण, ( किंवा प्रेरकत्व ) वगैरे धर्म नसणार.

**न हि आत्मनः अन्यत् अचेतनं वस्तु स्वप्रमाणकं दृष्टं ।**

अर्थः–आत्म्याहून भिन्न असणारी दुसरी जड वस्तु स्वतःसिद्ध पहाण्यांत नाहीं

**शब्दादि सर्वमेव अवगतिफलावसानमत्ययमापितं सिद्धं स्यात् ।**

अर्थः—शब्द वगैरे सर्व विषयांची मजल जाणीवरूपी फल उत्पन्न होईपर्यंत असते हें ठरलेंच.

**अवगतिश्चेत् आत्मनोऽन्यस्य स्यात् सोऽपि आत्मैव असंहतः स्वार्थः स्यात्, न परार्थः ।**

अर्थः—ज्याची जाणीव होणार तो आत्म्याशिवाय दुसरा ( ईश्वर वगैरे ) धरला तरी तो सुद्धां आत्म्याप्रमाणेंच ( देव वगैरे ) संघातापासून अलिप्त, स्वतंत्र असला पाहिजे, परतंत्र असणार नाहीं.

[ सारांश आत्म्याकडे कर्तृत्व देणें भ्रम आहे, ईश्वराकडे देणें मायेचें कार्य आहे. ]

**नच देहेन्द्रियविषयाणां स्वार्थतां अवगन्तुं शक्नुमः अवगत्यवसानमन्यापेक्षसिद्धिदर्शनात् ॥ १०९ ॥**

अर्थः—देह, इंद्रियें, विषय यांना स्वतंत्रता आहे असें आ·

मच्यानें ह्मणवत नाहीं. कारण जाणीव होईपर्यंत ( त्याचा बोध देणारे ) शब्दाची त्या त्या ठिकाणीं जरूर दिसून येते. ( तेव्हा जाणिवेचे विषय ते होतील पण आश्रय होणार नाहींत )

ननु देहस्यावगतौ न कश्चित् प्रत्यक्षादि प्रत्ययांतरं अपेक्षते ॥ १०६ ॥

अर्थः—हें पहा, देहाची जाणीव होण्याकरितां कोणी कधीं प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय दुसरा कांहीं उपाय शोधतो काय ? नाहीं.

बाढं, जाग्रति एवं स्यात् । मृतिसुषुप्तयोस्तु देहस्यापि प्रत्यक्षादिप्रमाणापेक्षैव सिद्धिः ।

अर्थः—कबूल, जागृत अवस्थेंत असें असतें. मेल्यावर किंवा गाढ झोपेंत सुद्धां देहाविषयीं प्रत्यक्षप्रमाणाशिवाय ती अवस्था ठरण्याला दुसऱ्याची जरूर लागत नाहीं.

तथैव इंद्रियाणां । बाह्या एव हि शब्दादयो देहेंद्रियाकारपरिणता इति प्रत्यक्षादिप्रमाणापेक्षैव हि सिद्धिः ।

अर्थः-त्याप्रमाणेंच इंद्रियाची गोष्ट. शब्द वगैरे सर्व बाहेर दिसणारे देह वगैरे इंद्रियांच्या आकारानें परिणाम पावतात ( समजतात ) व ते समजायला प्रत्यक्ष प्रमाणच तेवढें जरूर पडतें.

सिद्धिः इति प्रमाणफलं अवगतिं अवोचाम, साच अवगतिः कूटस्था स्वयंसिद्धात्मज्योतिःस्वरूपेतिच ॥ १०७ ॥

अर्थः—सिद्धि ह्मणजे प्रमाणाच्या योगानें होणारी प्राप्ति जी जाणीव ती ह्मणावी. ती जाणीव कूटस्थ असून स्वतःसिद्ध आत्मप्रकाश हें तिचे रूप आहे.

अत्राह चोदकः–अवगतिः प्रमाणानां फलं कूटस्थात्मज्योतिःस्वरूपेतिच प्रतिषिद्धम् ॥

अर्थः—यावर शंका. जाणीव ही प्रमाणापासून उत्पन्न होते आणि ती कूटस्थ असून नित्य आत्मप्रकाशरूप आहे. ह्या दोन गोष्टी एकमेकांच्या विरुद्ध आहेत.

इत्युक्तवन्तं आह—न प्रतिषिद्धम् । कथं तर्हि ? कूटस्थानित्यापि सती प्रत्यक्षादिप्रत्ययान्ते लक्ष्यते तादर्थ्यात् । प्रत्यक्षादिप्रत्ययस्य अनित्यत्वे अनित्येव भवति । तेन प्रमाणानां फलं इति उपचर्यते ॥ १०८ ॥

अर्थः—या शंकेचें निवारण—विरुद्ध नाहींत. कशा पहा—जाणीव कूटस्थाच्या ठिकाणीं नित्य आहे खरी, तरी प्रत्यक्ष वगैरे शब्दांनीं त्याच अर्थाचा बोध होऊन त्याचें लक्षण दाखविलें जातें. प्रत्यक्ष वगैरे प्रत्यय अनित्य असल्यामुळें ती जाणीव अनित्य वाटते. ह्याप्रमाणें प्रमाणाचें फल वगैरे उपचाराकरितां गृहीत घेतलें जातें.

यद्येवं भगवन् ! कूटस्थ नित्यावगतिः आत्मज्योतिः स्वरूपैव स्वयंसिद्धा—आत्मानि प्रमाणनिरपेक्षत्वात्—ततोऽन्यत् अचेतनं संहत्यकारित्वात् परार्थम् ।

अर्थः—महाराज, असें असलें तर, कूटस्थाची सदोदीत जाणीव आणि आत्मप्रकाशस्वरूप हें आपोआपच सिद्ध आहे. कारण आत्म्याच्या ठिकाणीं प्रमाणाची जरूर लागत नाहीं आणि त्याशिवाय बाकीच्या वस्तू जड समुदायरूप असल्यामुळें परतंत्र असें झालें.

येनच सुखदुःखमोहप्रत्ययावगतिरूपेण पारार्थ्यं तेनैव स्वरूपेण अनात्मनः आस्तित्वं, नान्येन रूपांतरेण ।

अर्थः—( त्याप्रमाणेंच ) सुख, दुःख, फसवणूक ( वगैरे )

शब्दांच्या बोधावरून त्या [ जड ] पदार्थांचें जसें पारतंत्र्य दिसतें, त्याच प्रकारचें आत्म्याच्या शिवाय इतर पदार्थांचें अस्तित्वही [ खोटें ] असतें; तें दुसऱ्या प्रकारचें असत नाहीं.

अतो नास्तित्वमेव परमार्थतः ।

अर्थः—यावरून खरें पाहिलें तर त्यांचें अस्तित्वच नाहीं.

यथाहि लोके रज्जुसर्पमरीच्युदकादीनां तदवगतिव्यतिरेकेण अभावो दृष्टः, एवं जाग्रत्स्वप्नद्वैतभावस्यापि तदवगतिव्यतिरेकेण अभावो युक्तः ।

अर्थः—( अंधेरांत ) दोरीच्या ठिकाणीं वाटलेला साप किंवा सूर्यकिरणाच्या ठिकाणीं वाटलेलें मृगजल हीं त्यावेळीं झालेल्या जाणिवेच्या शिवाय इतर वेळीं जगतांत जशीं दृष्टीस पडत नाहींत, त्याप्रमाणेंच जागृतींत आणि स्वप्नांत वाटलेलें द्वैत त्या वेळच्या वाटलेल्या खरेपणाशिवाय इतर वेळीं नसलेंच पाहिजे.

एवमेव परमार्थतः भगवन् ! अवगतेः आत्मज्योतिषः नैरन्तर्यभावात् कूटस्थनित्यता अद्वैतभावश्च, सर्वप्रत्ययभेदेषु अव्यभिचारात् ।

अर्थः—महाराज ! तर मग वास्तविक पहातां आत्मप्रकाश आणि जाणीव ह्यांच्यामध्यें ( उत्पत्ति ह० जन्म वगैरे ) कोणच्याही प्रकारचें अंतर ( पडदा ) नसल्यामुळें, आणि कोणच्याही प्रकारचा प्रत्यय लावला असतां तेथें ही ( जाणीव ) आढळावयाचीच, यामुळें कूटस्थाच्या ठिकाणीं नेहमीं अस्तित्व आणि अद्वैतपणा हीं निश्चित झालीं.

प्रत्ययभेदाश्च अवगतिं व्यभिचरन्ति । यथा स्वप्ने नीलपी-

वाद्याकारभेदरूपाः प्रत्ययाः तदवगतिं व्यभिचरन्तः परमार्थतो न संति इति उच्यन्ते, एवं जाग्रत्यपि ।

अर्थः—निरनिराळ्या प्रकारचे शब्द जाणिवेला सोडून असतात. उदाहरण, स्वप्नांत दिसणारे निळा, पिवळा वगैरे रंग, निरनिराळे आकार, यांचा बोध करणारे शब्द त्या त्या जाणिवेला सोडून नसतात, ह्मणजे तेथें ती जाणीव होते पण शब्द नसतात. तोच प्रकार जागृतीत समजावा.

नीलपीतादिप्रत्ययभेदाः तामेवावगतिं व्यभिचरंतः असत्स्वरूपाः भवितुं अर्हंति ।

अर्थः—निळा, पिवळा वगैरे निरनिराळे शब्द त्या त्या प्रकारच्या जाणिवेला सोडून असल्यामुळें ते खोटे आहेत असें ह्मणावयाला हरकत नाहीं.

तस्याश्च अवगतेः अन्यः अवगंता नास्ति इति न स्वेन स्वरूपेण स्वयं उपादातुं हातुं वा शक्यते, अन्यस्यच अभावात् ॥ १०९ ॥

अर्थः—त्या जाणिवेचा जाणणारा दुसरा कोणी नसल्यामुळें त्याला ती आपल्या स्वरूपानें नवीन संपादन करणें किंवा टाकणें दोन्ही गोष्टी करितां येत नाहीत, कारण दुसरें कांहींच नाहीं.

तथेति । एषा अविद्या यन्निमित्तः संसारो जाग्रत्स्वप्नलक्षणः । तस्याः अविद्यायाः विद्या निवर्तिका । इत्येवं त्वं अभयं प्राप्तोऽपि, नातःपरं जाग्रत्स्वप्नदुःखमनुभविष्यसि संसारदुःखान्मुक्तोऽसि ॥ ११० ॥

अर्थः—आतां बरोबर समजलें. जिच्या योगानें जागृती व स्वप्नरूपी संसार लागतो तिलाच अविद्या अथवा अज्ञान ह्मणतात.

ह्या अज्ञानाचा नाश ज्ञानानेंच होणार. मग तुझी सर्व भीति जाईल. त्यानंतर जागेपणी किंवा स्वप्नांत दुःख होणार नाहीं, संसारदुःखातून सुटशील.

ओमिति ॥ १११ ॥

अर्थः—तसेंच होवो.

अवगतिः समाप्ता ।

अर्थः—जाणीवप्रकरण संपलें.

---

मुमुक्षूणां उपात्तपुण्यापुण्यक्षपणपराणां अपूर्वानुपचयार्थिनां परिसंख्यानं इदं उच्यते—

अर्थः—मागील जन्मीं केलेलें पुण्य किंवा पाप भोगून घालविणारे, कांहीं विशेष संपादन करावें ( अज्ञान घालवावें ) असा हेतु धरणारे जे मुमुक्षु असतील त्याच्याकरता परिसंख्यान ( विचार व आचार कसा करावा हें ) प्रकरण सांगतों.

अविद्याहेतवो दोषाः वाङ्मनःकायप्रवृत्तिहेतवः प्रवृत्तेश्च इष्टानिष्टमिश्रफलानि कर्माणि उपचीयंते इति तन्मोक्षार्थम् ११२

अर्थः—अज्ञान असण्याचें कारण पापें, तीं वाणीचीं, मनाचीं, देहाचीं, म्हणजे त्याच्याकडून झालेल्या क्रियेपासून घडलेलीं. त्या क्रियाच्या योगानें चांगलीं, वाईट किंवा अर्धवट अशीं फळें येतात; त्यांच्यापासून सुटका व्हावी याकरितां हें प्रकरण सांगतों.

तत्र शब्दस्पर्शरूपरसगंधानां विषयाणां—श्रोत्रादिग्राह्यत्वात् स्वात्मनि परेषु वा विज्ञानाभावः ।

अर्थः—त्यांत श्रवणेंद्रिय वगैरेचे विषय म्हणजे त्यांच्या द्वारानें

समजणारे जे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ( असे आकाश वगैरे पंच भूतांचे गुण ) त्यांना स्वतःचें किंवा दुसऱ्यांचें ज्ञान नसतें.

तेषामिव परिणतानां यथा लोष्ठादीनां ।

अर्थः—लांकडाचा ठोकळा वगैरे (जड) पदार्थांना जसें आपलें किंवा दुसऱ्यांचें ज्ञान नाहीं, त्याप्रमाणेंच त्या ( वर सांगितलेल्या ) गुणांचें जें वाढलेलें रूप ( देह वगैरे ) त्यांनाही तें ज्ञान नसतें.

येन च ज्ञायंते सः ज्ञातृत्वात् अतज्जातीयः ।

अर्थः—ज्याला तें ज्ञान होतें तो या जाणीव गुणामुळें त्या पंचभूतांच्या गुणांच्या जातीचा नव्हे असें झालें.

तेहि शब्दादयः अन्योन्यसंसर्गित्वात् जन्मवृद्धिविपरिणामापक्षयनाशसंयोगवियोगाविर्भावतिरोभावविकारविकारिक्षेत्रबीजाद्यनेकधर्माणः सामान्येन च सुखदुःखाद्यनेककर्माणः ।

अर्थः—हे शब्द वगैरे एकमेकांच्या सहवासानें अनेक धर्मांचे होतात; ते धर्म असेः—जन्म, वाढ, विकार, मरण्याच वेळीं ऱ्हास, नाश, एकत्र येणें, दूर जाणें, प्रगट होणें, गुप्त होणें, नानाप्रकारचे रोग, स्त्री, पुरुष वगैरे—, साधारणपणें या शब्दादिकांच्या ( उद्धारा ) पासून सुखदुःख वगैरे अनेक कार्यें [ परिणाम ] घडतात.

तद्धि ज्ञातृत्वादेव तद्विज्ञाता सर्वशब्दादिधर्मविलक्षणः ॥ ११३ ॥

अर्थः—यांना जाणणारा ज्ञानामुळेंच या शब्दादिकांच्या धर्मापासून वेगळा [ त्यांचा स्पर्श न होणारा ] असतो असें होतें.

तत्र शब्दादिभिः उपलभ्यमानैः पीड्यमानो विद्वान् एवं परिसंचक्षीत ॥ ११४ ॥

अर्थः—म्हणून ह्या शब्द वगैरे विषयांपासून उत्पन्न होणाऱ्या विकारानें त्रास पावलेल्या शहाण्या मनुष्यानें वर सांगितल्याप्रमाणें विचार करावा.

शब्दस्तु ध्वनिसामान्यमात्रेण विशेषधर्मैर्वा षड्जादिभिः प्रियैः स्तुत्यादिभिः इष्टैः अनिष्टैश्च असत्यबीभत्सपरिभवाक्रोशादिभिः वचनैः मां दृक्स्वभावं असंसर्गिणं अविक्रियं अचलं अनिधनं अभयं अत्यन्तसूक्ष्मं गोचरीकृत्य स्प्रष्टुं नैवार्हति, असंसर्गित्वात् एव मां।

अर्थः—[ आकाशाचा गुण ] शब्दाचे प्रकार दोन— १ सर्व साधारण आवाज, २ विशेष प्रकारचे सारिगमपधनिसा हे सहा [ गायनाचे ] स्वर, आवडणारे, स्तुति करणारे, मनाप्रमाणें, मनाविरुद्ध, खोटें, ग्राम्य, पराजय दाखविणारे, रडण्याचे; ह्या कोणत्याही प्रकारच्या शब्दाच्या आटोक्यांत मी सांपडत नाहीं. कारण मला कशाचाही संपर्क लागत नाहीं. मी आत्मा ज्ञानस्वरूप, संसर्गरहित, निष्क्रिय, स्थिर, अमर, भीति नसलेला, अगदीं सूक्ष्म आहें.

अत एव न शब्दनिमित्ता हानिर्वृद्धिर्वा ।

अर्थः—म्हणून शब्दांनीं माझा फायदा किंवा तोटा कांहींच होणार नाहीं.

अतो मां किं करिष्यति स्तुतिर्निंदादिभिःप्रियाप्रियत्वादिलक्षणः शब्दः ।

अर्थः—तेव्हां गुण गाणें, शिव्या देणें वगैरे किंवा आवडीनावडीचे वगैरे प्रकारच्या शब्दांनीं मजें [ कमी जास्ती ] काय होणार !

.. अविवेकिनं हि शब्दं आत्मत्वेन गतं प्रियः शब्दो वर्धयेत् अप्रियश्च क्षपयेत्, अविवेकित्वात् ।

अर्थः—ज्या अविचारी मनुष्यानें शब्दांशीं आपलें तादात्म्य करून घेतलें असेल, त्याच्या मूर्खपणामुळें त्याला गोड बोलल्यास त्याला मूठभर मांस वाढेल किंवा शिव्या दिल्या तर तें [ मांस ] घटेल [ कमी होईल. ]

ननु मम विवेकिनः वालाग्रमात्रमपि कर्तुमुत्सहते इति ।

अर्थः—परंतु माझ्यासारख्या विचारी मनुष्याचें ते ( शब्द ) एक केंसभरही ( वांकडें ) करणार नाहींत.

एवमेव स्पर्शसामान्येन तद्विशेषैश्च शीतोष्णमृदुकर्कशादि-ज्वरोदरशूलादिलक्षणैश्च अप्रियैः प्रियैश्च कैश्चित् शरीरसमवायिभिः बाह्यागंतुकनिमित्तैश्च न मम काचित् क्रिया वृद्धिहानिलक्षणा अस्पर्शत्वात् क्रियते, व्योम्न इव मुष्टिघातादिभिः ।

अर्थः—त्याप्रमाणें स्पर्शाचें तो ( वायूचा गुण ) सामान्य घ्या किंवा विशेष घ्या. थंड, कढत, मऊ कठीण वगैरे किंवा ताप, उदर, पोटदुखी वगैरे रोगांतला, आवडता, नावडता, शरीरांतला किंवा बाहेरचा उसना आलेला—ह्या स्पर्शानें मला कांहीं वाढ किंवा कमीपणा येत नाहीं. मी स्पर्शातीत आहें, मुठीनीं आकाशाला गुद्दे मारले तर कोणाला लागणार

तथा रूपसामान्येन तद्विशेषैश्च प्रियाप्रियैः स्त्रीव्यंजनादि-लक्षणैः अरूपत्वात् न मम काचित् हानिः वृद्धिर्वा क्रियते ।

अर्थः—तसेंच रूप (अग्नीचा गुण) घ्या. सामान्य किंवा विशेष घ्या. आवडनावडीचें, बायकांच्या सारखें वगैरे मनमोहक घ्या. मी रूपरहित असल्यामुळें त्या रूपानें माझें नुकसान किंवा फायदा होत नाहीं.

तथा रससामान्येन तद्विशेषैश्च प्रियाप्रियैः मधुराम्ललवणकटुतिक्तकषायैः मूढबुद्धिभिः परिगृहीतैः अरसात्मकस्य मम न काचित् हानिः वृद्धिर्वा क्रियते ।

अर्थः—त्यासारखाच ( अप् त्याचा गुण ) रस. सामान्य असो किंवा अज्ञान लोकांनीं मानलेला आवडनावडीचा, गोड, आंबट, खारट, कडु, तिखट असला विशेष रस असो. मी रसाच्या पलीकडे असल्यामुळें त्यानें माझा तोटा नफा होत नाहीं.

तथा गंधसामान्येन तद्विशेषैश्च प्रियाप्रियैः पुष्पाद्यनुलेपनादिलक्षणैः अगंधात्मकस्य मम न काचित् हानिः वृद्धिर्वा क्रियते ।

अर्थः—तीच गोष्ट गंधाची. मग तो सामान्य गंध ( पृथ्वीचा गुण ) असो किंवा फुलांचा किंवा अनेक तऱ्हेच्या उटण्यांचा असला विशेष प्रकारचा असो. गंधातीत मी आहें, मला त्या गंधानें अधिक उणें कांहीं होणार नाहीं.

" अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथारसं नित्यमगंधवच्च यत् ". इति श्रुतेः ॥ ११५ ॥

अर्थः—शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्या पंच महाभूतांच्या गुणाचा आत्म्याला लेप नाहीं, तो अविनाशी आणि नेहमीं रहाणारा आहे, अशी श्रुति आहे.

किंच—ते एवं बाह्याः शब्दादयः ते शरीराकारेण संस्थिताः, तद्ग्राहकैश्च श्रोत्राद्याकारैः, अंतःकरणद्वयतद्विषयाकारेणच, अन्योन्यसंसर्गित्वात् संहतत्वाच्च सर्वक्रियासु ।

अर्थः—आणखी—तेच शब्द वगैरे गुण बाहेर प्रकट झाले म्हणजे शरीर ( इंद्रियें वगैरे ) या आकृतीनें दिसतात, ते ग्रहण

करणारे काल वगैरे असतात, दोन्ही अंतःकरणें आणि त्यांत अनुभवास येणारे विषय हे त्याचेंच दृश्य रूप होय. एकमेकांवर त्यांचा परिणाम होऊन सर्व प्रकारच्या क्रियांमध्यें ते मिळून काम करतात.

तत्र एवं सति विदुषो न मम कश्चित् शत्रुः मित्रं उदासीनो वा अस्ति ।

यामुळें माझ्यासारख्या ज्ञानी मनुष्याला कोणी शत्रु, मित्र किंवा तिऱ्हाईत नसतो.

तत्र यदि कश्चित् मिथ्याज्ञानाभिमानेन प्रियं अप्रियं वा प्रयुयुक्षेत क्रियाफललक्षणं सन्मृषैव प्रयुयुक्षते सः, तस्याविषयाऽहम्, ' अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयं ' इति स्मृतेः ।

अर्थः—त्यांत जर कोणी खोट्या ज्ञानाचा अभिमान धरून दुसऱ्या क्रियेचा परिणाम मला आवडता किंवा नावडता झाला असें म्हणेल तर त्यानें तें खोटें आपल्याला लावून घेतलें असें होईल. कारण मी त्या [ गुणां ]चा विषयच होऊं शकत नाहीं. हा [ आत्मा ] व्यक्त नाहीं, याचें चिंतन करतां येत नाहीं. अशी स्मृति आहे.

तथा सर्वेषां पञ्चानामपि भूतानां अविकार्यः अविषयत्वात् ' अच्छेद्योऽयमदाह्योऽयं ' इति स्मृतेः ।

अर्थ.—त्याप्रमाणेंच पांचही भूतांपैकीं कोणाच्याही पासून हा [ आत्मा ] विकार पावत नाहीं, कारण तो त्याचा विषयच नाहीं. हा आत्मा तोडला जात नाहीं, जाळला जात नाहीं, अशी स्मृति आहे.

याऽपि शरीरेंद्रियसंस्थानमात्रमुपलभ्य भक्तानां विप-

रीतानां च क्रिया, क्रियादिमयुयुक्षा, तज्जाच धर्माधर्मादिमाप्तिः सा तेषामेव, न तु मयि अजरे अमृते अभये, ' नैनं कृताकृते तपतः ' ' न कर्मणा वर्धतेनो कनीयान् ' ' सबाह्याभ्यंतरो ह्यजः ' ' न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ' इत्यादि श्रुति-स्मृतिभ्यः ।

अर्थः—माझे भक्त [माझ्यावर प्रेम करणारे] किंवा इतर कोणाची क्रिया ह्या शरीर, प्राणी वगैरे समुदायाच्या संबंधानें जी असेल किंवा क्रियादि वगैरे करण्याची इच्छा असेल किंवा त्यापासून होणारें जें पुण्यपाप असेल, तें सर्व त्यांचें त्यांना, मला कांहीं नाहीं. मला जरा ( म्हातारपण ), मरण, भीति नाहीं. ह्याला आधार खालील अर्थाच्या श्रुति व स्मृति आहेत कर्म किंवा अकर्म बाधत नाहीं; कर्मानें वाढत नाहीं किंवा लहान होत नाहीं; आंत बाहेर तोच जन्मरहित आहे; सर्वांच्या पलीकडे तो असल्यामुळें हें जनाचें दुःख त्याला पीडा देत नाहीं.

अनात्मवस्तुनश्च असत्वात् इति परमो हेतुः । आत्मनश्च अद्वयत्वविषयाणि द्वयस्य असत्वात्—यानि सर्वाणि उपनिषद्वाक्यानि विस्तरशः समीक्षितव्यानि समीक्षितव्यानि ।

अर्थः— आत्म्यावाचून दुसरी वस्तूच नाहीं, हें काय तें मुख्य कारण. केव्हां द्वय मुळीच नसल्यामुळें आत्म्याचें अद्वैत प्रतिपादन करणारीं जी वाक्यें उपनिषदामध्यें आहेत तीं विस्तारासहित नीट पहावीं व वाचावीं.

इति श्रीमच्छंकरभगवत्पादकृतौ उपदेशसहस्र्यां गद्यप्रबंधः समाप्तः

अर्थः—उपदेशसहस्री गद्यभाग येथें संपला.

---

# पद्यबंधप्रबंधः

चैतन्यं सर्वगं सर्वं सर्वभूतगुहाशयं ।
यत् सर्वविषयातीतं तस्मै सर्वविदे नमः ॥ १ ॥

अर्थः—हें चैतन्य सर्व ठिकाणीं भरलेलें आहे, तेंच सर्व आहे, सर्व प्राणिमात्रांच्या बुद्धीमध्यें तेंच रहातें, सर्व विषयांपासून तें निराळें आहे, सर्व प्रकारचें ज्ञान त्याला आहे, त्या चैतन्याला नमस्कार करितों.

समाप्य क्रियाः सर्वाः दाराग्न्याधानपूर्विकाः ।
ब्रह्मविद्यामथेदानीं वक्तुं वेदः प्रचक्रमे ॥ २ ॥

अर्थः—लग्न करून अग्निहोत्र पाळणें वगैरे सर्व कर्में यथासांग संपवून नंतर वेदांत ब्रह्मज्ञान सांगण्याला आरंभ केला आहे.

कर्माणि देहयोगार्थं देहयोगे प्रियाप्रिये ।
ध्रुवे स्यातां ततो रागो द्वेषश्चैव ततः क्रियाः ॥ ३ ॥

अर्थः—कर्में केलीं असतां देहाचा संबंध येणार ( देह घ्यावा लागणार ); देह आला ( संसारांत पडला ) कीं सुख आणि दुःख कायमचें येतें. त्याविषयीं प्रेम येतें, किंवा तिटकारा येतो, त्यामुळें ( पुनः ) कर्म घडतें.

धर्माधर्मौ ततोऽज्ञस्य देहयोगस्तथा पुनः ।
एवं नित्यप्रवृत्तोऽयं संसारश्चक्रवद् भृशं ॥ ४ ॥

अर्थः—त्यापासून ( अभिमान उत्पन्न होऊन ) ब्रह्माची जाणीव विसरते, मग अमूक केलें पाहिजे, अमूक टाकलें पाहिजे असें वाट-

तें, त्यापासून पुन्हां देह येतो. याप्रमाणें हें संसाराचें रहाट गाडगें एकसारखें चालू आहे.

अज्ञानं तस्य मूलं स्यात् इति तद्धानमिष्यते ।
ब्रह्मविद्याऽत आरब्धा ततो निःश्रेयसं भवेत् ॥ ५ ॥

अर्थः–या सगळ्यांच्या मूळाशीं अज्ञान आहे, तेव्हां तें समूळ दूर टाकावें; याकरितां ब्रह्मज्ञानाचा आरंभ केला आहे. त्यापासून कल्याण होईल.

विद्यैवाज्ञानहानाय न कर्माप्रतिकूलतः ।
नाज्ञानस्याप्रहाणे हि रागद्वेषक्षयो भवेत् ॥ ६ ॥

अर्थः–हें अज्ञान घालविण्याचें सामर्थ्य फक्त विद्येला आहे. कर्म त्या ( अज्ञाना ) ला प्रतिकूल [ विरुद्ध ] नसल्यामुळें त्याच्याकडून तें कार्य होणार नाहीं. अज्ञान घालविल्याशिवाय प्रेम, तिटकारा वगैरे द्वंद्वाचा क्षय होणार नाहीं.

रागद्वेषक्षयाभावे कर्म दोषोद्भवं ध्रुवम्।
तस्मान्निःश्रेयसार्थाय विद्यैवात्र विधीयते ॥ ७ ॥

अर्थः–आवडनावड जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत दोष उत्पन्न होणार, व कर्म घडणार; तेव्हां कल्याणरूपी मोक्ष मिळण्याला (एक) ज्ञान येवढेंच साधन आहे.

ननु कर्म तथा नित्यं कर्तव्यं जीवने सति ।
विद्यायाः सहकारित्वं मोक्षं प्रति हि तद् व्रजेत् ॥ ८ ॥

अर्थः–-( कोणी म्हणतील कीं ) जोंपर्यंत आयुष्य आहे, तोंपर्यंत नित्य ( कांहीं तरी ) कर्म घडणारच. तेव्हां तें कर्म विद्येला जोडीदार घेऊन मोक्ष प्राप्त करून देईल (असें म्हणत कां नाहीं)!

यथा विद्या तथा कर्म चोदितत्वाविशेषतः ।
प्रत्यवायस्मृतेश्चैव कार्यं कर्म मुमुक्षुभिः ॥ ९ ॥

अर्थः—विद्या संपादन करायला सांगितली तसाच कर्म करण्याविषयीं नियम घातला. कर्म न केलें तर दोष लागेल असें मनुस्मृति ह्मणते. तेव्हां मोक्षाची इच्छा करणारानीं सुद्धां कर्म केलेंच पाहिजे.

ननु ध्रुवफला विद्या नान्यत्किंचिदपेक्षते ।
नाग्निष्टोमो यथैवान्यत् ध्रुवकार्यो ह्यपेक्षते ॥ १० ॥

अर्थः—विद्या (एकटी) शाश्वत फल देण्यास समर्थ आहे, तिला दुसऱ्या कशाची जोड लागत नाहीं. अग्निष्टोम वगैरे यज्ञाला जसें ( त्या देवतेचें ज्ञान वगैरे ) दुसरें कर्म करावें लागतें तशी विद्येला जरूर नाहीं.

तथा ध्रुवफला विद्या कर्म नित्यमपेक्षते ।
इत्येवं केचिदिच्छन्ति न कर्म प्रतिकूलतः ॥ ११ ॥

अर्थः—काहीं लोकांचें ह्मणणें की विद्या शाश्वत फल देते पण तिला कर्माची जरूर आहे. ( पण तसें ) नाहीं, कर्माचा विद्येशीं विरोध आहे.

विद्यायाः प्रतिकूलं हि कर्म स्यात् साभिमानतः ।
निर्विकारात्मबुद्धिश्च विद्येतीह प्रकीर्तिता ॥ १२ ॥

अर्थः—( विरोध कसा ? ) विद्येचा कर्मांशीं विरोध येतो तो असा. अहंकार धरल्याशिवाय कर्म घडत नाहीं, आणि ( अहंकार वगैरे ) विकाररहित जी आत्म्याविषयीं बुद्धि ( निश्चय ) तिला विद्या असें ह्मणतात. ( तेव्हां विरोध आला. )

अहं कर्ता ममेदं स्यात् इति कर्म प्रवर्तते ।
वस्त्वधीना भवेद्विद्या कर्त्रधीनो भवेद्विधिः ॥ १३ ॥

अर्थः—मी कर्ता, मला हें मिळालें पाहिजे असा ( अभिमानपूर्वक ) हेतु ( मनांत ) धरल्यावांचून कर्म होत नाहीं; विद्या ही वस्तूच्या स्वाधीन असते ( जसली वस्तु असेल त्या प्रकारचेंच ज्ञान असतें ) आणि कर्म तर कर्त्याच्या स्वाधीन असतें ( तशी वस्तु परतंत्र नाहीं, स्वतंत्र आहे. )

कारकाण्युपमृद्नाति विद्या बुद्धिमिवोषरे ।
इति तत्सत्यमादाय कर्म कर्तुं व्यवस्यति ॥ १४ ॥

अर्थः—वालुकाप्रदेशांत वाटलेली ( पाण्यासंबंधची ) बुद्धि (भ्रम) हा वालुका प्रदेश आहे या ज्ञानानें जशी मावळते, त्याप्रमाणें ज्ञान झालें म्हणजे मग कर्माचीं साधनें सर्व टाकायला येतात.

विरुद्धत्वादतः शक्यं कर्म कर्तुं न विद्यया ।
सहैव विदुषा तस्मात् कर्म हेयं मुमुक्षुणा ॥ १५ ॥

अर्थः—याप्रमाणें कर्म आणि विद्या यांचा विरोध असल्यामुळें विद्येच्याबरोबर कर्म करतांच येत नाहीं. याकरितां शहाण्या मुमुक्षूनें कर्म टाकलें पाहिजे.

देहाद्यैरविशेषेण देहिनो ग्रहणं निजम् ।
प्राणिनां तदविद्योत्थं तावत् कर्मविधिर्भवेत् ॥ १६ ॥

अर्थः—देह ( बुद्धि, इंद्रियें ) वगैरे यांच्यापासून भेद न करितां आत्म्याची ( अशा गुणांचा, ब्राह्मण वगैरे देह आलेला मी अशी ) जाणीव होते, ती अज्ञानानें होते; आणि तशी समज आहे तोंपर्यंत कर्म ( कांडांत सांगितलेला ) विधि ( योग्य प्रकारें ) केला पाहिजे.

नेतिनेतीति देहादीन् अपोह्यात्माऽविशेषितः ।
अविशेषात्मबोधार्थं तेनाविद्या निवर्तिता ॥ १७ ॥

अर्थः–देह वगैरे ( ज्यांच्याविषयी ह्यासुद्धा मी आत्मा असें म्हणत होतों ते ) प्रत्येक घेऊन देह आत्मा नव्हे, मन आत्मा नव्हे, अशा विचारानें त्यांचा त्याग केल्यावर फक्त आत्मा राहील. ह्याप्रमाणें इतर संघाताचा त्याग केलेल्या आत्म्याचा बोध झाल्यावर अविद्या नाहीशी होईल.

निवृत्ता सा कथं भूयः प्रसूयेत प्रमाणतः ।
असत्येवाविशेषेऽपि प्रत्यगात्मनि केवले ॥ १८ ॥

अर्थ—निर्विशेष ( देहादिसंघातरहित ) केवल प्रत्यग् आत्म्याच्या ठिकाणी खोटी वाटणारी अविद्या प्रमाणाच्या योगेंकरून ( एकदा ) काढून टाकल्यावर ती पुनः उत्पन्न होईल काय ?

न चेद् भूयः प्रसूयेत कर्ता भोक्तेति धीः कथं ।
सदस्मीति च विज्ञाने तस्माद्विद्याऽसहायिका ॥ १९ ॥

अर्थः–मी सत् आहें असा अनुभव आल्यावर पुनः ती उत्पन्न होत नाहीं; मग मी कर्ता, मी भोक्ता ही बुद्धि तरी कशी राहील ? राहणार नाहीं. तेव्हां सारांश विद्येला (कर्मांचें) सहाय्य लागत नाहीं

अत्यरेचयदित्युक्तो न्यासः श्रुत्याऽत एव हि ।
कर्मभ्यो मानसान्तेभ्य एतावदिति वाजिनाम् ॥ २० ॥
अमृतत्वं श्रुतं यस्मात् त्याज्यं कर्म मुमुक्षुभिः ।

अर्थः–तैत्तरीय उपनिषदांत ( सत्य तप वगैरे ) मानसिक कर्मे मोक्षाचीं साधनें आहेत तीं करावीं असें सांगून शेवटीं संन्यास घ्यावा अशी प्रशंसा केली आहे. वाजसनीय शाखेच्या बृहदारण्यक उपनिषदांत सांगितलें आहे कीं ( हे मैत्रेया, आतांपर्यंत तुला सर्व

ज्ञान दृष्टांतांनी सांगितलें ) हेंच मोक्ष देईल. तेव्हां मुमुक्षूनें कर्मांचा त्यागच केला पाहिजे.

अग्निष्टोमवदित्युक्तं तत्रेदमभिधीयते ॥ २१ ॥
नैककारकसाध्यत्वात् फलान्यत्वाच्च कर्मणः ।
विद्या तद्विपरीताऽतो दृष्टान्तो विषमो भवेत् ॥ २२ ॥

अर्थः—( कोणी म्हणेल कीं ) अग्निष्टोम वगैरे यज्ञात सांगितल्याप्रमाणेंच ना ? त्यावर उत्तर असें आहे कीं अग्निष्टोम वगैरे कर्मांला किती तरी साधनें व उपकरणसामुग्री लागते व त्यांचीं फळें सुद्धां निरनिराळीं आहेत. पण विद्येची गोष्ट याच्याहून निराळी आहे, म्हणून तुम्ही दिलेला दृष्टांत लागू पडत नाहीं.

कृष्यादिवत् फलार्थत्वात् अन्यकर्मोपबृंहणम् ।
अग्निष्टोमस्त्वपेक्षेत विद्याऽन्यत् किमपेक्षते ॥ २३ ॥

अर्थः—शेतकी, व्यापार वगैरेमध्यें फल ( नफा ) मिळविण्याकरितां दुसऱ्या कर्मांची परंपराच वाढवावी लागते, त्याप्रमाणेंच अग्निष्टोमाची गोष्ट आहे. पण विद्येपासून ( मोक्षाशिवाय ) दुसऱ्या कशाचीही प्राप्ति करून घेण्याची इच्छा असते काय ?

प्रत्यवायस्तु तस्यैव यस्याहंकार इष्यते ।
अहंकारफलार्थित्वे विद्येते नात्मवेदिनः ॥ २४ ॥

अर्थः—ज्याला अभिमान ( घट्ट ) धरून बसावयाचें असेल त्याला ( कर्म केलें नाहीं तर पाप लागतें वगैरे ) प्रत्यवाय लागू पडणार. पण आत्म्याचें ज्ञान करून घेण्याची इच्छा धरणाराला अभिमान नसतो आणि फलाची आशाही नसते.

तस्मादज्ञानहानाय संसारविनिवृत्तये ।
ब्रह्मविद्याविधानाय प्रारब्धोपनिषत्त्वियम् ॥ २५ ॥

अर्थः—याकरितां, अज्ञान काढून टाकावें आणि त्यापासून संसारांतून सुटका व्हावी म्हणून ब्रह्म ( जाणण्याची ) विद्या सांगण्याकरितां या वेदांत ग्रंथाला आम्ही आरंभ करितों.

सदरूपनिपूर्वस्य क्विपि चोपनिषद्भवेत् ।
मंदीकरणभावाच्च गर्भादेः शातनात्तथा ॥ २६ ॥

अर्थः—सद् या धातूला उप आणि नि हे दोन उपसर्ग लागून क्विप प्रत्ययाच्यामुळें उपनिषत् हा शब्द झाला आहे. याचा अर्थ गर्भ वगैरे म्हणजे संसारपरंपरा मंद करणारा—व तसाच जास्त अधिकारी असल्यास ती परंपरा समूळ तोडणारा—असा हा ग्रंथ आहे.

इति उपोद्घातप्रकरणम् ।
हा उपोद्घात झाला.

---

अथ आत्मज्ञानोत्पत्तिप्रकरणम्
मी कोण ?

प्रतिषेध्दुमशक्यत्वात् नेतिनेतीति शेषितम् ।
इदं नाहमिदं नाहं इत्यद्धा प्रतिपद्यते ॥ १ ॥

अर्थः—हा ( देह ) मी नव्हे, हें ( इंद्रियें वगैरे ) मी नव्हे याप्रमाणें सकळ दृश्य वगैरेला नकार म्हणता म्हणतां शेवटीं जें शिल्लक राहिलें, त्याचा निषेध करितां येईना, तेव्हां तेंच साक्षात् ( ब्रह्म ) असें ठरलें.

अहंधीरिदमात्मोत्था वाचारंभणगोचरा ।
निषिद्धात्मोद्भवत्वात् सा न पुनर्मानतां व्रजेत् ॥ २ ॥

अर्थः—खोट्या जड स्वरूपावर जागणारी मी हा अशी जी

बुद्धि ही आत्म्यापासून उत्पन्न झालेली खरी नाहीं अशी समज शास्त्राच्या मदतीनें झाल्यानंतर ही पुनः प्रमाणशीर होणार नाहीं.

पूर्वबुद्धिमबाधित्वा नोत्तरा जायते मतिः ।
दृशिरेकः स्वयंसिद्धः फलत्वात् स न बाध्यते ॥ ३ ॥

अर्थः—पूर्वीच्या अज्ञानपूर्ण बुद्धीचा समूळ नाश न होतां पुढें ज्ञानबुद्धि उत्पन्न होत नाहीं. ज्ञान हें एक आहे, तें स्वतःसिद्ध आहे, तें अमक्या साधनानें प्राप्त होतें असें म्हटल्यानें त्याच्या स्वरूपांत कांहीं बदल होतो असें नाहीं.

इदं घनमतिक्रम्य शोकमोहादिदूषितम् ।
वनाद्गांधारको यद्वत् स्वात्मानं प्रतिपद्यते ॥ ४ ॥

अर्थः—कोणा एका गांधार देशांतल्या मनुष्याला चोरांनी लुटून त्याचे डोळे बांधून रानांत टाकून दिला. तेथें त्याचें रडणें ओरडणें ऐकून कोणी दयाळू मनुष्यानें त्याचे डोळे सोडून त्याच्या घरच्या वाटेला त्याला लावला. तेथून तो मार्ग विचारीत विचारीत आपल्या घरीं गेला. त्याप्रमाणें शोक मोह वगैरे क्लेशांनी भरलेल्या या देहरूपी रानांत प्राप्त झालेला प्राणी आचार्यांच्या मदतीनें या रानांतून वाटेला लागून आत्मरूप म्हणून जें त्याचें मूळस्थान त्याजप्रत पोहोंचेल.

---

### ईश्वरात्मप्रकरणम्—
### ईश्वर आणि आत्मा—

ईश्वरश्चेदनात्मा स्यात् नासावस्मीति धारयेत् ।
आत्मा चेदीश्वरोऽस्मीति विद्या सान्यनिवर्तिका ॥ १ ॥

अर्थः—[ जगाच्या उत्पत्तीला कारण म्हणून धरलेला ] ईश्वर तोच

भ्रम काय ! तसें असेल तर तो आत्म्याहून निराळा होईल, आणि मी तो नाहीं तेव्हां कसें ! ईश्वर तोच आत्मा आणि तोच मी असें समजावें ह्या भ्रमज्ञानाच्या योगानें अविद्या नाहींशी होईल.

आत्मनोऽन्यस्य चेद्धर्मा अस्थूलत्वादयो मताः ।
अज्ञेयत्वेऽस्य किं तैः स्यात् आत्मत्वे त्वन्यधीर्हृतिः ॥२॥

अर्थः—अस्थूल ( मोठा नाहीं ) वगैरे आत्म्याचे धर्म हे त्या दुसऱ्याला ( ईश्वराला ) आहेत असें मानलें तर तुमच्या मतानें आत्म्याहून भिन्न ( जो ईश्वर ) तो कळण्यासारखा नाहीं असा असल्यानें त्या अस्थूल वगैरे धर्मांचा आपल्याला काय उपयोग? पण तो ईश्वर, आत्मा आणि मी हे एक आहेत असें समजलें कीं, आपली जी निराळ्या प्रकारची ( म्हणजे मी लठ्ठ, मी रोड अशी ) बुद्धि झाली होती ती नाहींशी होईल आणि मी ह्या सर्व धर्मांहून निराळा आहें असें कळेल.

मिथ्याध्यासनिषेधार्थं ततोऽस्थूलादि गृह्यताम् ।
परत्र चेन्निषेधार्थं शून्यतावर्णनं हि तत् ॥ ३ ॥

अर्थः—( मी देह आहें वगैरे जो ) खोटा भास ( तो ) घालविण्याकरितां आत्म्याच्या ठिकाणीं अस्थूल वगैरे धर्म घ्यावे लागतात. ते धर्म त्याच्याशिवाय इतर ठिकाणीं ( म्हणजे जडाच्या ठिकाणीं ) ( स्थूलत्व वगैरेचा ) निषेध करण्याकरितां धरूं लागल्यास तें शून्यतेचें वर्णन केल्यासारखें होईल. जडाला अजडत्व ( चैतन्य धर्म ) लावणें म्हणजे उगीच फुकट श्रम नव्हेत काय ?

बुभुत्सोर्यदि चान्यत्र प्रत्यगात्मन्न इष्यते ।
अप्राणो ह्यमनाः शुभ्र इति चानर्थकं वचः ॥ ४ ॥

अर्थः—प्रत्यगात्मा जाणणाऱ्या पुरुषाला सोडून दुसऱ्याच्या

ठिकाणीं ते घरे लावूं लागल्यास तूं प्राण नव्हेस, स्वच्छ आहेस असें श्रुतीचें वचन व्यर्थ होईल.

---

अथ तत्त्वज्ञानस्वभावप्रकरणं ।

ब्रह्मज्ञान ह्मणजे काय ?

अहंप्रत्ययबीजं यत् अहंप्रत्ययवत्स्थितं ।
नाहंप्रत्ययवत्प्लुष्टं कथं कर्म प्ररोहति ॥ १ ॥

अर्थः–मीच आत्मा आहें असा अनुभव ज्याच्या ठिकाणीं येतो त्या अंतःकरणांत असलेला मी प्रत्ययाचा जो अभिमान तोच सर्व कर्माचें बीज ( मूळ कारण ) आहे. मी ( कर्ता, भोक्ता ) नाहीं अशा ज्ञानरूप अग्नीनें तें बीज जाळून टाकल्यावर, मग कर्म कसें वाढेल, ( तें तेथेंच नाहींसें होईल. )

दृष्टश्चेत्प्ररोहः स्यात् नान्यकर्मा स इष्यते ।
तन्निरोधे कथं तरस्मात् पृच्छामो वस्तदुच्यताम् ॥२॥

अर्थः–ज्ञानी मनुष्याला सुद्धां कर्मे सुटल्यावर [ भिक्षा मागणें वगैरे ] कर्म करावें लागतें. ह्या आत्माला प्रत्यक्ष (इष्ट) दिसणाऱ्या कर्माच्या प्रमाणें तें [ अदृष्ट कर्म ] ही वाढत असेल. अहंकार [ कर्माचें कारण तो ] गेला असूनहि कर्म घडतें हें कसें असें आम्ही विचारतों, त्याचें उत्तर सांगा.

देहाद्यारम्भसामर्थ्यात् ज्ञानं सद्विषयं त्वयि ।
अभिभूय फलं कुर्यात् कर्मान्ते ज्ञानमुद्भवेत् ॥ २३ ॥

अर्थः ज्या पूर्व कर्माच्या जोरानें तुला हा देह प्राप्त झाला त्याचें बळ फार असेल तर तुझ्या ठिकाणीं झालेलें जें उत्तम विषयाचें ( ब्रह्माचें ) ज्ञान त्याला तें कर्म जिंकून आपला प्रभाव

देहाचा आभास वगैरे दाखवील हें संभवनीय आहे. पण ( उप-भोगानें ) त्या कर्मांचा शेवट झाल्यावर मग ( कोणचाही प्रति-बंध नसलेलें ) ज्ञान उत्पन्न होईल.

आरब्धस्य फले ह्येते भोगो ज्ञानं च कर्मणः।
अविरोधस्तयोर्युक्तो वैधर्म्यं चेतरस्य तु ॥ ४ ॥

अर्थः—आरब्ध कर्मापासून ( प्रारब्धानें ) भोग आणि ज्ञान हीं दोन्ही फलें येणें शक्य आहे, त्यांच्यात विरोध नाहीं, पण इतर कर्में म्हणजे संचित आणि क्रियमाण यांचा आणि ज्ञानाचा मात्र मेळ बसणार नाहीं.

देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम्।
आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते ॥ ५ ॥
यतः सर्वमिदं सिद्धं प्रयोगोऽस्याभिगीरितः ।

अर्थः—देहाला आत्मा म्हणून म्हणणाऱ्या लौकिक मनुष्याच्या ज्ञानाप्रमाणें [ तें जितकें दृढ असतें तितकें ] देहाला आत्मा म्हणणाऱ्या ( ज्ञानाचा अर्थात् ) अज्ञानाला घालविणारें ज्ञान ज्याला आत्म्याच्या संबंधानें झालें त्याच्या मनांत नसलें तरी तो मुक्त होईल.

जो गोष्ट सांगणार, आम्हीं आरंभ केला ती ह्यावरून सिद्ध झाली.

---

अथ बुद्धचपलापप्रकरणं

बुद्धदोष—

मृगार्भको यथोदङ्को नागृहीदमृतं यथा ।
कर्मनाशभयाज्जन्तोः आत्मज्ञानाग्रहस्तथा ॥ १ ॥

अर्थः—इंद्रानें चांडाळ वेषानें आणलेलें ( व हस्तांत धरलेल्या भांड्यातलें ) अमृत पाहून तें मूत्र आहे अशी शंका उत्तङ्क नावाच्या ऋषीला येऊन त्यानें तें घेतलें नाहीं. त्याप्रमाणें वर्णाश्रमधर्माचें कर्म सुटेल ह्या भीतीनें कहीं लोक आत्मज्ञान नको ह्मणतात.

बुद्धिं स्थलनीवात्मा ध्यायतीव च दृश्यते ।
नौगतस्य यथावृक्षाः तद्वत्संसारविभ्रमः ॥ २ ॥

अर्थः—आत्मा ( अविकारी आहे खरा, पण तो ) बुद्धीवर अध्यस्त झाला ह्मणजे ( लिंग शरीराच्या अभिमानानें ) ती बुद्धि व्यापार करील त्याप्रमाणें हा व्यापार करतो असें वाटतें, ती ध्यान करीत निश्चल झाली ह्मणजे हाहि तसाच स्थिर होतो. नावेंत बसलेल्या मनुष्याला ( नदीच्या कांटची ) झाडें चालत आहेत असें वाटतें, त्याप्रमाणें वास्तविक हा अलिप्त असून मी संसारांत पडलों आहें असा भ्रमान पडतो.

नौस्थस्य प्रातिलोम्येन नगानां गमनं यथा ।
आत्मनः संसृतिस्तद्वत् ध्यायतीवेति हि श्रुतिः ॥ ३ ॥

अर्थः—नावेंत बसलेल्या मनुष्याला झाडें, डोंगर उलट दिशेला धांवत आहेत असें दिसतें, त्याप्रमाणेंच आत्मा अविकारी असून त्याला संसार लागला आहे असें वाटतें. ह्याला प्रमाण बृहदारण्य उपनिषदांत ' ध्यायतीव ' असें वचन आहे.

चैतन्यप्रतिबिंबेन व्याप्तो बोधो हि जायते ।
बुद्धेः शब्दादिभिर्भासः तेन मोमुह्यते जगत् ॥ ४ ॥

अर्थः—चैतन्याचें प्रतिबिंब बुद्धीमध्यें पडल्यामुळें चिदाभासानें बुद्धि विषयाकार होते. शब्द वगैरे विषयांच्या योगानें बुद्धीच्या ठिकाणीं आत्म्याचा भास होतो ( त्या विषयांतला आनंद हा मा

त्याचा अंश असल्यामुळें विषयभोगाबद्दल भ्रम होतो ); यामुळें सगळ्या जगातल्या लोकांना मोह उत्पन्न होतो.

चैतन्यभास्यताऽहमः-तादर्थ्यं च तदस्य यत् ।
इदमंशप्रहाणेन परः सोऽनुभवो भवेत् ॥ ५ ॥

अर्थः—चैतन्याचा आभास झाला हाच अहंकार, तो तरी त्याचाच संबंधी, तेव्हां त्यापैकी इदं हा भाग टाकला असतां जो बाकी उरेल तो त्याचा अनुभव घेणारा ( साक्षी ) राहिला.

---

## अथ विशेषापोहप्रकरणम्

### विशेष खुलासा.

छित्त्वा त्यक्तेन हस्तेन स्वयं नात्मा विशिष्यते ।
तथा शिष्टेन सर्वेण येन येन विशेष्यते ॥ १ ॥

अर्थः—हात तोडून फेकून दिला तर तुटक्या हाताचा हें विशेषण आत्म्याला लागणार नाहीं. त्याप्रमाणेंच बाकी ज्या ज्या गोष्टी [ सुखी, दुःखी वगैरे ] आत्म्याच्या म्हणून म्हणत असतील त्या त्या टाकून आत्म्यांत कांहीं बदल होईल का पहा ! होणार नाहीं

तस्मात् त्यक्तेन हस्तेन तुल्यं सर्वं विशेषणम् ।
अनात्मत्वेन तस्मात् ज्ञो मुक्तः सर्वविशेषणैः ॥ २ ॥

अर्थः—तेव्हां आत्मा नव्हे असा टाकलेल्या हाताची जी स्थिति तीच इतर सर्व विशेषणांची समजावी. या वरून ज्ञानी पुरुष इतर कोणच्याही विशेषणानें न बदलतां केवळ सच्चिदानंद स्वरूपानें राहून मुक्त होतो.

विशेषणमिदं सर्वं साध्वलंकरणं यथा ।
अविद्याध्यासतः सर्वं ज्ञात आत्मन्यसज्ञवेत् ॥ ३ ॥

अर्थः–ही सर्व विशेषणें उत्तम अलंकारामारखीं समजावीं. तीं निराळीं टाकून देण्यासारखीं आहेत. पण अज्ञानानें त्यांचा अध्यास केल्यांमुळें मी (अमूक गुणं) विशिष्ट असा वाटतो. ह्याचें नीट ज्ञान झालें म्हणजे तीं विशेषणें आत्म्याच्या ठिकाणीं नाहींत असें ध्यानांत येईल.

ज्ञातेवात्मा सदा ग्राह्यो ज्ञेयमुत्सृज्य केवलः ।
अहमित्यपि यद्ग्राह्यं व्यपेताङ्गसमं हि तत् ॥ ४ ॥

अर्थः—ज्ञान झाल्यावर जें ज्ञेय (जाणलें) तें टाकून आत्मा मात्र घ्यावा. त्यांत मग अहं असें जें घ्यावेंसें वाटतें तें त्या तोडून टाकलेल्या हाताप्रमाणें समजावें.

यावान् स्यादिदमंशो यः स स्वतोऽन्यो विशेषणम् ।
विशेषपक्षयो यत्र सिद्धो ह्यचित्रगुर्यथा ॥ ५ ॥

अर्थ–अहंप्रमाणेंच जो जो इदं शब्दानें दाखविण्याचा (अहंकार वगैरे) अंश विशेषण या नांवानें लागेल तो तो आपल्या स्वरूपापेक्षा निराळा मानावा. जें कांहीं विशेषणाच्यायोगानें आवरण झालेलें आहे तें होण्यापूर्वीच ती वस्तु स्वतःसिद्ध आहे. जसे नाना रंगाच्या गाई असलेला मनुष्य. ह्या गाई नव्हत्या तरी त्यापूर्वी तो मनुष्य होताच, ह्याप्रमाणें इतर धर्म आत्म्यावर लागण्यापूर्वी आत्मा सिद्ध होताच.

इदमंशोऽहमित्यत्र त्याज्यो नात्मेति पण्डितैः ।
अहं ब्रह्मेति शिष्टोऽशो भूतपूर्वगतेर्भवेत् ॥ ६ ॥

अर्थः—ह्या ठिकाणीं इदं म्हणून जो अंश आहे तो अहंकाराचें–

रूप म्हणून ( दृश्य असल्यामुळें ) आत्मा नव्हे असें ओळखून शहाण्या पुरुषानें त्याचा त्याग करावा. राहिलेला जो भाग अहं ब्रह्म त्यांत जो अहंरूपी अंश आहे त्यावरून त्या आत्म्याला पूर्वी कोणतें विशेषण लाविलें होतें हें समजतें ( तो अंश सोडून केवळ ब्रह्मच बाकी राहिलें. )

---

## अथ बुद्ध्यारूढप्रकरणम्.

### बुद्धिस्थ

बुद्ध्यारूढं सदा सर्वं दृश्यते यत्र तत्र वा ।
मया तस्मात् परं ब्रह्म सर्वज्ञश्चास्मि सर्वगः ॥ १ ॥

अर्थः—ज्या अर्थी सर्व प्रकारचे विकार निरनिराळ्या अवस्थे-मध्यें बुद्धीवर मी पहातों त्या अर्थी मी त्या सर्व विकाराहून ( पहाणारा म्हणून ) निराळा असें मी सर्व जाणणारा, सर्वत्र गमन करणारा, सर्वांत श्रेष्ठ ब्रह्म आहें.

यथाऽऽत्मबुद्धिचाराणां साक्षी तद्वत् परेष्वपि ।
नैवापोढुं न वा दातुं शक्यस्तस्मात् परो ह्यहम् ॥ २ ॥

अर्थः—आत्म्यासंबंधाच्या बुद्धीचे सर्व व्यवहार पहाणारा साक्षी मी आहें. त्याप्रमाणें इतर ( आत्म्याशिवाय ) ठिकाणींहि साक्षी मीच आहें. मी तसा साक्षी नाहीं किंवा आहे असें दाखविणें दुसऱ्या प्रमाणानें शक्य नाहीं. यावरून मी या प्रपंचाहून विलक्षण पर-मात्मा आहें.

विकारित्वमशुद्धत्वं भौतिकत्वं न चात्मनः ।
अशेषबुद्धिसाक्षित्वात् बुद्धिवच्चाल्पवेदना ॥ ३ ॥

अर्थः—आत्म्याला कोणताहि विकार नाहीं, कोणतेंहि पाप

प्रमाण लागत नाहीं, पंचभूताचे कोणचेंहि कर्म लागत नाहींत. बुद्धीच्या आश्रयानें जें थोडेसें दुःख होतें, तें सुद्धा आत्म्याला होत नाहीं. कारण एकंदर सर्व ज्ञानाचा साक्षी तो आहे.

मणौ प्रकाश्यते यद्वत् रक्ताद्याकारतातटे ।
मयि संदृश्यते सर्वं आतपेनेव तन्मया ॥ ४ ॥

अर्थः—स्फटिकाच्या खड्याजवळ जासवंदाचें फूल ठेविलें असता तो खडा तांबडा दिसतो, पण हें दिसण्याला सूर्यप्रकाश पाहिजे असतो. त्याप्रमाणेंच बुद्धीच्या ठिकाणीं हे सर्व विषय दिसतात; पण त्याला विकार न पावणारा असा प्रकाशरूप मी आधार असतो.

बुद्धौ द्रष्टा भवेद्बुद्धौ सत्यां नास्ति विपर्यये ।
द्रष्टा यस्मात् तदाद्रष्टा तस्माद्वैतं न विद्यते ॥ ५ ॥

अर्थः—जागृतीच्या वेळीं बुद्धी व्यवहार करीत असल्यामुळें तिच्या ठिकाणीं द्वैत दिसूं लागतें. गाढ झोपेंत बुद्धि नसल्यामुळें असें द्वैत दिसत नाहीं. परंतु, दोन्ही अवस्थामध्यें, पहाणारा हा सारखाच रहातो, यावरून [ एकदा दिसणारें व एकदा न दिसणारें असें जें ] द्वैत तें वस्तविक नाहीं.

अविवेकात् पराभावं यथा बुद्धिर्विचया ।
विवेकात्तु परादन्यः स्वयं चापि न विद्यते ॥ ६ ॥

अर्थ—बुद्धीला द्वैताच्या योगानें अविचार उत्पन्न होऊन ती परमात्म्याला जाणीत नाहीं. जेव्हां ती विचार करूं लागते तेव्हां, त्या परमात्म्याशिवाय निराळा वाटलेला जो जीव तो दिसत नाहींसा होतो आणि बुद्धिहि लय पावते.

अथ मतिविलापनप्रकरणम्.
मनास उपदेश.

चिति स्वरूपे स्वत एव मे मने
रसादियोगस्तव मोहकारितः ।
अतो न किंचित्तव चेष्टितेन मे
फलं भवेत्सर्वविशेषहानतः ॥ १

अर्थः–हे मना वास्तविकपणें मी स्वतः चैतन्यस्वरूप आहें. विषयाच्या ठिकाणी उत्पन्न झालेली आसक्ति ते तुझ्या अविचारानें झालेली आहे, यासाठीं तुझ्या ह्या चेष्टा माझ्या कामीं पडणार नाहींत. ह्या सर्व विशेषणरूपी ( गुण वगैरे ) गोष्टी टाकून देईन तेव्हांच ( उत्तम ) फल ( जो मोक्ष तो ) प्राप्त होईल.

विमुञ्च मायामय कार्यतामिह प्रशान्तिमायाह्यसदीहितात् सदा ॥
अहं परं ब्रह्म सदा विमुक्तवत् तथाजमेकं द्वयवर्जितं यतः॥२॥

अर्थः–तेव्हां येथील मायिक खोटा व्यवहार सोडून दे, आणि विषयाच्या नाशानें विनाकारण त्रास घेण्याचें टाकून नित्य शांति धारण कर. कारण ( मी तुला वश न होणारा असा ) परमात्मा ब्र- ह्मरूप सदोदित मुक्त आहें. त्याप्रमाणेंच मी जन्मरहित, अद्वितीय. अद्वैत आहें.

सदा च भूतेषु समोऽस्मि केवलो यथा च खं सर्वगमक्षरं शिवम्।
निरंतरं निष्फलमक्रियं परं ततो न मेऽस्तीह फलं तवेहितैः॥३॥

अर्थः–आकाशाप्रमाणेंच सर्व ठिकाणी असणारा अविनाशी, कल्याणरूप मी असून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं सारखाच पृ- थक् आहें. मी सर्वत्र भरलेला, कलारहित, क्रियारहित, सर्वांत श्रेष्ठ

आहे. तेव्हां तुझ्या हेतुप्रमाणें मला कांहीं फलप्राप्ति करून घ्यावयाची राहिलेली नाहीं.

अहं ममैको न तदन्यदिष्यते तथा न कस्याप्यहमस्म्यसङ्गतः ।
असंगरूपोऽहमतो न मे त्वया कृतेन कार्यं तव चाद्वयत्वतः ॥४॥

अर्थः—मी एक आहें, माझें ( गुणभूत ) असें दुसरें कांहीं नाहीं. त्याप्रमाणेंच मी संगरहित असल्यामुळें मी दुसऱ्या कोणाचा आहें असें नाहीं. मी चित्स्वरूप असल्यामुळें मला कशाचा संग नाहीं. याकरतां अद्वयस्वरूपामुळें मला तुझ्या कृतीपासून कांहीं कार्य करून घ्यावयाचें नाहीं.

फले च हेतौ च जनो विषक्तवान् इति प्रचिन्त्याहमतो विमोक्षणे ॥
जनस्य संवाददिमं प्रक्लृप्तवान् स्वरूपतत्त्वार्थविबोधकारणं ५

अर्थः—जगतामध्यें हेतु आणि त्याचें फल ( म्हणजे संसार ) याच्याविषयीं लोकांची फार आसक्ति (लोभ) दिसून येते, असा विचार करून त्या लोकांना मोक्ष मिळावा म्हणून आत्म्याच्या स्वरूपाचें खरें ज्ञान करून देणारा हा संवाद ( मनाशीं ) काढिलेला आहे.

संवादमेतद्यदि चिंतयेन्नरो । विमुच्यतेऽज्ञानमहाभयागमात् ॥
विमुक्तकामश्च तथा जनः सदा चरत्यशोकः सम आत्मवित् सुखी

अर्थः—जो मनुष्य हा संवादाचें मनन करील, तो मोठें भय उत्पन्न करणाऱ्या अज्ञानापासून सुटेल; सर्व इच्छा सोडून दिल्यावर दुःखाचें कारणच रहाणार नाहीं आणि मग तो येथें असेल तोंपर्यंत आपल्या ज्ञानामध्यें आनंदानें सर्वत्र समत्वाच्या दृष्टीनें राहील.

---

## अथ सूक्ष्मताव्यापिताप्रकरणम्

ब्रह्म सर्वांत लहान आहे तरी सर्वांला व्यापून आहे.

सूक्ष्मत्वव्यापिते ज्ञेये गंधादेरुत्तरोत्तरम् ।
प्रत्यगात्मावसानेषु पूर्वपूर्वप्रहाणतः ॥ १ ॥

अर्थः—पृथ्वीचा गुण गंध येथून आरंभ करून क्रमानें आप्, तेज, वायु, आकाश ह्यांचे गुण पहूं लागतां एक एक मागलें महाभूत टाकून पुढच्याकडे पहिलें म्हणजे एक दुसऱ्यापेक्षां सूक्ष्म पण त्याला व्यापून आहे असें दिसतें. ह्याप्रमाणें चढतां चढत आत्म्यापर्यंत गेलें असतां तो सगळ्यांत सूक्ष्म पण सर्वांना व्यापणारा असें आढळेल.

शारीरा पार्थिवी तावत् यावद्बाह्यप्रमाणतः ।
अप्तत्त्वादीनि च तत्त्वानि तावन्त्यथानि कृत्स्नशः ॥२॥

अर्थ.—पृथ्वी तत्त्वाचे दोन भेद. एक शरीररूपानें व एक बाह्य. त्यांत जेवढी प्रमाणानें पहिली तेवढीच दुसरी. त्याप्रमाणें बाकीचें आदि चार भूतें अप् वगैरे जाणावीं.

वाय्वादीनां यथोत्पत्तेः पूर्वं खं सर्वगं तथा ।
अहमेकः सदा सर्वः चिन्मात्रः सर्वगोऽद्वयः ॥ ३ ॥

अर्थ.—वायु वगैरे चारी भूतांच्या उत्पत्तीपूर्वी आकाश सर्व व्यापून होतें, त्याप्रमाणेंच मी त्या ( आकाशाच्या ) पूर्वींच प्रकट, नित्य, सर्वरूप चैतन्यस्वरूप, सर्व व्यापणारा, अद्वितीय असा आहे.

ब्रह्माद्याः स्थावरान्ता ये प्राणिनो मम पूः स्मृताः ।
कामक्रोधादयो दोषा जायेरन्मे कुतोऽन्यतः ॥ ४ ॥

अर्थ.—ब्रह्मदेवापासून वृक्ष वगैरे स्थावर सृष्टीपर्यंत जेवढे प्राणी आहेत, ते माझींच शरीरें आहेत, असें स्मृतींत सांगितलें आहे. मग माझ्याशिवाय दुसरें जर कांहीं नाहीं तर ( दुसऱ्यापासून

उत्पन्न होणारे ) काम क्रोध वगैरे दोष ते माझ्या ठिकाणीं उत्पन्न कसे होतील.

भूतदोषैः सदाऽस्पृष्टं सर्वं भूतस्थमीश्वरं ॥
नीलं व्योम तथा बालो दुष्टं मां वीक्षते जनः ॥ ५ ॥

अर्थः—ह्या प्राणिमात्राच्यापासून होणारे दोष मला लागत नाहींत. मीच सर्वांच्या हृदयात ईश्वररूपानें आहें. लहान ( अज्ञ ) मुलाला आकाश निळें वाटतें त्याप्रमाणें माझ्यावर ( उगाच ) दोषारोप लोक करितात.

यच्चैतन्यावभासत्वात् सर्वप्राणिधियां सदा ।
पूर्मम प्राणिनः सर्वे सर्वज्ञस्य विपाप्मनः ॥ ६ ॥

अर्थः—सर्व प्राणिमात्रांच्या बुद्धीच्या ठिकाणीं नेहमीं, मीच आपल्या चैतन्यस्वरूपानें भासत असल्यामुळें सर्व प्राणी माझींच शरीरें आहेत, मी सर्वांस जाणणारा, पापरहित आहें.

जनिमज्ज्ञानविज्ञेयं स्वप्नज्ञानवदिष्यते ।
नित्यं निर्विषयं ज्ञानं तस्माद्वैतं न विद्यते ॥ ७ ॥

अर्थः—ज्ञान पूर्वी नव्हतें, तें उत्पन्न झालें म्हटलें तर तें स्वप्नांतल्याप्रमाणें ( नाशवंत ) समजावें. ज्ञान सदोदित आहे. तें कांहीं विषयाला ( पदार्थाला ) धरून नाहीं. यावरून द्वैत कांहीं मुळींच नाहीं.

ज्ञातुर्ज्ञातिर्हि नित्योक्ता सुषुप्ते त्वन्यशून्यतः ।
जाग्रज्ज्ञातिस्त्वविद्यातः तद्ग्राह्यं चासदिष्यताम् ॥८॥

अर्थः—ज्ञाता जो आत्मा त्याचें ज्ञान नित्य आहे ( असें श्रुति सांगते. ) गाढ झोपेमध्यें ( त्याच्याशिवाय इतर ) दुसरें नाहीं.

असें वाटतें. जागृतीमध्यें तेंच ज्ञान असतें, परंतु अविद्येच्यामुळें तें विषयानें व्याप्त होतें ह्मणून तें खरें नव्हे असें समजावें.

रूपवत्त्वायसत्त्वाच्च दृष्ट्यादेः कर्मता यथा ।
एवं विज्ञानकर्मत्वं भूम्नो नास्तीति गम्यते ॥ ९ ॥

अर्थः—' आत्मा वा अरे द्रष्टव्यः ' इत्यादि बृहदारण्य उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें आत्मा पहावयाचा असेल तर त्याला दृष्टि ह्मणजे नेत्र वगैरे क्रियांचें कर्मत्व त्याच्याकडे येऊन रूपवत्त्व ह्मणजे रूप वगैरे असणेपणा त्याच्यावर येईल. पण तसें होणें नाहीं. कारण तें रूप वगैरे त्याच्या ठिकाणीं नाहीं. शिवाय तशा अर्थानें 'यत्र नान्यत्पश्यति ' वगैरे छांदोग्य उपनिषद वाक्याशीं विरोध येतो. ह्मणून प्रथम दिलेलें वाक्य अनात्म्याला टाकून आत्म्याकडे फिरावें अशा अर्थानें लावावें. ह्याप्रमाणें आत्म्याला अनुभव येण्याचें कर्म कोणतेंहि नाहीं असें सिद्ध झालें.

---

अथ दृशिस्वरूपपरमार्थदर्शनप्रकरणं
आत्म्याचें खरें स्वरूप.

दृशिस्वरूपं गगनोपमं परं । सकृद्विभातं त्वजमेकमक्षरं ॥
अलेपकं सर्वगतं यदद्वयं । तदेव चाहं सततं विमुक्त ॐम् ।

अर्थ—( आत्म्याचें ) ज्ञानस्वरूप आकाशाप्रमाणें सर्वोच्च पदीं कडे, ( एकदा स्फुरण पावलें तें ) सर्वदा भासणारें, जन्मरहित, अद्वितीय, अविनाशी, कशानेंही लिप्त न होणारें, सर्व ठिकाणी असणारें असें जें अद्वयरूप तेंच मी सदोदित आहें. मी नेहमी मुक्त आहें. ॐकार रूप आहें.

दृशिस्तु शुद्धोऽहमविक्रियात्मको । नमेऽस्ति कश्चिद् विषय

स्वभावतः । पुरस्तिरश्चोर्ध्वमधश्च सर्वतः । संपूर्णभूमात्वज आत्मनि स्थितः ॥ २ ॥

अर्थः—मी केवल ज्ञानस्वरूप आहें, निष्पाप आहें, मला विकार होत नाहीं, वास्तविक पहातां मला कोणच्याही विषयाचा संपर्क नाहीं, मी पुढें, बाजूला, वर, खालीं, सर्व ठिकाणीं पूर्ण भूमा ( आत्मा ) जन्मरहित, आत्मरूपानें राहिलों आहे.

अजोऽमरश्चैव तथाऽजरोऽमृतः ।स्वयंप्रभः सर्वगतोऽहमद्वयः॥ न कारणं कार्यमतीव निर्मलः । सदैकतृप्तश्च ततो विमुक्त ॐम् ॥ ३ ॥

अर्थः—मी जन्मरहित, मृत्युरहित आहें, मला वार्धक्य नाहीं, मी जन्मास आलों नाहीं, मग मरण कसें येणार. स्वतः प्रकाशमान सर्वव्यापी, अद्वितीय, मी कारणहि नाहीं, कार्यही नाहीं, शुद्ध आहें, सदा तृप्त आहें, सदा मुक्त ॐकाररूपी आहें.

सुषुप्तजाग्रत्स्वपतश्च दर्शनं नमेऽस्ति किंचित्स्वमिवेह मोहनं । स्वतश्च तेषां परतोप्यसत्त्वतःतुरीय एवास्मि सदाऽहमद्वयः ॥४॥

अर्थः—गाढ झोपेंत, जागेपणीं किंवा स्वप्नांत मला केव्हांच रूप नाहीं, मला मोह घालणारें कांहींच नाहीं; त्या तिन्ही अवस्थांना स्वतः किंवा दुसऱ्याकडून स्फुरण नाहीं, कारण त्या तिन्ही खोटया आहेत. मी तुरीय ( चवथ्या ) अवस्थेमध्यें असून सर्वत्र साक्षी दृष्टि आहे, मी अद्वितीय आहें.

शरीरबुद्धीन्द्रियदुःखसंततेः। न मे न चाहं मम निर्विकारतः॥ असत्त्वहेतोश्च तथैव संततेः।असत्त्वमस्याः स्वपतो हि दृश्यवत्५

अर्थः—मी विकाररहित असल्यामुळें मला हें कोणच्याही प्रकारचें, शरीरापासून, बुद्धीपासून, इंद्रियांपासून होणारें दुःख बाधत

नाहीं. ही दुःखपरंपरा मुळींच खोटी आहे, स्वप्नामध्यें दिसलेलें जसें खोटें, त्याप्रमाणेंच ही परंपरा दृश्य म्हणून खोटी आहे.

इदं तु सत्यं मम नास्ति विक्रिया। विकारहेतुर्नहि मेऽद्वयत्वतः।
न पुण्यपापे न च मोक्षबंधने। न चास्ति वर्णाश्रमताऽशरीरतः ६

अर्थः—मी अद्वितीय असल्यामुळें मला विकार नाहीं, विकार होण्याला कारण नाहीं. मला पुण्यपाप लागत नाहीं, मोक्ष नाहीं किंवा बंधन नाहीं; मला शरीरच नाहीं, तेव्हां वर्ण आणि आश्रम यांचा संबंध नाहीं.

अनादितो निर्गुणतो न कर्म मे। फलंच तस्मात्परमोऽहमद्वयः।
यथा नभः सर्वगतं न लिप्यते। तथा ह्यहं देहगतोऽपि सूक्ष्मतः ७

अर्थः—मला आदि नाहीं, गुण नाहीं, त्यामुळें कर्म नाहीं—मग (कर्म नसल्यामुळें) फल नाहीं. ज्याप्रमाणें आकाश सर्वव्यापी असून कशालाही लिप्त नाहीं, त्याप्रमाणें मी देहांत आलों तरी मूळ सूक्ष्मरूपाचा असल्यामुळें कशानेंही लिप्त नाहीं.

सदा च भूतेषु समोऽहमीश्वरः। क्षराक्षराभ्यां परमो ह्यथोत्तमः।
परात्मतत्त्वश्च तथाऽद्वयोपि सन्। विपर्ययेणाभिमतस्त्वविद्यया ॥ ८ ॥

अर्थः—मीच ईश्वर असून सर्व भूतांच्या ठिकाणीं सारखा आहें. क्षर आणि अक्षर ह्या दोहींपेक्षां श्रेष्ठ आणि म्हणून सर्वांत उत्तम आहे. मीच परमात्मा असल्यामुळें अद्वितीय आहें. परंतु ह्याच्या उलट जो भास होतो त्याला कारण अज्ञान. . .

अविद्यया भावनया च कर्मभिः। विविक्त आत्माऽव्यवधिः सुनिर्मलः। दृगादिशक्तिप्रचितोऽहमद्वयः। स्थितः स्वरूपे गगनं यथाऽचलं ॥ ९ ॥

अर्थ---आत्मा पापरहित आणि उपाधिरहित आहे, अज्ञानामुळें भलती कल्पना होते, पण त्याचा किंवा कर्माचा मला कांही संबंध नाहीं. ज्ञानस्वरूप परमात्मा त्याची जी माया शक्ति ती काय आहे, मी ओळखली आहे, मी अद्वितीय आहे. आकाशाप्रमाणें मी आपल्या स्वरूपाच्या ठिकाणीं अचल आहें.

अहं परं ब्रह्म विनिश्चयात्मदृक् । न जायते भूम इति श्रुतेर्वचः ।
नचैव बीजे त्वसति प्रजायते। फलं न जन्मास्ति ततो ह्यमोहता

अर्थः---परब्रह्म मीच आहें, निश्चयेंकरून ज्ञान हें माझें स्वरूप आहे. मला जन्म नाहीं असें कठ उपनिषदांत वचन आहे. बीजच जर मुळीं नसलें तर फल कसें येणार. म्हणून मला जन्म नाहीं म्हणून मोह नाहीं.

ममेदमित्थंच तथेदमीदृशं । तथाऽहमेवं न परो न चान्यथा ।
विमूढतैवं न जनस्य कल्पना । सदा समे ब्रह्मणि चाद्वये शिवे ११

अर्थ.---हें माझें, इतकें, असलें माझें असला विचार माझ्या ठिकाणीं नाहीं. मी श्रेष्ठ आहें, त्यांत संदेह नाहीं. असल्या प्रकारची कल्पना हा लोकाचा मूर्खपणा आहे. पण मी सर्वज्ञ सारखा, ब्रह्मरूप, अद्वितीय, कल्याणकारक असल्यामुळें माझ्या ठिकाणीं ही कल्पना नाहीं.

यदद्वयं ज्ञानमतीव निर्मलं । महात्मनां तत्र न शोकमोहता ।
तयोरभावे नहि कर्म जन्म वा । भवेदयं वेदविदां विनिश्चयः १२

अर्थ –हें अत्यंत शुद्ध अद्वैत ज्ञान झालें असता तो प्राणी साक्षात् ब्रह्मभूत होतो, मग त्याला शोक आणि मोह उरत नाहींत.

हे दोन्ही नसल्यावर त्याला जन्म किंवा कर्म लागत नाहीं असें वेदार्थ जाणणाऱ्या लोकांनीं निश्चयानें ठरविलें आहे.

सुषुप्तवज्जाग्रति यो न पश्यति । द्वयं तु पश्यन्नपि चाद्वयत्वतः ॥ तथाच कुर्वन्नपि निष्क्रियश्च यः । स आत्मविन्नान्य इतीह निश्चयः ॥ १३ ॥

अर्थः—गाढ झोपेंत जसें त्याला ( दुसरें कांहीं ) ज्ञान नसतें त्याप्रमाणेंच जाग्रतीमध्यें द्वैत ( पूर्ववासनेमुळें प्रपंच ) दिसून हि ( त्यांत तो आसक्त होत न होतां ) अद्वैतच आहे. त्याप्रमाणेंच पूर्वीप्रमाणेंच नित्य कर्में ( स्नान वगैरे ) करीत असूनही कोणच्याही कर्माविषयीं वासना नाहीं. आत्म्याचें पूर्ण ज्ञान झालें असल्यामुळें आत्म्याशिवाय इतर कांहीं नाहीं असा त्याचा दृढ निश्चय असतो.

इतीदमुक्तं परमार्थदर्शनं । मयाहि वेदांतविनिश्चितं परं ॥ विमुच्यतेऽस्मिन् यदि निश्चितो भवेत् । न लिप्यते व्योम इवेह कर्मभिः ॥ १४ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें श्रेष्ठ पुरुषार्थ काय हें मीं वेदांतील वचनांचें पूर्ण मनन करून दाखविलें. ह्याप्रमाणें विचार करून जर दृढबुद्धि झाली तर आकाशाप्रमाणें कोणच्याही कर्मांचा त्याला संपर्क लागणार नाहीं.

---

अथ ईक्षितृत्वप्रकरणं

चैतन्यस्वरूपाविषयीं

ईक्षितृत्वं स्वतःसिद्धं जंतूनांच ततोऽन्यता ।
अज्ञानादित्यतोऽन्यत्वं सदर्शीनि निवर्त्यते ॥ १ ॥

अर्थः—सर्व प्राणिमात्रांचें चैतन्यरूप स्वतःसिद्ध आहे. ( त्याला दुसरें प्रमाण नको ). पण अज्ञानामुळें दुसरा प्रकार वाटतो. तूं सत् आहेस असें समजून घेतल्यावर तें अन्यत्व परततें ( म्हणजे नाहींसें होतें. )

एतावद्ध्यमृतत्वं न किंचिदन्यत्सहायकम् ।
ज्ञानस्येति ब्रुवच्छास्त्रं सालिङ्गं कर्म बाधते ॥ २ ॥

अर्थः–हें इतकेंच अमृतत्व [ अमरपण ] होय असें वचन बृहदारण्यकांत आहे. ज्ञानाला दुसऱ्या कशाची मदत लागत नाहीं, असा त्या ( वचना ) चा अर्थ समजावयाचा. कर्में व त्यांचीं साधनें हीं मात्र बंधनाला कारण होतात.

सर्वेषां मनसो वृत्तं अविशेषेण पश्यतः ।
तस्य मे निर्विकारस्य विशेषः स्यात्कथंचन ॥ ३ ॥

अर्थः–( जागृति किंवा स्वप्न ) दोन्ही अवस्थांमध्यें सर्व व्यापार करणारें मन असतें, पण त्यावेळीं मी पहाणारा अभिमान सोडून साक्षीरूपानें सर्व पहात असतो. अशा प्रकारें विकाररहित असलेल्या मला विशेष ( अभिमान ) कसें वाटेल.

मनोवृत्तं मनश्चैव स्वप्नवज्जाग्रतीक्षितुः ।
संप्रसादे द्वयासत्वात् चिन्मात्रः सर्वगोऽव्ययः ॥ ४ ॥

अर्थः–स्वप्नामध्यें वृत्तिसहित मन व जागृतीमध्यें विषयाकार मन असतें, पण त्यांना पहाणारा निराळा असतो. गाढ झोपेंत या दोन्ही प्रकारच्या मनाला ठिकाण नसतो. पण चैतन्यरूप, सर्वव्यापी, नाशरहित आत्मा मात्र असतो.

स्वप्नः सत्यं यथाबोधात् देहात्मत्वं तथैवच ।
प्रत्यक्षादेः प्रमाणत्वं जाग्रत्स्यादात्मवेदनात् ॥ ५ ॥

अर्थः—स्वप्न खरें वाटतें, ( कोठपर्यंत ? ) जागे झालों नाही तोंपर्यंत. त्याप्रमाणेंच जागृतींमध्यें देहाविषयीं ममता वाटते आणि प्रत्यक्ष गोष्टी खऱ्या वाटतात, ( कोठपर्यंत ? ) आत्म्याचें ज्ञान झालें नाहीं तेथपर्यंत.

व्योमवत्सर्वभूतस्थो भूतदोषैर्विवर्जितः ।
साक्षी चेताऽगुणः शुद्धो ब्रह्मैवास्मीति केवलः ॥ ६ ॥

अर्थः—मी आकाशासारखा सर्वभूतमात्राच्या ठिकाणीं असून त्यांच्या दोषाची बाधा मला होत नाहीं. मी सर्वांचा साक्षी, चैतन्यरूप, गुणरहित, शुद्ध, निर्मळ ब्रह्मच मी आहें.

नामरूपक्रियाभ्योऽन्यो नित्यमुक्तस्वरूपवान् ।
अहमात्मा परं ब्रह्म चिन्मात्रोऽहं सदाऽद्वयः ॥ ७ ॥

अर्थः—मला नाम, रूप, कर्म यांचा संबंध नाहीं. माझें स्वरूप नेहमीं मुक्तच आहे. मीच आत्मा, श्रेष्ठ ब्रह्म, चैतन्यस्वरूप, अद्वितीय असा आहे.

अहं ब्रह्मास्मि कर्ता च भोक्ता चास्मीति ये विदुः ।
ते नष्टा ज्ञानकर्माभ्यां नास्तिकाः स्युर्न संशयः ॥८॥

अर्थः—ब्रह्मरूप मला जे कोणी कर्ता, भोक्ता मानतात, ते ज्ञान आणि कर्म या दोन्हींपासून भ्रष्ट होतात, ते अविश्वासी नास्तिक होत यांत संशय नाहीं.

धर्माधर्मफलैर्योगः इष्टोऽदृष्टो यथात्मनः ।
साक्षाद् ब्रह्मत्वमप्यस्य मोक्षो ज्ञानात्तथेप्यताम् ॥९॥

अर्थः—पुण्यपापाचें फल जें सुखदुःख तें आत्म्याला नसून बृहदारण्यक उपनिषदांत तसल्या अर्थाचें वचन घातलें आहे. त्या-

प्रमाणेंच आत्मा जरी ब्रह्मच आहे तरी ज्ञानानें मोक्ष मिळतो असें शास्त्रांत गृहीत धरलें आहे.

या महाराजनाद्यास्ताः वासनाः स्वप्नदर्शिभिः ।
अनुभूयन्त एवेह ततोऽन्यः केवलो दृशिः ॥ १० ॥

अर्थः—हळद लावून पिवळे केलेले वस्त्राप्रमाणें ( जागृतींतील गोष्टींच्या ) वासनांचा अनुभव स्वप्नामध्यें हा घेतो. पण हा ज्ञानस्वरूप आत्मा त्यांच्याहून निराळा केवल ( अवस्थात्रयरहित ) आहे.

कोपादिव विनिष्कृष्टः कार्यकारणवर्जितः ।
यथासिर्दृश्यते स्वप्ने तद्वद्बोद्धा स्वयंप्रभः ॥ ११ ॥

अर्थः—म्यानांतून बाहेर काढलेली तरवार जशी आपल्या तेजानें लकलक करते, त्याप्रमाणें स्वप्नामध्यें कार्यकारणांपासून निराळा आत्मा पाहिला म्हणजे आत्मतेजानें प्रकाशतो.

आपेपात् प्रतिबुद्धस्य ज्ञस्य स्वाभाविकं पदं ।
उक्तं नेत्यादिवाक्येन कल्पितस्यापनेतृणा ॥ १२ ॥

अर्थः—आभासानें कल्पना केलेल्या गोष्टी ( नेति नेति ) हा तो नाहीं अशा वचनांनीं घालविल्या म्हणजे हालवून जागा केलेल्या मनुष्याप्रमाणें आत्म्याचें स्वाभाविक स्वरूप दिसूं लागतें.

महाराजादयो लोकाः मयि यद्वत् प्रकल्पिताः ।
स्वप्ने तद्वद्द्वयं विद्यात् रूपं वासनया सह ॥ १३ ॥

अर्थः—स्वप्नामध्यें राजा, प्रजा वगैरे सर्व जसा मीच नटलों होतों, त्याप्रमाणें वासनेच्या योगानें मूर्त आणि अमूर्त असें दोन प्रकारचें रूप होतें असें समजावें.

देहलिंगात्मना कार्याः वासनारूपिणा क्रियाः ।
नेतिनेत्यादिरूपत्वात् न मे कार्या क्रिया क्वचित् ॥१४॥

अर्थः—स्थूल किंवा सूक्ष्म देहाचा अभिमान होईल तेव्हांच वासनांच्यामुळें कर्मे घडतात. परंतु तो मी नाहीं असें ह्मणून त्या दोन्ही देहांविषयीं अहंकार टाकून पहावां जागृतींत किंवा स्वप्नांत मी कांहींच क्रिया करीत नाहीं.

न ततोऽमृतताशाऽस्ति कर्मणो ज्ञानहेतुतः ।
मोक्षस्य ज्ञानहेतुत्वात् न तदन्यदपेक्षते ॥ १५ ॥

अर्थः—कर्म घडण्याला मूळ कारण अज्ञान असल्यामुळें त्या कर्मापासून मोक्ष मिळण्याची आशा नको. ज्ञानाच्या योगानेंच मोक्ष मिळणार. त्याला दुसऱ्या कशाची (मदतीची) गरज नाहीं.

अमृतं चाभयं नार्तं नेतीरात्मा प्रियो मम ।
विपरीतमतोऽन्यद्यत् त्यजेत्तत् सक्रियं ततः ॥ १६ ॥

अर्थः—मोक्षाच्या ठिकाणीं भय नाहीं, दुःख नाहीं, इतर गोष्टी (कांहीं) आत्मा नाहींत, मला सर्वापेक्षां प्रिय आत्मा आहे. जें कांहीं याच्याहून निराळें वाटेल, तें सर्व त्या (वाटण्याच्या) कर्मासह (आत्मा नव्हे ह्मणून) टाकून द्यावें.

---

अथ प्रकाशप्रकरणं

[ आत्म्याचा ] शोध

प्रकाशस्थं यथा देहं सालोकमभिमन्यते ।
द्रष्टाभासं तथा चित्तं द्रष्टाहमिति मन्यते ॥ १ ॥

अर्थः—उजेडांत असलेला देह [ दुसऱ्यानें प्रकाशित होत असून ] प्रकाश देतो असें जसें वाटतें त्याप्रमाणेंच ( द्रष्टा जो ) आत्मा त्याचा आभास झालेलें अंतःकरण मीच पहाणारा असें समजत असतें.

यदेव दृश्यते लोके तेनाभिन्नत्वमात्मनः ।
मपद्यते ततो मूढः तेनात्मानं न विन्दति ॥ २ ॥

अर्थः—ज्या सृष्टींत जें दिसतें म्हणून वाटतें ( त्याच्याहून आपण निराळे आहों असें न ओळखून ) त्याच्याशीं तादात्म्य पावतों, म्हणून मोहांत पडून आत्म्याचें ज्ञान होत नाहीं.

दशमस्य नवात्मत्वप्रतिपत्तिवदात्मनः ।
दृश्येषु तद्वदेवायं मूढो लोको न चान्यथा ॥ ३ ॥

अर्थः—[ मूळचें ] दहाजण असून नवापासून [ दहावा मी ] निराळा न ओळखल्याप्रमाणें [ बुद्धीच्या ठिकाणीं ] दिसलेल्या गोष्टीमध्येंच आपण आहों असें या लोकांना वाटतें.

त्वं कुरु त्वं तदेवेति प्रत्ययावेककालिकौ ।
एकनीडौ कथं स्यातां विरुद्धौ न्यायतो वद ॥ ४ ॥

अर्थः—तूंच आत्मा आहेस. आणि तूं कर्म कर असे दोन्ही अनुभव एकाच वेळीं कसे येतील ? न्यायानें पहातां एकमेकांच्या उलट असलेल्या गोष्टी एकाच ठिकाणीं कशा राहूं शकतील ?

देहाभिमानिनो दुःखं नादेहस्य स्वभावतः ।
स्वापवत्तत्प्रहाणाय तत्त्वमित्युच्यते दृशेः ॥ ५ ॥

अर्थः—जो शरीराचा अभिमान धरील त्याला दुःख होतें, देहाचें तादात्म्य सोडील त्याला दुःख नाहीं, हा आत्म्याचा स्वभावच आहे. स्वप्नांतल्या गोष्टी ( जागृतींत अभिमान सोडल्याप्रमाणें ) सोडाव्या म्हणून तोच तूं आहेस असें आत्म्याविषयीं ज्ञान ( श्रुतीमध्यें ) सांगितलें आहे.

दृशेश्छाया यदारूढा मुखच्छायेव दर्पणे ।
पश्यंस्तं प्रत्ययं योगी दृष्ट आत्मेति मन्यते ॥ ६ ॥

अर्थः—आरशांत पडलेलें तोंडाचें प्रतिबिंब पाहून मीं आपलें तोंड पाहिलें असें जसें ह्मणतो त्याप्रमाणें चैतन्याचें प्रतिबिंब ( अंतःकरणांत ) पाहून त्या अनुभवावरून मीं आत्मा पाहिला असें कित्येक योगी ह्मणविणारे लोक ह्मणतात.

तं च मूढं च यदन्यं प्रत्ययं वेत्ति नो दृशेः ।
स एव योगिनां श्रेष्ठो नेतरः स्यान्न संशयः ॥ ७ ॥

अर्थः—हा मोहामुळें उत्पन्न झालेला आत्मज्ञानाचा अंतःकरणांत झालेला भ्रम जो ओळखील तो पूर्ण ज्ञान्यामध्यें अत्यंत आवडता होईल यांत संशय नाहीं.

विज्ञातेर्यस्तु विज्ञाता सत्त्वमित्युच्यते यतः ।
सस्यादनुभवस्तस्य ततोऽन्योऽनुभवो मृषा ॥ ८ ॥

अर्थः—ज्ञानाला जो जाणणारा तो तूं असें श्रुती सांगते. हा अनुभव त्या योग्याला येईल. त्याशिवाय इतर अनुभव खोटा समजावा.

दृशिरूपे सदा नित्ये दर्शनादर्शने मयि ।
कथं स्यातां ततो नान्य इष्यतेऽनुभवस्ततः ॥ ९ ॥

अर्थः—मी सदासर्वकाळ ज्ञानस्वरूप असल्यामुळें ज्ञान किंवा अज्ञान ( नवीन ) माझ्या ठिकाणी कोठून येणार ? यामुळें त्या ( ज्ञाना ) शिवाय दुसरा अनुभवच ( संभवत ) नाहीं.

यत्स्थस्तापो रवेर्देहे दृशेः स विषयो यथा ।
सत्त्वस्थस्तद्वदेवेह दृशेः स विषयस्तथा ॥ १० ॥

अर्थः—ज्या जागेवर उभे राहिल्यामुळें देहाला सूर्याचे किरण ताप देत असतील ती जागा तापदायक म्हणून हा धरून बसतो.

त्याप्रमाणें अंतःकरणांत विषयाचा ताप झाल्यामुळें त्या आत्म्याला ताप झाला असें तो मानूं लागतो.

प्रतिषिद्धेदमंशो ज्ञः खमिवैकरसोऽद्वयः ।
नित्यमुक्तस्तथा शुद्धः सोऽहं ब्रह्मास्मि केवलः ॥ ११ ॥

अर्थः—इदं [ हा ] चा जो अंश [ अहं ब्रह्मास्मि ] या वाक्यांत आहे तो टाकून द्यावा, म्हणजे ज्ञानपूर्ण, अद्वितीय, आकाशाप्रमाणें सर्वत्र सारखा, सदोदित मुक्त, निष्पाप केवळ ब्रह्म मीच उरेल.

विज्ञातुर्नैव विज्ञाता परोऽन्यः संभवत्यतः ।
विज्ञाताऽहं परो मुक्तः सर्वभूतेषु सर्वदा ॥ १२ ॥

अर्थः—जो सर्वांचा ज्ञाता त्याला जाणणारा दुसरा निराळा असणें संभवनीय नाहीं. मी सर्वांत श्रेष्ठ, सर्वज्ञ, नेहमीं सर्व भूतांचे ठिकाणीं रहाणारा, मुक्त असा मी आहें.

यो वेदाल्लुप्तदृष्टित्वं आत्मनोऽकर्तृतां तथा ।
ब्रह्मवित्त्वं तथा मुक्त्वा स आत्मज्ञो न चेतरः ॥१३॥

अर्थः—मी ब्रह्म जाणणारा आहें असला अभिमान न धरतां आपली दृष्टि ( ज्ञान ) सगळीकडे चालते व आपण कर्तव्यरहित आहों हें ज्ञान ज्याला झालें तो आत्मज्ञानी, दुसऱ्याला तें ज्ञान झालें नाहीं असें समजावें.

ज्ञातैवाहमविज्ञेयः शुद्धो मुक्तः सदेत्यपि ।
विवेकी प्रत्ययो बुद्धेः दृश्यत्वान्नाशवान् यतः ॥१४॥

अर्थः—मी ज्ञाता, दुसऱ्याला न जाणतां येणारा, निष्पाप, सदा मुक्त आहें. बुद्धीला जो अनुभव येतो, तो दृश्य म्हणून नाशिवंत आहे असा विचार करावा.

अर्थः—आरशांत पडलेलें तोंडाचें प्रतिबिंब पाहून मीं आपलें तोंड पाहिलें असें जसें ह्मणतो त्याप्रमाणें चैतन्याचें प्रतिबिंब ( अंतःकरणांत ) पाहून त्या अनुभवावरून मीं आत्मा पाहिला असें कित्येक योगी ह्मणविणारे लोक ह्मणतात.

तं च मूढं च यद्यन्यं प्रत्ययं वेत्ति नो दृशेः ।
स एव योगिनां श्रेष्ठो नेतरः स्यान्न संशयः ॥ ७ ॥

अर्थः—हा मोहामुळें उत्पन्न झालेला आत्मज्ञानाचा अंतःकरणांत झालेला भ्रम जो ओळखील तो पूर्ण ज्ञान्यांमध्यें अत्यंत आवडता होईल यांत संशय नाहीं.

विज्ञातेर्यस्तु विज्ञाता स त्वमित्युच्यते यतः ।
स स्यादनुभवस्तस्य ततोऽन्योऽनुभवो मृषा ॥ ८ ॥

अर्थः—ज्ञानाला जो जाणणारा तो तूं असें श्रुती सांगते. हा अनुभव त्या योग्याला येईल. त्याशिवाय इतर अनुभव खोटा समजावा.

दृशिरूपे सदा नित्ये दर्शनादर्शने मयि ।
कथं स्यातां ततो नान्य इष्यतेऽनुभवस्ततः ॥ ९ ॥

अर्थः—मी सदासर्वकाळ ज्ञानस्वरूप असल्यामुळें ज्ञान किंवा अज्ञान ( नवीन ) माझ्या ठिकाणीं कोठून येणार ? यामुळें त्या ( ज्ञाना ) शिवाय दुसरा अनुभवच ( संभवत ) नाहीं.

यत्स्यस्तापो रवेर्देहे दृशेः स विषयो यथा ।
सत्त्वस्थस्तद्वदेवेह दृशेः स विषयस्तथा ॥ १० ॥

अर्थः—ज्या जाग्यावर उभें राहिल्यामुळें देहाला सूर्याचे किरण ताप देत असतील ती जागा तापदायक म्हणून हा धरून बसतो.

त्याप्रमाणें अंतःकरणांत विषयाचा ताप झाल्यामुळें त्या आत्म्याला ताप झाला असें तो मानूं लागतो.

मातिपिद्धेदमंशो ज्ञः स्वामिवैकरसोऽद्वयः ।
नित्यमुक्तस्तथा शुद्धः सोऽहं ब्रह्मास्मि केवलः ॥ ११ ॥

अर्थः—इदं [ हा ] चा जो अंश [ अहं ब्रह्मास्मि ] या वाक्यांत आहे तो टाकून द्यावा, ह्मणजे ज्ञानपूर्ण, अद्वितीय, आकाशाप्रमाणें सर्वत्र सारखा, सदोदित मुक्त, निष्पाप केवळ ब्रह्म मीच ठरेल.

विज्ञातुर्नैव विज्ञाता परोन्यः संभवत्यतः ।
विज्ञाताऽहं परो मुक्तः सर्वभूतेषु सर्वदा ॥ १२ ॥

अर्थः—जो सर्वांचा ज्ञाता त्याला जाणणारा दुसरा निराळा असणें संभवनीय नाहीं. मी सर्वांत श्रेष्ठ, सर्वज्ञ, नेहमी सर्व भूतांचे ठिकाणीं रहाणारा, मुक्त असा मी आहें.

यो वेदालुप्तदृष्टित्वं आत्मनोऽकर्तृतां तथा ।
ब्रह्मवित्त्वं तथा मुक्त्वा स आत्मज्ञो न चेतरः ॥१३॥

अर्थः—मी ब्रह्म जाणणारा आहें असला अभिमान न धरतां आपली दृष्टि ( ज्ञान ) सगळीकडे चालते व आपण कर्तव्यरहित आहों हें ज्ञान ज्याला झालें तो आत्मज्ञानी, दुसऱ्याला तें ज्ञान झालें नाहीं असें समजावें.

ज्ञातैवाह्मविज्ञेयः शुद्धो मुक्तः सदेत्यपि ।
विवेकी प्रत्ययो बुद्धेः दृश्यत्वान्नाशवान् यतः ॥१४॥

अर्थः—मी ज्ञाता, दुसऱ्याला न जाणतां येणारा, निष्पाप, सदा मुक्त आहें. बुद्धीला जो अनुभव येतो, तो दृश्य ह्मणून नाशिवंत आहे असा विचार करावा.

अलुप्ता ह्यात्मनो दृष्टिः नोत्पाद्या कारकैर्यतः ।
दृश्यया चान्यया दृष्ट्या जन्यताऽस्याः प्रकल्पिता ॥१५

अर्थः—आत्म्याचें ज्ञान कधींच लोप पावलेलें नसतें, म्हणून तें दुसऱ्या साधनांनीं उत्पन्न व्हावयाचें नाहीं. दुसऱ्या दृश्य पदार्थांच्या ज्ञानाच्या साहाय्यानें तें ज्ञान उत्पन्न होतें असें म्हटलें ही केवळ कल्पनाच आहे.

देहात्मबुध्यपेक्षत्वात् आत्मनः कर्तृता मृषा ।
नैव किंचित् करोमीति सत्या बुद्धिः प्रमाणजा ॥१६॥

अर्थः—देहाला आत्मा मानून त्या आत्म्याच्या ठिकाणीं जो कर्तेपणा लावला तो खोटा. मी कांहींच करीत नाहीं, हें स्मृतिवचन खरें, प्रमाणावरून ही बुद्धि सिद्ध झालेली समजावी.

कर्तृत्वं कारकापेक्षं अकर्तृत्वं स्वभावतः ।
कर्ता भोक्तेति विज्ञानं मृषैवेति सुनिश्चितम् ॥ १७ ॥

अर्थः—कर्तेपणा नसणें ही आत्म्याची सहजस्थिति आहे, त्याला उपाधीच्या संबंधानें कर्तेपणा लावतात. मी कर्ता, मी भोक्ता अशी जी जाणीव ती निःसंशय खोटी.

एवं शास्त्रानुमानाभ्यां स्वरूपेऽवगते सति ।
नियोज्योऽहमिति ह्येषा सत्या बुद्धिः कथं भवेत् ॥१८॥

अर्थः—याप्रमाणें शास्त्रावरून आणि अनुमानानें आत्म्याचें रूप समजल्यानंतर मला अमूक एक केलें पाहिजे अशा प्रकारची कल्पना खरी कशी होईल ? [ असें मनांत येण्याचें कारणच रहाणार नाहीं. ]

यथा सर्वान्तरं व्योम व्योम्नोऽप्यभ्यन्तरो ह्यहम् ।
निर्विकारोऽचलः शुद्धोऽजरो मुक्तः सदाद्वयः ॥ १९ ॥

अर्थः—जसें आकाश सर्वांना आंतून बाहेरून व्यापून आहे, तसा मी तर आकाशालाहि व्यापून आहें. मी विकाररहित, स्थिर, निष्पाप, वार्धक्यरहित, मुक्त, सारांश अद्वितीय असा आहें.

---

अथ अचक्षुष्ट्वप्रकरणं

इंद्रियांचा संबंध नाहीं.

अचक्षुष्ट्वान्न दृष्टिर्मे तथाऽश्रोत्रस्य का श्रुतिः ।
अवाक्त्वान्न तु वाक्तिः स्यादमनस्त्वान्मतिः कुतः ॥१॥

अर्थः—मला डोळेच नाहींत मग मी पाहणार काय, कानच नाहींत मग ऐकूं काय येणार, वाणीच नाहीं मग बोलणार काय, मनच नाहीं मग विचार कसला करणार ?

अप्राणस्य न कर्मास्ति बुध्यभावे न वेदिता ।
विद्याविद्ये ततो न स्तः चिन्मात्रज्योतिषो मम ॥२॥

अर्थः—मला प्राणच नाहींत मग मी कर्मे काय करणार, बुद्धिच नाहीं मग जाणीव कसली, चैतन्य प्रकाशरूप मी असल्यामुळें ज्ञान किंवा अज्ञान या दोहोंचाही मला संपर्क नाहीं.

नित्यमुक्तस्य शुद्धस्य कूटस्थस्याविचालिनः ।
अमृतस्याक्षरस्यैवं अशरीरस्य सर्वदा ॥ ३ ॥

अर्थः—मी नित्यमुक्त, निष्पाप, कूटस्थ, विकाररहित, मरण नसलेला, अविनाशी, देह नसलेला त्या मला—

जिघत्सा वा पिपासा वा शोकमोहौ जरामृती ।
न विद्यन्तेऽशरीरत्वात् व्योमवत् व्यापिनो मम ॥ ४ ॥

अर्थः—भूक, तहान, शोक, मोह, वार्धक्य आणि मरण हीं

नाहींत. कारण आकाशाप्रमाणें सर्व व्यापणाऱ्या मला शरीर नसल्यामुळें हे कांहींच विकार नाहींत.

> अस्पर्शत्वान्न मे स्पृष्टिः नाजिव्हत्वाद्रसज्ञता ।
> नित्यविज्ञानरूपस्य ज्ञानाज्ञाने न मे सदा ॥ ५ ॥

अर्थः—स्पर्शेंद्रिय मला नाहीं त्यामुळें स्पर्श नाहीं, रसनेंद्रिय ( जिव्हा ) नाहीं, म्हणून रसाची चवच नाहीं. नित्य पूर्ण ज्ञान हें माझें स्वरूप असल्यामुळें मला ज्ञान आणि अज्ञान हे विकार होतच नाहींत.

> या तु स्यान्मानसी वृत्तिः चाक्षुष्का रूपरंजना ।
> नित्यमेवात्मनो दृष्ट्या नित्यया दृश्यते हि सा ॥ ६ ॥

अर्थः—डोळ्याच्या वाटेनें स्वरूपाकार आनंददायक जो मनाला विकार उत्पन्न होतो, तो नित्य ज्ञानपूर्ण आत्म्याच्या ज्ञानामुळेंच समजतो.

> तथाऽन्येंद्रिययुक्ताश्च या वृत्तयो विषयाञ्जनाः ।
> स्मृती रागादिरूपाच केवलान्तर्मनस्यपि ॥ ७ ॥

अर्थः—त्याप्रमाणेंच इंद्रियांशीं संयोग पावल्यामुळें ज्या विषयाकार वृत्ती झाल्या त्या स्मरण, प्रेम, द्वेष वगैरे निव्वळ मनांत उत्पन्न होणारे विकार, हे सर्व त्या ज्ञानामुळेंच समजतात.

> मानस्यस्तद्वदन्यस्य दृश्यन्ते स्वप्नवृत्तयः ।
> द्रष्टुर्दृष्टिस्ततो नित्या शुद्धाऽनंताच केवला ॥ ८ ॥

अर्थः—स्वप्नामध्यें मनापासून ज्या वृत्ती उठतात त्या ( त्याच्याहून निराळा जो आत्मा ) त्या आत्म्याच्या आधारामुळें दिसतात. ( याप्रमाणेंच जागृतीचा प्रकार समजावा. ) तेव्हां पाहणारा

( आत्मा ) त्याची दृष्टि ( ज्ञान ) मात्र नित्य, शुद्ध, अनंत, निर्मळ असणार.

अनित्या साऽविशुद्धेति गृह्यतेऽत्राविवेकतः ।
सुखी दुःखी तथा चाहं दृश्ययोपाधिभूतया ॥ ९ ॥

अर्थः—विचार केला नाहीं म्हणजे त्या ज्ञानाला उपाधीमुळें अनित्यपणा आणि मलीनपणा येतो आणि मग मी सुखाचा किंवा दुःखाचा अनुभव घेतों असें वाटतें.

मूढया मूढ इत्येवं शुद्धया शुद्ध इत्यपि ।
मन्यते सर्वलोकोऽयं येन संसारमृच्छति ॥ १० ॥

अर्थः—जो आत्मा उपाधिमुळें मोहीत होऊन मूर्ख बनतो, निर्मळ वृत्ति झाली म्हणजे शुद्ध वर्तन करतो, असें सर्व लोकांना वाटतें आणि त्यामुळें जन्ममृत्यूचा फेरा पाठीस लागतो.

अचक्षुष्कादिशास्त्रोक्तं सबाह्याभ्यंतरं ह्यजम् ।
नित्यमुक्तमिहात्मानं मुमुक्षुश्चेत्सदा स्मरेत् ॥ ११ ॥

अर्थः—चक्षु वगैरे इंद्रियांपासून निराळा तूं आहेस वगैरे शास्त्रांत सांगितलें आहे तसा, आंत बाहेर सर्वत्र भरलेला, जन्मरहित, सदोदित मुक्त आपण आहों असें अनुसंधान मुमुक्षूनें नेहमीं ठेवावें.

अचक्षुष्कादिशास्त्राच्च नेंद्रियाणि सदा मम ।
अप्राणो ह्यमनाः शुभ्र इति चाथर्वणे वचः ॥ १२ ॥

अर्थः—बृहदारण्य उपनिषदांतील अचक्षुष्क वगैरे वचनावरून मला इंद्रियांचा संबंध नाहीं. मी प्राण नाहीं, मी मन नाहीं, मी निष्पाप आहें, अशा अर्थाचें वचन मुण्डक उपनिषदांत आहे.

शब्दादीनामभावश्च श्रूयते मम काठके ।
अप्राणो ह्यमना यस्मात् अविकारी सदा ह्यहम् ॥ १३ ॥

अर्थ:–शब्द वगैरे ( पंचभूताचे धर्म ) मला लागू नाहींत असें काठक उपनिषदांत सांगितलें आहे. मी प्राण नाहीं, मन नाहीं वगैरे वचनावरून मला कोणचाही विकार नाहीं, हें ठरतें

विक्षेपो नास्ति तस्मान्मे न समाधिस्ततो मम।
विक्षेपो वा समाधिर्वा मनसः स्याद्विकारिण॥ १४॥

अर्थ:–त्या स्थितीपासून विक्षेप ( काहीं बदल ) होत नाहीं. मग पुन. समाधि म्हणायची कशाला. विक्षेप किंवा समाधि ह्या अवस्था विकार पावणाऱ्या मनाच्या आहेत.

अमनस्कस्य शुद्धस्य कथं तस्याद्द्वयं मम।
अमनस्त्वाविकारित्वे विदेहव्यापिनो मम॥ १५॥

अर्थ:–मला मन नाहीं, मी निष्पाप आहें. मग माझ्या ठिकाणीं द्वैत कसें उत्पन्न होईल मी सर्व व्यापणारा असल्यामुळें मला मन नाहीं आणि विकारहि नाहीं.

इत्येतद्यावदज्ञानं तावत्कार्यं ममाभवत्।
नित्यमुक्तस्य शुद्धस्य बुद्धस्यच सदा मम॥ १६॥

अर्थ:–मी नित्य, शुद्ध, बुद्ध, आहें; ह्या वर सांगितल्या प्रकारचें ज्ञान जोंपर्यंत झालें नाहीं, तोंपर्यंत मला कर्म लागलें होतें.

समाधिर्वाऽसमाधिर्वा वार्यं चान्यत् कुतो भवेत्।
मां हि ध्यात्वा बुद्ध्वाच मन्यन्ते कृतकृत्यताम्॥१७॥

अर्थ:–माझें ध्यान करून माझें ज्ञान करून घेणें हेंच कर्तव्य सर्वस्व असें मुमुक्षु समजतात. मी समाधिस्थितींत असो वा नसो, मला दुसरें काहीं कर्तव्य असणें संभवेल कसें?

अहं महास्मि सर्वोऽस्मि शुद्धो बुद्धोऽस्म्यतः सदा ।
अजः सर्वत एवाहं अजरश्चाक्षयोऽमृतः ॥ १८ ॥

अर्थः–मी ब्रह्म आहें, मीच सर्व आहें. ( माझ्यावांचून दुसरें कांहीं नाहीं ) मी नित्य, शुद्ध, बुद्ध आहें. मी जन्मरहित आहें, कोणत्याही प्रकारें मला वार्धक्य येणार नाहीं, मी क्षयरहित, मृत्यूरहित आहें.

मदन्यः सर्वभूतेषु बोद्धा कश्चिन विद्यते ।
कर्माध्यक्षश्च साक्षीच चेता नित्योऽगुणोऽद्वयः॥ १९

अर्थः—सर्व प्राणिमात्रांमध्यें माझ्याशिवाय जाणणारा दुसरा कोणी नाहीं. सर्व कर्में मला फळत असून मी त्यांत आसक्त नाहीं. चैतन्यरूप मी आहें. नित्य आहें. गुणरहित आहें. अद्वैत आहें.

न सचाहं न चासच्च नोभयं केवलः शिवः ।
न मे संध्या न रात्रिर्वा नाहर्वा सर्वदा दृशेः ॥ २० ॥

अर्थः—मी सत् नाहीं, असत् नाहीं. दोन्हींच्याहून भी निराळा केवळ कल्याणरूप आहें. नेहमी ज्ञानस्वरूप मजला रात्र, दिवस किंवा दोहींचा संधि असा कालभेद नाहीं. ( अ० जाग्रती वगैरे अवस्था नाहींत. )

सर्वं मूर्तीविमुक्तं यत् यथा खं सूक्ष्ममद्वयं ।
तेनाप्यस्मि विनाभूतं ब्रह्मैवाहं तथाद्वयं ॥ २१ ॥

अर्थः–सर्व दृश्य पदार्थांहून निराळें आकाश अत्यंत सूक्ष्म असून त्याच्या तोडीचें दुसरें कांहीं नाहीं, त्याप्रमाणें आतां या आकाशाच्या पलीकडे, सर्व मूर्तपदार्थांहून निराळा असा मी ब्रह्म आहें, त्या मला उपमा घ्यावयास दुसरें कांहींच नाहीं.

अर्थः—शब्द वगैरे ( पंचभूतांचे धर्म ) मला लागू नाहींत असें काठक उपनिषदात सांगितलें आहे. मी प्राण नाहीं, मन नाहीं वगैरे वचनांवरून मला कोणचाही विकार नाहीं, हें ठरतें.

विक्षेपो नास्ति तस्मान्मे न समाधिस्ततो मम ।
विक्षेपो वा समाधिर्वा मनसः स्याद्विकारिणः॥ १४ ॥

अर्थः—त्या स्थितीपासून विक्षेप ( कांहीं बदल ) होत नाहीं. मग पुनः समाधि लावायची कशाला. विक्षेप किंवा समाधि ह्या अवस्था विकार पावणाऱ्या मनाच्या आहेत.

अमनस्कस्य शुद्धस्य कथं तस्याद्द्वयं मम ।
अमनस्त्वाविकारित्वे विदेहव्यापिनो मम ॥ १५ ॥

अर्थः—मला मन नाहीं, मी निष्पाप आहें. मग माझ्या ठिकाणीं द्वैत कसें उत्पन्न होईल. मी सर्व व्यापणारा असल्यामुळें मला मन नाहीं आणि विकारहि नाहीं.

इत्येतद्यावदज्ञानं तावत्कार्यं ममाभवत् ।
नित्यमुक्तस्य शुद्धस्य बुद्धस्यच सदा मम ॥ १६ ॥

अर्थः—मी नित्य, शुद्ध, बुद्ध, आहें; ह्या वर सांगितल्या प्रकारचें ज्ञान जोंपर्यंत झालें नाहीं, तोंपर्यंत मला कर्म लागलें होतें.

समाधिर्वाऽसमाधिर्वा कार्यं चान्यत् कुतो भवेत् ।
मां हि ध्यात्वा बुद्ध्वाच मन्यन्ते कृतकृत्यताम् ॥१७॥

अर्थः—माझें ध्यान करून माझें ज्ञान करून घेणें हेंच कर्तव्य सर्वस्व असें मुमुक्षु समजतात. मी समाधिस्थितींत असो वा नसो, मला दुसरें कांहीं कर्तव्य असणें संभवेल कसें ?

अर्थः—उपनिषदांतील सार काढून तें विस्तारेंकरून मीं सांगितलें. गुरुपरंपरेनें उपदेश घेतलेल्या पुरुषानें हें संन्यास घेतलेल्या शिष्याला सांगावें. पण तो शिष्य शमादिषट्कसंपन्न असावा.

---

अथ स्वप्नस्मृतिप्रकरणं

स्वप्न आणि स्मरण यांचें साम्य.

स्वप्नस्मृत्योर्घटादीहि रूपाभासः प्रदृश्यते ।
पुरा नूनं तदाकारा धीर्दृष्टेत्यनुमीयते ॥ १ ॥

अर्थः—स्वप्नांत किंवा आठवणीच्यावेळीं घट वगैरे पदार्थांचे रूपाचा भास होतो, आणि त्यावरून पूर्वीं त्या प्रकारच्या आकाराचा बुद्धीला संस्कार झाला असावा, तसला पदार्थ पूर्वीं पाहिला असावा असा तर्क होतो.

भिक्षामटन्यथा स्वप्ने दृष्टो देहो न स स्वयं ।
जाग्रद्दृश्यात्तथा देहात् द्रष्टृत्वादन्यएव सः ॥ २ ॥

अर्थः—स्वप्नामध्यें भिक्षेकरितां जें शरीर हिंडत होतें तें कांहीं तो स्वतः नव्हता. त्याप्रमाणें जागृतीमधल्या देहाला पहाणारा त्या देहाहून निराळा असला पाहिजे.

मूषासिक्तं यथा ताम्रं तन्निभं जायते तथा ।
रूपादीन्व्याप्नुवच्चित्तं तन्निभं दृश्यते ध्रुवम् ॥ ३ ॥

अर्थः—( विस्तवानें वितळलेलें ) तांबें ज्या मुसींत टाकावें तिच्या सारखें बनतें, त्याप्रमाणें रूप वगैरे विषयांत गढलेलें अंतःकरण त्या विषयासारखें होतें यांत संशय नाहीं.

व्यंजको वा यथा लोको व्यङ्ग्यस्याकारतामियात् ।
सर्वार्थव्यंजकत्वाद्धीः अर्थाकारा प्रदृश्यते ॥ ४ ॥

ममात्मा स्वतआत्मेति भेदो व्योम्नो यथा भवेत्
एकस्य सुषिभेदेन तथा मम विकल्पितः ॥ २२ ॥

अर्थः–मी आत्मा आणि माझा आत्मा असा जो कोणी भेद मानतात तोहि कल्पनेचाच ( खरा नव्हे ). आकाशाला भोंक पाडून त्याचा तुकडा काढला असें होईल कां कधीं ?

भेदोऽभेदस्तथा चैको नाना चेति विकल्पितः।
ज्ञेयं ज्ञाता गतिर्गता मय्येकस्मिन् कुतो भवेत्॥ २३ ॥

अर्थः–भेद आहे आणि भेद नाहीं, एक आहे किंवा अनेक आहे, मी जाणणारा व जाणिवेचा विषय, मी गति आणि जाणारा, ह्याप्रमाणें सर्व कल्पना आहेत. माझ्या तोडीचा दुसरा कोणी नसल्यामुळें हें सर्व होणार कसें ?

न मे हेयं न चादेयं अविकारी यतो ह्यहम्।
सदा मुक्तस्तथा शुद्धः सदा बुद्धोऽगुणोऽद्वयः ॥ २४ ॥

अर्थः–मला काहीं [ संसार वगैरे ] टाकावयाचा आहे किंवा ( ब्रह्मत्व ) मिळवायचें आहे असा काहींच प्रकार नाहीं. कारण माझ्यांत कांहीं विकारच व्हावयाचा नाहीं, मी नित्यमुक्त, निर्गुण, अद्वैत, सदा शुद्ध बुद्ध असा आहें.

इत्येवं सर्वदात्मानं विचारत्सर्वे समाहितः।
विदित्वा मां स्वदेहस्थं ऋषिमुक्तो ध्रुवो भवेत् ॥२५॥

अर्थः–ह्याप्रमाणें सर्वदा आपल्याविषयीं चिंतन करीत असावें, सर्व गोष्टीचा त्याग करावा. आपल्याच देहांत रहाणाऱ्या आपल्याला आपण ओळखल्यानें सर्वज्ञ होऊन कायमचा मुक्त होशील.

वेदार्थो निश्चितो ह्येष समासेन मयोदितः।
संन्यासिभ्यः प्रवक्तव्यः शांतेभ्यः शिष्टबुद्धिना ॥२६॥

**अर्थः**–उपनिषदांतील सार काढून तें विस्तारेंकरून मीं सांगितलें. गुरुपरंपरेनें उपदेश घेतलेल्या पुरुषानें हें संन्यास घेतलेल्या शिष्याला सांगावें. पण तो शिष्य शमादिषट्कसंपन्न असावा.

---

## अथ स्वप्नस्मृतिप्रकरणं

### स्वप्न आणि स्मरण यांचें साम्य.

स्वप्नस्मृत्योर्घटादेर्हि रूपाभासः प्रदृश्यते ।
पुरा नूनं तदाकारा धीर्दृष्टेत्यनुमीयते ॥ १ ॥

**अर्थः**–स्वप्नांत किंवा आठवणीच्यावेळीं घट वगैरे पदार्थांचें रूपाचा भास होतो, आणि त्यावरून पूर्वीं त्या प्रकारच्या आकाराचा बुद्धीला संस्कार झाला असावा, तराला पदार्थ पूर्वीं पाहिला असावा असा तर्क होतो.

भिक्षामटन्यथा स्वप्ने दृष्टो देहो न स स्वयं ।
जाग्रद्दृश्यात्तथा देहात् द्रष्टृत्वादन्यएव सः ॥ २ ॥

**अर्थः**–स्वप्नामध्यें भिक्षेकरितां जें शरीर हिंडत होतें तें कांहीं तो स्वतः नव्हता. त्याप्रमाणें जागृतीमधल्या देहाला पहाणारा त्या देहाहून निराळा असला पाहिजे.

मूषासिक्तं यथा ताम्रं तन्निभं जायते तथा ।
रूपादीन्व्याप्नुवच्चित्तं तन्निभं दृश्यते ध्रुवम् ॥ ३ ॥

**अर्थः**–(विरतवानें वितळलेलें) तांबें ज्या मुषींत टाकावें तिच्या सारखें बनतें, त्याप्रमाणें रूप वगैरे विषयांत गढलेलें अंतःकरण त्या विषयासारखें होतें यांत संशय नाहीं.

व्यंजको वा यथा लोको व्यङ्ग्यस्याकारतामियात् ।
सर्वार्थव्यंजकत्वाद्धीः अर्थाकारा प्रदृश्यते ॥ ४ ॥

अर्थ –व्यंजक जो आलोक तो व्यंग्याच्या आकाराचा होतो, [ उदाहरण अग्नि व्यंजक तो लोखंडाच्या गोळ्याच्या व्यंग्याच्या आकाराचा होतो ] त्याप्रमाणें बुद्धि ही सर्व पदार्थांची व्यंजक ( दाखविणारी, ग्रहण करणारी ) असल्यामुळें ती त्या त्या पदार्थाच्या [ विषयाच्या ] आकाराची बनते.

धीरेवार्थस्वरूपा हि पुंसा दृष्टा पुरापिच ।
न चेत्स्वप्ने कथं पश्येत् स्मरतो वाकृतिं कुतः ॥ ५ ॥

अर्थः–मनुष्यानें पूर्वी पाहिलेल्या पदार्थाच्या स्वरूपाची बुद्धि होत नाहीं ह्मणावें तर स्वप्नामध्यें किंवा आठवण होतांच तो पदार्थ त्या आकृतीचा [ डोळ्यापुढें ] कसा दिसू लागतो ?

व्यंजकत्वं तदेवास्या रूपाद्याकारदृश्यता ।
द्रष्टृत्वं च दृशेस्तद्वत् व्याप्तिं स्याद्धिय उद्भवे ॥ ६ ॥

अर्थ–ती बुद्धि त्या पदार्थाचें रूप आणि आकार धरून दिसू लागते ह्याला बुद्धीचें व्यंजकत्व ह्मणावें. त्याप्रमाणेंच त्या विषयाची बुद्धि उत्पन्न झाली असता आत्मा त्या बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झाला ह्मणजे त्याला द्रष्टेपण प्राप्त होतें

चिन्मात्रज्योतिषा सर्वाः सर्वदेहेषु बुद्धयः ।
मया यस्मात्प्रकाश्यन्ते सर्वस्यात्मा ततो ह्यहम् ॥ ७ ॥

अर्थः–सर्व देहाच्या मधल्या सर्व बुद्धींना आपल्या चैतन्यप्रकाशानें मी प्रकाशीत करतों ह्मणून सर्वांच्या अंतर्यामीं रहाणारा मीच आहें

करणं कर्म कर्ता च क्रियास्वप्ने फलं च धीः ।
जाग्रत्येव यतो दृष्टा द्रष्टा तस्मादतोऽन्यथा ॥ ८ ॥

अर्थ –स्वप्नामध्यें कर्म, त्याची साधनें, करणारा, क्रिया आणि

त्याचें फल हीं सर्व बुद्धिच ( सोंगें घेते ) बनते. त्याप्रमाणें जागृतीमध्यें होते व या सर्वाला पहाणारा असतो, तेव्हां तो पहाणारा त्याहून निराळा असला पाहिजे. ॥

बुद्धयादीनां अनात्मत्वं हेयोपादेयरूपतः ।
हानोपादानकर्तात्मा न त्याज्यो नच गृह्यते ॥ ९ ॥

अर्थः—बुद्धि वगैरे ( कपड्यासारख्या ) वाटेल तेव्हां टाकतां येतात, घेतां येतात, यावरून त्या आत्मा नव्हे. पण हें घेणें व टाकणें करणारा जो आत्मा, त्याला टाकणारा किंवा घेणारा दुसरा कोणी नसतो.

सबाह्याभ्यंतरे शुद्धे प्रज्ञानैकरसे घने ॥
बाह्यमाभ्यन्तरं चान्यत् कथं हेयं प्रकल्पते ॥ १० ॥

अर्थः—बाहेरून आंतून निर्मल, केवळ ज्ञानस्वरूप, सर्व पूर्ण अशा आत्म्यापैकीं बाहेरील आंतील टाकण्यासारखें काय आहे.

य आत्मा नेति नेतीति परापोहेन शेषितः ।
स चेद्ब्रह्मविदात्मेष्टो यतेतात परं कथं ॥ ११ ॥

अर्थः—दुसऱ्या सर्व वस्तु आत्मा नव्हेत म्हणून टाकून दिल्यावर बाकी उरलेली आत्मवस्तु ज्ञान्याची अत्यंत प्रिय होणार, ती टाकण्याला तो आणखी प्रयत्न कसा करील ?

अशनायाद्यतिक्रान्तं ब्रह्मैवास्मि निरंतरं ।
कार्यवान् स्यां कथं चाहं विमृशेदेवमंजसा ॥१२॥

अर्थः—भूक वगैरे सहा विकार होत नाहींत असें ब्रह्म मी पूर्णपणें आहें, मग तो मी कर्म करणारा कसा होईन असा विचार सत्वर करावा.

पारगस्तु यथा नद्याः तत्स्थः पारं यियासति ।
आत्मज्ञश्चेत्तथा कार्यं कर्तुमन्यदिहेच्छति ॥ १३ ॥

अर्थ.—नदी उतरून पलीकडच्या कांठावर गेलेला मनुष्य आणखी पलीकडे जाण्याची इच्छा करतो काय? नाहीं. त्याप्रमाणेंच आत्मज्ञान झाल्यावर कर्म करण्याची इच्छा रहाणार कशी.

आत्मज्ञस्यापि यस्य स्यात् हानोपादानता यदि ।
न मोक्षार्हः स विज्ञेयो वान्तोऽसौ ब्रह्मणा ध्रुवम् ॥१४

अर्थ.—आत्मज्ञान झालें म्हणणाऱ्याला जर घेण्यादेण्याची (कर्तव्याची) काहीं आशा राहील तर तो ब्रह्मापासून भ्रष्टता पावला आहे, तो मोक्षाला योग्य नाहीं असें समजावें.

साहित्यं हि जगत्प्राणाः तस्मान्नाहर्निशैव वा ।
प्राणज्ञस्यापि न स्यातां कुतो ब्रह्मविदोऽद्वये ॥-१५॥

अर्थः-(मग संध्या वगैरे नित्य कर्मेंसुद्धां करणें नको काय?) सूर्य व सर्व सृष्टि ही सर्व प्राण म्हणजे हिरण्यगर्भ (मायेसहित ब्रह्म) आहे. त्यामुळें त्याला दिवस सपला, रात्र आली वगैरे संध्येचा काळ ठरत नाहीं. मग त्या हिरण्यगर्भाला जाणणारा जो ब्रह्मवेत्ता त्याला हा काळाचा निर्बंध कुठून असणार.

न स्मरत्यात्मनो ह्यात्मा विसरेद्वाप्यसुप्तचित् ।
मनोपि स्मरतीत्येतत् ज्ञानमज्ञानहेतुजं ॥ १६ ॥

अर्थ—चैतन्याचा विसर कधींच पडत नसल्यामुळें अमक्याची [वेळची वगैरे] आठवण आहे किंवा विसर पडला असें तेथें होत नाहीं. मनाला स्मरण होतें हें ज्ञान सुद्धां अज्ञानापासून [अविचारामुळें] झालेलें असतें.

शातुर्ज्ञेयः परो ह्यात्मा सोऽविद्याकल्पितः स्मृतः ।
अपोढे विषया तस्मिन् रज्ज्वां सर्प इवाद्वय ॥ १७॥

अर्थ—तो श्रेष्ठ आत्मा ज्ञात्याच्या ज्ञानाला विषय होईल

( त्याला जाणतां येईल. ) असा असेल तर तो अविद्येपासून झालेला असें ठरेल. तें अज्ञान विद्येच्या योगानें घालविल्यावर शिल्लक अद्वैत रहाणार. उदाहरण दोरीचें ज्ञान झाल्यावर सर्पभ्रांति नाहींशी होऊन दोरीच फक्त बाकी रहाणार.

कर्तृकर्मफलाभावात् सबाह्याभ्यंतरं ह्यजं ।
ममाहं वेत्ति यो भावः तस्मिन् कस्य कुतोऽभवत् ॥१८॥

अर्थः—कर्ता, कर्म, त्याचें फल वगैरे आत्म्याला कांहींच लागत नाहीं. त्यामुळें आंत बाहेर पूर्ण, जन्मरहित असें आत्मस्वरूप आहे. मग माझें ( ममता ) आणि मी ( अहंकार ) हे विकार कोणाला व कसें होणार !

आत्मा ह्यात्मीय इत्येष भावोऽविद्याप्रकल्पितः ।
आत्मैकत्वे ह्यसौ नास्ति बीजाभावे कुतः फलम्॥१९॥

अर्थः—आत्म्याचें अद्वैत समजल्यावर हा आत्मा, हा आत्म्याचा असा भेद अविद्येपासून होणारा तो कसा रहाणार. बीज जर मुळीं नसेल तर फल कसें येणार !

द्रष्टृ श्रोतृ तथा मंतृ विज्ञात्रेव तदक्षरम् ।
द्रष्ट्राद्यन्यन्न यत्स्मात् तस्माद्द्रष्टाहमक्षरम् ॥ २० ॥

अर्थः—पहाणारा, ऐकणारा, विचार करणारा, जाणणारा एक अविनाशी ब्रह्मरूप आहे. त्या पहाणाऱ्या वगैरेशिवाय दुसरें कांहीं नाहीं; त्यावरून मीच पहाणारा अविनाशी ब्रह्म आहें.

स्थावरं जंगमंचैव द्रष्टृत्वादिक्रियायुतम् ।
सर्वमक्षरमेवातः सर्वस्यात्माक्षरं त्वहम् ॥ २१ ॥

अर्थः—चर आणि अचर सर्व पदार्थ पहाणाराच्या वगैरे क्रियेनें युक्त आहेत. ( त्याच्याकडे त्या विषयांचें कर्तेपण येतें ) त्याअर्थी

सर्व दिसतें तेवढें अविनाशी ब्रह्मच आहे. मीच सर्वांच्या अंतर्यामींचा अविनाशी आत्मा आहे.

अकार्यशेषमात्मानं अक्रियात्मक्रियाफलम् ।
निर्ममं निरहंकारं यः पश्यति स पश्यति ॥ २२ ॥

अर्थः—कार्य न होऊन कार्यांतला शेष, क्रिया न करून क्रियेचें फल, ममत्वशून्य, अभिमानवर्जित असें आपलें रूप जो पहातो तो खरा ज्ञानी.

ममाहंकारयत्नेच्छाः शून्या एव स्वभावतः ।
आत्मनीति यदि ज्ञातं आध्वं स्वस्थाः किमीहितैः॥२३

अर्थः—आत्म्याच्या ठिकाणी स्वाभाविकपणेंच ममत्व, अभिमान, यत्न, इच्छा वगैरे काही नाहींत, असें ज्ञान जर ( पक्कें ) झालें, तर मग स्वस्थ बसा, विनाकारण कर्म करण्याची खटपट कशाला करिता ?

योऽहं कर्तारमात्मानं तथा वेत्तारमेवच ।
वेत्ति नात्मज्ञ एवासौ योऽन्यथाज्ञः स आत्मवित् ॥२४

अर्थः—मी आत्मा कर्ता, जाणणारा असें ज्याला वाटतें, तो ज्ञानी नव्हे; ज्याला ह्याच्यापेक्षां निराळें ( सर्व क्रियाशून्य असें ) ज्ञान झालें, त्याला आत्मस्वरूप कळलें खरें.

यथान्यत्वेऽपि तादात्म्यं देहादिष्वात्मनो मतम् ।
तथाऽकर्तुरविज्ञानात् फलकर्मात्मतात्मनः ॥ २५ ॥

अर्थः—ज्याप्रमाणें देह वगैरे ( स्थूल गोष्टी ) आत्म्याहून निराळ्या असून आभासानें आत्म्याचें तादात्म्य वाटतें, त्याप्रमाणें मी कर्ता वगैरे नव्हे हें ज्ञान नसल्यामुळें फल आणि कर्में यांविषयीं ( म्हणजे लिंगदेहाविषयी ) भ्रम उत्पन्न होतो.

दृष्टिः श्रुतिर्मतिर्ज्ञातिः स्वप्ने दृष्टा जनैः सदा ।
तासामात्मस्वरूपत्वात् अतः प्रत्यक्षतात्मनः ॥ २६ ॥

अर्थः—पहाणें, ऐकणें, विचार करणें, जाणीव वगैरे इंद्रियाच्या सर्व वृत्ती स्वप्नांत सर्व लोकांच्या अनुभवास येतात. त्या सर्वांना पहाणारा आत्मा असल्यामुळें व त्या वृत्ती आत्मरूप असल्यामुळें तो जणूं काय तेथें प्रत्यक्ष समजतो.

परलोकभयं यस्य नास्ति मृत्युभयं तथा ।
तस्यात्मज्ञस्य शोच्याः स्युः सब्रह्मेन्द्रा अपीश्वराः ॥२७॥

अर्थः—त्या ज्ञात्याला परलोकाची किंवा मृत्यूची भीति नसते, त्याला ब्रह्मदेव, इंद्र वगैरे महासमर्थ असूनही ( विषयोपभोगांत गुंतलेले पाहून ) तुच्छ वाटतात.

ईश्वरत्वेन किं तस्य ब्रह्मेन्द्रत्वेन वा पुनः ।
तृष्णा चेत्सर्वतश्छिन्ना सर्वदैन्योद्भवाऽशुभा ॥ २८ ॥

अर्थः—सर्व प्रकारच्या दैन्याला देणारी, पापी अशी जी आशा ती जर मूळासह तुटली ( पूर्ण वैराग्य झालें ) तर मग त्यांचें मोठें सामर्थ्य, किंवा ब्रह्मपद आणि इंद्रपद यांची किंमत काय उरली.

अहमित्यात्मधीर्या च ममेत्यात्मीयधीरपि ।
अर्थशून्ये यदा यस्य स आत्मज्ञो भवेत्तदा ॥ २९ ॥

अर्थः—मी आत्मा असा अहंकार आणि माझा आत्मा असें ममत्व हीं दोन्ही व्यर्थ आहेत असें ज्ञान ज्या कोणाला होईल तो आत्मज्ञानी झाला असें समजावें.

बुद्ध्यादौ सत्युपाधौ च तथासत्यविशेषता ।
यस्य चेदात्मनो ज्ञाता तस्य कार्यं कथं भवेत् ॥ ३० ॥

अर्थः—जागृती आणि स्वप्न या दोन्ही अवस्थांमध्यें बुद्धि वगैरे उ-

पाधि असतांना आणि सुषुप्तीच्या वेळीं त्या उपाधि नसतांना आत्मा सर्व ठिकाणीं सारखाच आहे असें समजल्यावर कर्तव्य काहींच उरलें नाहीं.

प्रसन्ने विमले व्योम्नि प्रज्ञानैकरसेऽद्वये ।
उत्पन्नात्मधियो भूत किमन्यत्कार्यमिष्यते ॥ ३१ ॥

अर्थः–ज्ञानस्वरूप, अद्वितीय, निष्पाप, निष्कलंक, आकाशाप्रमाणें आत्मा आहे असें ज्ञान झाल्यावर करण्याचें काहींच राहिलें नाहीं.

आत्मानं सर्वभूतस्थं अमित्रं चात्मनोऽपि यः ।
पश्यन्निच्छत्यसौ नूनं शीतीकर्तुं विभावसुम् ॥ ३२ ॥

अर्थः–सर्व भूतमात्राच्या ठिकाणीं मीच आत्मा आहें असें ज्ञ(?) ठरल्यावर त्याला कोणी शत्रु होईल असें ह्मणणें ह्मणजे अग्नीचा स्वभाव थंड उत्पन्न करण्याचा होईल असें ह्मणण्यासारखें आहे

प्रज्ञाप्राणानुकार्यात्मा छायेवाक्षादिगोचर ।
ध्यायतीवेति चोक्तो हि शुद्धो मुक्त स्वतो हि स ॥३३॥

अर्थ–बुद्धि आणि प्राण ( ह्या उपाधीनीं युक्त झाल्यावर ) ह्याच्याप्रमाणें आत्मा वागतो, इंद्रियांच्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला आत्मा तीं तीं ध्यान करण्याचीं वगैरे कार्यें करतो असें जरी वेदवचनातून आढळतें तरी तो स्वभावतः निर्मल आणि मुक्तच आहे

अप्राणस्यामनस्कस्य तथा संसर्गिणो दृशेः ।
व्योमवद् व्यापिनो ह्यस्य कथं कार्यं भवेन्मम ॥ ३४ ॥

अर्थ–प्राण आणि मन ह्याच्या विरहित [ ह्मणजे क्रिया आणि ज्ञान ह्या दोहोंच्या पलीकडे ] असलेला जो ज्ञानस्वरूप आत्मा त्याला कशाचा संसर्ग लागत नाहीं, तो आकाशाप्रमाणें सर्वांना

व्यापून आहे. तो आत्मा मी आहें मग आतां मला काय कर्तव्य उरलें ?

असमाधिं न पश्यामि निर्विकारस्य सर्वदा ।
ब्रह्मणो मे विशुद्धस्य शोध्यं नान्यद्विपाप्मनः ॥ ३५ ॥

अर्थः—मी नित्य विकाररहित असल्यामुळें माझी समाधि नाहीं असें मला वाटत नाहीं. मी निष्पाप, निष्कलंक ब्रह्म असल्यामुळें कांहीं शुद्ध व्हायचें राहिलें आहे असें उरलेलें नसतें.

गन्तव्यंच तथा नैव सर्वगस्याचलस्यच ।
नोर्ध्वं नाधस्तिरो वापि निष्कलस्यागुणत्वतः॥ ३६ ॥

अर्थः—मी स्थिर असून सर्वत्र भरलेला असल्यामुळें ( स्वर्गाला वगैरे किंवा अर्चिरादिमार्गानें ) कोठें जावयाचें आहे असें राहिलें नाहीं. मी सर्व संपूर्ण निर्गुण असल्यामुळें वर, खालीं, पुढें, मागें, बाजूला असा भाग उरलाच नाहीं.

चिन्मात्रज्योतिषो नित्यं तमस्तस्मिन्न विद्यते ।
कथं कार्यं ममैवाद्य नित्यमुक्तस्य शिष्यते ॥ ३८ ॥

अर्थः—चैतन्यप्रकाश नेहमींच असल्यामुळें येथें अंधकार किंवा अज्ञान रहात नाहीं. नित्यमुक्त असल्यामुळें ( मुक्त होण्याकरतां ) कांहीं करण्याचें उरलें नाहीं.

अमनस्कस्य का चिंता क्रिया वाऽनिंद्रियस्य का ।
अप्राणो ह्यमनाः शुभ्र इति सत्यं श्रुतेर्वचः ॥ ३८ ॥

अर्थः—मी मनातीत असल्यामुळें काळजी कसलीहि नाहीं. इंद्रियरहित असल्यामुळें क्रिया नाहीं. सारांश प्राणमनरहित आत्मा हें श्रुतीचें वचन निर्दोष सिद्ध आहे.

पाधि असताना आणि सुषुप्तीच्या वेळीं त्या उपाधि नसतांना आत्मा सर्व ठिकाणीं सारखाच आहे असें समजल्यावर कर्तव्य कांहींच उरलें नाहीं

प्रसन्ने विमले व्योम्नि प्रज्ञानैकरसेऽद्वये ।
उत्पन्नात्मधियो ब्रूत किमन्यत्कार्यमिष्यते ॥ ३१ ॥

अर्थः–ज्ञानस्वरूप, अद्वितीय, निष्पाप, निष्कलंक, आकाशाप्रमाणें आत्मा आहे असें ज्ञान झाल्यावर करण्याचें कांहींच राहिलें नाहीं

आत्मानं सर्वभूतस्थं अमित्रं चात्मनोऽपि यः ।
पश्यन्निच्छत्यसौ नूनं शीतीकर्तुं विभावसुम् ॥ ३२ ॥

अर्थः–सर्व भूतमात्राच्या ठिकाणीं मीच आत्मा आहें असें ह्र दृश्यावर त्याला कोणी शत्रु होईल असें ह्मणणें ह्मणजे अग्नीचा स्वभाव थंडी उत्पन्न करण्याचा होईल असें ह्मणण्यासारखें आहे

प्रज्ञाप्राणानुकार्यात्मा छायेवाक्षादिगोचरः ।
ध्यायतीवेति चोक्तो हि शुद्धो मुक्तः स्वतो हि सः ॥३३॥

अर्थ–बुद्धि आणि प्राण ( ह्या उपाधीनीं युक्त झाल्यावर ) ह्याच्याप्रमाणें आत्मा वागतो, इंद्रियांच्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला आत्मा तीं तीं ध्यान करण्याचीं वगैरे कार्यें करतो असें जरी वेदवचनातून आढळतें तरी तो स्वभावतः निर्मल आणि मुक्तच आहे

अप्राणस्यामनस्कस्य तथा संसर्गिणो दृशेः ।
व्योमवद्व्यापिनो ह्यस्य कथं कार्यं भवेन्मम ॥ ३४ ॥

अर्थ–प्राण आणि मन ह्यांच्या विरहित [ ह्मणजे क्रिया आणि ज्ञान ह्या दोहींच्या पलीकडे ] असलेला जो ज्ञानस्वरूप आत्मा त्याला कशाचा संसर्ग लागत नाहीं, तो आकाशाप्रमाणें सर्वांना

व्यापून आहे. तो आत्मा मी आहें मग आतां मला काय कर्तव्य उरलें ?

असमाधिं न पश्यामि निर्विकारस्य सर्वदा ।
ब्रह्मणो मे विशुद्धस्य शोध्यं नान्यद्विपाप्मनः ॥ ३५ ॥

अर्थः—मी नित्य विकाररहित असल्यामुळें माझी समाधि नाहीं असें मला वाटत नाहीं. मी निष्पाप, निष्कलंक ब्रह्म असल्यामुळें कांहीं शुद्ध व्हायचें राहिलें आहे असें उरलेलें नसतें.

गन्तव्यंच तथा नैव सर्वगस्याचलस्यच ।
नोर्ध्वं नाधस्तिरो वापि निष्कलस्यागुणत्वतः॥ ३६ ॥

अर्थः—मी स्थिर असून सर्वत्र भरलेला असल्यामुळें ( स्वर्गाला वगैरे किंवा अर्चिरादिमार्गानें ) कोठें जावयाचें आहे असें राहिलें नाहीं. मी सर्व संपूर्ण निर्गुण असल्यामुळें वर, खालीं, पुढें, मागें, बाजूला असा भाग उरलाच नाहीं.

चिन्मात्रज्योतिषो नित्यं तमस्तास्मिन्न विद्यते ।
कथं कार्यं ममैवाद्य नित्यमुक्तस्य शिष्यते ॥ ३८ ॥

अर्थः—चैतन्यप्रकाश नेहमीच असल्यामुळें येथें अंधकार किंवा अज्ञान रहात नाहीं. नित्यमुक्त असल्यामुळें ( मुक्त होण्याकरतां ) कांहीं करण्याचें उरलें नाहीं.

अमनस्कस्य का चिंता क्रिया वाऽनिंद्रियस्य का ।
अप्राणो ह्यमनाः शुभ्र इति सत्यं श्रुतेर्वचः ॥ ३८ ॥

अर्थः—मी मनातीत असल्यामुळें काळजी कसलीहि नाहीं. इंद्रियरहित असल्यामुळें क्रिया नाहीं. सारांश प्राणमनरहित आत्मा हें श्रुतीचें वचन निर्दोष सिद्ध आहे.

अकालत्वाददेशत्वात् अदिक्त्वादनिमित्तत ।
आत्मनो नैव कालादेः अपेक्षाऽध्यायतः सदा ॥ ३९ ॥

अर्थ.—काल, देश, दिशा, मुहूर्त ह्या कशाचाहि त्या आत्म्याचे ठिकाणीं संपर्क नसल्यामुळें सदासर्वदा आत्मचिंतन करणाऱ्याला ह्या कशाचीहि गरज नसते.

यस्मिन् देवाश्च वेदाश्च पवित्रं कृत्स्नमेकताम् ।
व्रजेत्तन्मानसं तीर्थं यस्मिन्स्नात्वा अमृतो भवेत् ॥४०॥

अर्थः—मनामध्यें ब्रह्मोपदेशामुळें झालेलें ( संसारताप दूर करणारें ) जें हें पवित्र स्थान, ज्या पवित्र ठिकाणीं सगळे ( तीर्थांवरचे ) देव आणि वेद एकत्र येतात, त्या तीर्थामध्यें स्नान केल्यास मुक्त होतो.

न चास्ति शब्दादिरनन्यवेदन ।परस्परेणापि न चैव दृश्यते॥
परेण दृश्यास्तु यथा रसादयः। तथैव दृश्यत्वत एव दैहिकाः ॥ ४१ ॥

अर्थः—शब्द वगैरे पंचभूताचे धर्म दुसऱ्यानें प्रकाशित नाहींत असें नाहीं, ( त्यांना स्वप्रकाश नाहीं ), त्याप्रमाणेंच ते एकमेकाला ( उ० शब्द रूपाला वगैरे ) प्रकाशित करीत नाहींत. ज्याप्रमाणें देहांतील रस वगैरे त्या ( आत्म्याच्या ) अधिष्ठानामुळें दिसतात, तीच स्थिति त्या रस वगैरे भूताच्या धर्मांची होते.

अहंममेत्येषणयत्नविक्रिया सुखादयस्तद्वदिह प्रदृश्यतः ।
दृश्यत्वयोगाच्च परस्परेण ते न दृश्यतां यांति तत परो भगवान् ॥ ४२ ॥

अर्थ —ममत्व, अहंकार, इच्छा, यत्न, क्रिया, सुख वगैरे ( मानसिक वृत्ती ) त्या ( शब्दा ) प्रमाणेंच स्वयंप्रकाश नाहींत,

किंवा एकमेकांला दाखवूं शकत नाहींत. तेव्हां त्यांना प्रकाश देणारा तूं त्यांच्या पलीकडे असलास पाहिजे

अहंक्रियाद्या हि समस्तविक्रियाः। सकर्तृका कर्मफलेन संहता। चितिस्वरूपेण समंततोऽर्कवत्। प्रकाश्यमानाऽसितता आत्मनो ह्यतः ॥ ४३ ॥

अर्थः—अहंकार वगैरे सर्व विकार, त्यांचा कर्ता, कर्म, फळ वगैरे सर्वांना प्रकाश देणारें सूर्याप्रमाणें चैतन्यरूप आहे, ह्यावरून आत्मा ह्या कशानींहि बद्ध नाहीं हें सिद्ध झालें.

दृशिस्वरूपेण हि सर्वदेहिनां। वियद्यथा व्याप्य मनांस्यवस्थितः॥ अतो न तस्मादपरोऽस्ति वेदिता। परोऽपि तस्मादत एव ईश्वरः॥ ४४ ॥

अर्थः—आकाश जसें सर्वांना व्यापून आहे त्याप्रमाणें ज्ञानस्वरूपानें सर्व प्राण्यांचीं मनें व्यापून आत्मा आहे. तेव्हां त्याच्याशिवाय खरी जाणीव इतर दुसऱ्या कोणाला नाहीं, ह्यावरूनच ईश्वर जरी त्यापेक्षा पलीकडे तरी तो त्याचेंच रूप आहे.

शरीरबुद्ध्योर्यदि चान्यदृश्यता। निरात्मवादास्तु निराकृता मया॥ परश्च शुद्धो ह्यविशुद्धिकर्मतः। सुनिर्मलः सर्वगतोसि तेऽद्वयः॥ ४५ ॥

अर्थः—स्थूल सूक्ष्म देह स्वप्रकाश नाहींत, ते आत्म्याच्या आधारावर प्रगट होतात, असें सांगितल्यानें आत्मा नाहीं म्हणणाऱ्याचें खंडण झालें. पाप पुण्य देणाऱ्या कर्मापासून तो अलिप्त असल्यामुळें निष्पाप, निष्कलंक, सर्व ठिकाणीं असणारा, अद्वितीय आत्माच आहे.

घटादिरूपं यदि ते न शुद्ध्यते। मनः प्रवृत्तं बहुधा स्व-

वृत्तिभिः ॥ अशुध्यचिद्रूपविकारदोषता मतेर्यथा वारयितुं न पार्यते ॥ ४६ ॥

अर्थः—विषयाकार वृत्तींनी व्यापलेलें मन व घट वगैरे पदार्थांचे आकार ह्यांचा ग्रहण करणारा त्यांचा प्रकाशक आत्मा नाहीं असें धरलें तर बुद्धीमध्यें पडलेलें आत्म्याचें प्रतिबिंब दूर करणें कठीण पडेल, आणि मळीनपणा, जडत्व वगैरे दोष अवश्य येऊं लागतील ( आत्मा नसल्यावर ते दोष घालविणार कोण ? )

यथा विशुद्धं गगनं निरंतरं । न सज्जते वापिच लिप्यते तथा ॥ समस्तभूतेषु सदैव तेष्वयं । समः सदात्मा ह्यजरोऽमरोऽभयः ॥ ४७ ॥

अर्थः—ज्याप्रमाणें हें निर्मळ आकाश सगळीकडे भरलेलें असून कशांतही मिळत नाहीं, किंवा कशाचाही दोष त्याला लागत नाहीं, त्याप्रमाणें जरा, मृत्यु, भय ह्यापासून सदोदित दूर असलेला आत्मा सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी नेहमीं सारखा भरलेला आहे, तरी त्याच्यांत तो लिप्त नाहीं.

अमूर्तमूर्तानि च कर्मवासना । दृशिस्वरूपस्य बहिः प्रकल्पिता ॥ अविद्यया ह्यात्मनि मूढदृष्टिभिः । अपोह्य नेतीत्यवशेषितो दृशिः ॥ ४८ ॥

अर्थः—कर्मामुळें राहिलेली इच्छा, स्थिर आणि चल पदार्थ हे सर्व ज्ञानस्वरूप आत्म्यावर अज्ञानामुळें मूर्ख लोकांनीं कल्पिले ( मानले ) आहेत, ते सर्व ( हें नाहीं तें आत्मा ) नाहीं अशा विचारानें टाकून देऊन बाकी शिल्लक राहिलें तें ज्ञानस्वरूप ब्रह्म होय.

प्रबोधरूपं मनसोऽर्थयोगजं ।
स्मृतौच सुप्तस्यच दृश्यतेऽर्थवत् ॥

तथैव देहप्रतिमानतः पृथक् ।
दृशेः शरीरं च मनश्च दृश्यते ॥ ४९ ॥

अर्थः–विषयाशीं संयोग पावल्यानें विषयाकार झालेल्या मनाचें रूप आठवणीच्या वेळीं आणि स्वप्नांत त्या त्या विषयाप्रमाणें दिसतें. त्याप्रमाणें देहाशीं संबंध असल्यामुळें ज्ञानस्वरूप आत्म्याला स्थूल आणि लिङ्ग असे दोन प्रकारचे देह आहेत असें वाटतें.

स्वभावशुद्धे गगने घनादिके। मलेऽपयाते सति चाविशेषिता।
यथाच तद्वच्छ्रुतिवारितद्वये। सदाविशेषो गगनोपमे दृशौ॥५०

अर्थः–स्वभावतः निर्मल अशा आकाशांत ढग वगैरे कांहीं केर आला काय आणि गेला काय, त्या आकाशाच्या स्वरूपांत कांहींच बदल होत नाहीं, त्याप्रमाणें आकाशाप्रमाणें नेहमीं एकसारख्या रहाणाऱ्या ज्ञानस्वरूपाच्या वरील द्वैत वेदवचनांनीं काढून टाकलें काय आणि नाहीं काय, त्या ज्ञानस्वरूपांत कांहींच बदल होत नाहीं.

---

## अथ नान्यदन्यत्प्रकरणम्

### दुसरें कांहीं नाहीं.

नान्यदन्यद्भवेद्यस्मान्नान्यत्किंचिद्विचिंतयेत् ।
अन्यस्यान्यत्वभावे हि नाशस्तस्य ध्रुवो भवेत् ॥ १ ॥

अर्थः–त्या (ब्रह्म) शिवाय दुसरें कांहीं नाहीं, दुसरें कांहीं होणार नाहीं. म्हणून आत्म्याशिवाय दुसऱ्या कशाचें ध्यान करूं नये. दुसरें जें कांहीं असेल, त्याच्या स्वरूपांत जर पालट पडेल तर त्याचा नाश होणार असें खास समजावें.

स्मरतो दृश्यते दृष्टं पटे चित्रमिवार्पितम् ।
यत्र येन च तौ ज्ञेयौ सत्त्वक्षेत्रज्ञसंज्ञकौ ॥ २ ॥

अर्थः—स्मरण करूं लागलें ह्मणजे जें दृष्टीनें पाहिलें त्यांचेंच चित्र कापडावर काढल्याप्रमाणें दिसतें. त्यांत जें दिसतें तें सत्त्व, आणि ज्याच्या योगानें दिसतें तो क्षेत्रज्ञ असें ह्मणावें.

फलान्तं चानुभूतं यत् युतं कर्त्रादिकारकैः ।
स्मर्यमाणं हि कर्मस्थं पूर्वं कर्मैव तच्चितः ॥ ३ ॥

अर्थः—जें कर्म घडण्याला कर्ता वगैरे साधनें लागलीं व ज्याचा अनुभव त्या कर्माचें फल मिळालें वगैरे घडला, त्या कर्माचें स्मरण झालें असतां ती वृत्ति कर्मावरच संपते ( कर्त्याकडे येत नाहीं ).

द्रष्टुश्चान्यद्भवेद्दृश्यं दृश्यत्वात् घटवत् सदा ।
दृश्याद्द्रष्टाऽसजातीयो न धीवत्साक्षितान्यथा ॥ ४ ॥

अर्थः—घट पहाणाऱ्याहून घट निराळा असतो, त्याप्रमाणें पहाणाऱ्याहून पहाण्याची वस्तू निराळी असते; दृश्य आणि द्रष्टा सजातीय ( एकजातीचे ) नसतात, एरवीं बुद्धिप्रमाणें तो आत्मा सगळ्याचा साक्षी झाला नसता.

स्वात्मबुद्धिमपेक्ष्यासौ विधीनां स्यात्प्रयोजकः ।
जात्यादिः शववचेन तद्धानारमताऽन्यथा ॥ ५ ॥

अर्थः—मी व माझा असा बुद्धीचा भ्रम झाल्याकारणानें कर्माचा ( संसाराचा वगैरे ) तो कर्ता होतो, त्याला मग जाति, वर्ण वगैरे धर्म लागतात; प्राण गेल्यावर सुद्धां त्या देहाला हा माझा अमूक [ मामा, काका, ] वगैरे ह्मणत असतो, तसें नसतें तर असला जड धर्माचा आभास आत्म्यावर झाला नसता.

न प्रियाप्रिय इत्युक्तेः नादेहत्वं क्रियाफलम् ।
देहयोगः क्रियाहेतुः तस्माद्विद्वान् क्रियास्त्यजेत् ॥६॥

अर्थः— आत्म्याला शरीर नसल्यामुळें त्याला आवडनिवड कांहीं नाहीं असें छांदोग्यांत [ ८-१२१ येथें ] सांगितलें आहे. देहरहित होणें हें क्रिया [ कर्म ] केल्यानें साध्य होणार नाहीं. क्रिया केल्यानें देहाचा संबंध जडणें हाच परिणाम होणार; यासाठीं शहाण्या पुरुषानें कर्माचा त्याग करावा.

कर्मस्वात्मा स्वतंत्रश्चेत् निवृत्तौ च तथेष्यताम् ।
अदेहत्वे फलेऽकार्ये ज्ञाते कुर्यात् कथं क्रियाः ॥ ७ ॥

अर्थः—कर्म करीत असतांना आत्मा स्वतंत्र असतो असें म्हट-ल्यास मग कर्मत्याग केल्यावर तर तो तसा स्वतंत्र असणारच. कर्म केल्यानें शरीराचा संसर्ग सुटणें हें फल साध्य होणार नाहीं. ही गोष्ट समजल्यावर मग कर्मे कां करावें ?

जात्यादीन् संपरित्यज्य निमित्तं कर्मणां बुधः ।
कर्महेतुविरुद्धं यत् स्वरूपं शास्त्रतः स्मरेत् ॥ ८ ॥

अर्थः—कर्म घडण्याचें कारण जो जाति वगैरेचा अभिमान तो शहाण्या मनुष्यानें टाकून द्यावा. कर्माचें कारण ( जाति वगैरे ) सलेलें आत्म्याचें स्वरूप शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें समजून घेऊन चिंतन करावें.

आत्मैकः सर्वभूतेषु तानि तस्मिंश्च खे यथा ।
पर्यगाद्व्योमवत्सर्वं शुक्रं दीप्तिमदिष्यते ॥ ९ ॥

अर्थः—सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं एकच आत्मा भरलेला आहे. तीं भूतेंहि आत्म्याच्या ठिकाणीं आकाशामध्यें असल्यासा-रखीं आहेत. तो आत्मा शुक्र ( तेजस्वरूप ) ह्या सर्वाला आका-

शाप्रमाणें व्यापून प्रकाशयुक्त आहे, असें ईशावास्य उपनिषदांत सांगितलें आहे.

व्रणस्नाय्वोरभावेन स्थूलं देहं निवारयेत् ।
शुद्धापापतयाऽलेपं लिंगं चाकायमित्युत ॥ १० ॥

अर्थः–जखम झालेला स्नायु मी नव्हे, असें पाहून स्थूल देहाचा त्याग करावा. तो निष्कलंक, निष्पाप, आहे म्हणून त्याला कशाचा संपर्क लागत नाहीं असें समजून 'अकायं' ह्या श्रुतीवरून लिंग-देह सोडावा.

वासुदेवो यथाऽश्वत्थे स्वदेहे चाब्रवीत्समम् ।
तद्वद्वेत्ति य आत्मानं समं स ब्रह्मवित्तमः ॥ ११ ॥

अर्थः–भगवान् परमात्मा जसा पिंपळासारख्या झाडांत आहे त्याप्रमाणें तो माझ्या ह्या देहांत आहे, असें आत्म्याचें ज्ञान ज्याला झालें त्याला खरा ब्रह्मज्ञानी म्हणावा.

यथा ह्यन्यशरीरेषु ममाहंता न चेष्यते ।
अस्मिन्नपि तथा देहे धीसाक्षित्वाविशेषतः ॥ १२ ॥

अर्थः–दुसरे देह मला दिसतात म्हणून ते नश्वर आहेत असें समजून मी त्यांच्याविषयी ममत्व धरीत नाहीं. त्याप्रमाणेंच ह्या दे-हाबद्दल तसेंच वाटलें पाहिजे, कारण दोन्ही देहांविषयी बुद्धीचा साक्षीपणा सारखाच आहे.

रूपसंस्कारतुल्याधी रागद्वेषौ भयंच यत् ।
गृह्णते धीश्रयं तस्मात् ज्ञाता शुद्धोऽभयः सदा ॥१३॥

अर्थः–प्रेम किंवा तिटकारा उत्पन्न होण्याचें कारण त्या त्या-विषयापासून झालेल्या परिणामानें पीडा किंवा सौख्य किंवा दुःख होतें हें होय, त्याप्रमाणेंच भय सुद्धां समजावें. म्हणजे ज्याप्रमाणें बुद्धि त्या

विषयाचें ग्रहण करील त्याप्रमाणें विकार होतो. तेव्हां ज्ञाता ( त्या बुद्धीहून मी निराळा आहें असें समजणारा ) निष्पाप असून त्याला काहींच भीति नाहीं.

यन्मनस्तन्मयोऽन्यत्वे नात्मत्वाप्तौ क्रियात्मनि ।
आत्मत्वे चानपेक्षित्वात् सापेक्षं हि न तत्स्वयं ॥१४॥

अर्थः—मन ज्याचें ध्यान करील त्या प्रकारचें होतें, पण आत्मप्राप्तीला तसली कांहीं क्रिया करावी लागत नाहीं. आत्मत्व यायला कांहीं क्रियेची जरूर नाहीं, जर जरूर लागती तर त्याला आत्मत्व मूळचें नव्हतें असें होईल.

खमिवैकरसा ज्ञप्तिः अविभक्ताऽजराऽमला ।
चक्षुराद्युपधाना सा विपरीता विभाव्यते ॥ १५ ॥

अर्थः—आकाश ज्याप्रमाणें सगळीकडे सारखें असतें त्याप्रमाणें जाणीव विभागरहित, जीर्ण न होणारी, निष्पाप आहे. तिला डोळे वगैरे उपाधि लागल्या म्हणजे ती विकारपूर्ण दिसू लागते.

दृश्यत्वादहमित्येष. नात्मधर्मो घटादिवत् ।
तथान्ये प्रत्ययाः ज्ञेयाः दोषाश्चात्माऽमलो ह्यतः ॥ १६॥

अर्थः—घट दिसतो तो आत्मा नव्हे त्याप्रमाणें मी असा जो अनुभव येतो तो आत्मा नव्हे, असें समजावें. त्याप्रमाणें इतर सर्व अनुभव हे दोष आहेत असें ओळखावें. आत्मा शुद्ध ( निर्दोष ) आहे.

सर्वप्रत्ययसाक्षीत्वात् अविकारी च सर्वगः ।
विक्रियेत यदि द्रष्टा बुद्ध्यादीवाल्पविद्भवेत् ॥ १७॥

अर्थ—सर्व अनुभवाचा जाणणारा तो असल्यामुळें तो सर्वत्र ठिकाणीं असणारा विकाररहित समजावा. तो पहाणाराच जर वि-

कार पावेल तर बुद्धि वगैरेप्रमाणें तोहि अल्प जाणणारा ( पूर्ण नव्हे ) असा होईल.

न दृष्टिर्लुप्यते द्रष्टुः चक्षुरादेर्यथैव तत् ।
नहि द्रष्टुरिति ह्युक्तं तस्मात् द्रष्टा सदैव दृक् ॥ १८ ॥

अर्थः—डोळ्याची पहाण्याची शक्ति जशी मर्यादित आहे तशी आत्म्याची नाहीं. द्रष्ट्याच्या दृष्टीचा लोप होत नाहीं असें श्रुतिवचन आहे. तेव्हां द्रष्टा आत्मा सर्वत्र पहाणाराच असणार.

संघातो वास्मिभूतानां कारणानां तथैव च ।
व्यस्तं वाऽन्यतमो वाऽस्मि कोवाऽस्मीति विचारयेत् १९

अर्थः—मी कोण आहें, हा भूतसंघात मी, कां हीं साधनें (इंद्रियें) मी, कां ह्याच्याहून निराळा मी, ह्या गोष्टीचा विचार करावा.

व्यस्तं नाहं समस्तं वा भूतमिंद्रियमेवच ।
ज्ञेयत्वात्करणत्वाच्च ज्ञाताऽन्योऽस्माद्‌घटादिवत्॥२०॥

अर्थः—हीं ह्यांपैकीं एकही नाहीं किंवा सगळीं नाहीं, पंचभूतें नाहीं किंवा इंद्रियें नाहीं, हीं सर्व जाणण्याचा विषय आणि साधनें आहेत. घटाचा पहाणारा त्याहून निराळा त्याप्रमाणें ज्ञानस्वरूप मी निराळा आहें.

आत्माग्निरिन्धना बुद्धिः अविद्याकामकर्मभिः ॥
दीपिता प्रज्वलत्येषा द्वारैः श्रोत्रादिभिः सदा ॥२१॥

अर्थः—आत्मा हाच अग्नि; त्यांत पेटायला बुद्धिरूप लांकडें घातलीं आहेत. कान वगैरे इंद्रियांच्या द्वारानें अज्ञानामुळें विषयभोगानें ती बुद्धि पेट घेऊन तिच्या ज्वाला निघतात.

दक्षिणाक्षिप्रधानेषु यदा बुद्धिर्विचेष्टते ।
विषयैर्हविषा दीप्ता आत्माग्निः स्थूलभुक्तदा ॥ २२ ॥

अर्थः—ज्यावेळीं उजवा डोळा इत्यादि इंद्रियांच्या द्वारानें बुद्धि विषयोपभोग घेऊं लागते, तेव्हां विषयरूपी बळी मिळाल्यानें आत्मारूप अग्नि प्रज्वलित होऊन स्थूल विषयांचा भोग घेतो (असें दिसतें).

हूयंते तु हवींषीति रूपादिग्रहणे स्मरन् ।
अरागद्वेष आत्माग्नौ जाग्रद्दोषैर्न लिप्यते ॥ २३ ॥

अर्थः—विषय ( रूप वगैरे ) उपभोगिले जात असतांना त्याविषयीं प्रेम किंवा द्वेष न धरतां, ह्या आत्मारूप अग्निमध्यें त्या आहुती पडत आहेत असें सदोदित स्मरण ठेवलें तर त्या विषयोपभोगापासून होणारे ( पापपुण्य वगैरे ) दोष लागत नाहींत.

मानसे तु गृहे व्यक्तः सोऽविद्याकर्मवासनाम् ।
पश्यंस्तैजस आत्मोक्तः स्वयंज्योतिः प्रकाशिता ॥२४॥

अर्थः—मनरूप उपाधीच्या घरांत आत्मा ( बिंबित होऊन ) आकाराला येतो असें वाटतें; त्याला कारण अज्ञानामुळें घडलेल्या कर्मांची वासना होय. त्यावेळीं त्याला तैजस ह्मणतात. ती उपाधी गेली कीं आत्मा स्वयंप्रकाश सर्वांचा साक्षी मूळचा आहे तसा आहेच.

विषया वासना वाऽपि चोद्यन्ते नैव कर्मभिः ।
यदा बुद्धौ तदा ज्ञेयः प्राज्ञ आत्मा ह्यनन्यदृक् ॥२५॥

अर्थः—जेव्हां अंतःकरणाच्या ठिकाणीं विषय किंवा वासना ह्मणजे स्थूल किंवा सूक्ष्म उपाधि कर्मांच्या योगानें उत्पन्न होत नाहींत, त्यावेळीं ( प्रज्ञा ह्मणजे ज्ञान पूर्ण असल्यामुळें ) आत्म्याला प्राज्ञ असें ह्मणतात. त्या वेळीं तो दुसरें कांहींच जाणत नाहीं.

मनोबुद्धींद्रियाणां या अवस्थाः कर्मचोदिताः ।
चैतन्येनेव भास्यन्ते रविणेव घटादयः ॥ २६ ॥

अर्थः—कर्मांच्या संस्कारानें मन, बुद्धि आणि इंद्रियें यांच्या द्वा-

रानें ज्या क्रिया घडतात, त्या सर्वांची जाणीव देणारें चैतन्य (स्वप्न, सुषुप्ति आणि जागृती ) या अवस्थांमध्यें असतें. ( सूर्यप्रकाशावांचून घट वगैरे जसे दिसणार नाहीत, त्याप्रमाणेंच चैतन्याशिवाय हे दिसले नसते. )

तत्रैवं सति बुद्धीर्नं आत्माभासावभासयन् ।
कर्ता तासां यदर्थास्ता मूढैरेवाभिधीयते ॥ २७ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें असल्यामुळें तिन्ही अवस्थांत आत्मा आपल्या चैतन्यरूपानें या बुद्धीला प्रकाश देतो. त्या आत्म्याच्या भासामुळें त्या बुद्धीचा कर्ता तो आत्मा आहे असें मूर्ख लोक म्हणतात.

सर्वज्ञोऽप्यत एव स्यात् स्वेन भासावभासयन् ।
सर्वं सर्वक्रियाहेतोः सर्वकृत्त्वं तथात्मनः ॥ २८ ॥

अर्थः—आत्म्याच्या प्रतिबिंबामुळें जाणीव आल्यामुळें त्याला सर्वज्ञपणा येतो, सर्व कर्मांचा साक्षी तो असतांना त्याच्याजवळ असण्यानें त्याला कर्ता हें विशेषण आलें असें वाटतें.

सोपाधिश्चैवमात्मोक्तो निरूपाख्योऽनुपाधिकः ।
निष्कलो निर्गुणः शुद्धः तं मनो वा वच नाप्नुतः ॥२९॥

अर्थः—अशा वेळीं त्या आत्म्याला उपाधि असलेला आत्मा असें म्हणतात. परन्तु त्याला उपाधी नाहीं, विषयाकार नसल्यामुळें दिसत नाहीं, कलारहित, गुणविरहीत, निष्कलंक असा तो आहे. वाणी किंवा मन त्याच्यापर्यंत जाऊं शकत नाहीं.

चेतनोऽचेतनो वापि कर्ताऽकर्ता गतोऽगतः ।
बद्धो मुक्तस्तथा चैकोऽनेकः शुद्धोऽन्यथेति वा ॥ ३० ॥

—चेतन, जड, कर्ता, कर्मरहित; व्यापक, एकदेशी,

बद्ध, मुक्त, अद्वितीय, सर्व, निष्पाप, किंवा त्याच्या उलट यांपैकीं कसल्या प्रकारचा आत्मा ह्मणावा.

अप्राप्यैव निवर्तते वचो धीभिः सहैव तु ।
निर्गुणत्वात् क्रियाभावात् विशेषाणां अभावतः॥३१॥

अर्थः—आत्मा निर्गुण, कर्मरहित, ( सजातीय किंवा विजातीय ) गुणरहित असल्यामुळें वाणी किंवा बुद्धि त्याच्यापर्यंत न जातां परत येते.

व्यापकं सर्वतो व्योम मूर्तैः सर्वैर्वियोजितम् ।
यथा तद्वदिहात्मानं विन्द्याच्छुद्धं परं पदं ॥ ३२ ॥

अर्थः—आकाश सर्व मूर्त पदार्थांला व्यापून त्यापासून संसर्ग पावत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याची स्थिति समजावी, तें श्रेष्ठपद अगदीं शुद्ध आहे.

दृष्टं हित्वा स्मृतिं तस्मिन् सर्वग्रस्थ तमस्त्यजेत् ।
सर्वदृग्ज्योतिषा युक्तो दिनकृच्छार्वरं यथा ॥३३॥

अर्थः—जाग्रत् अवस्था टाकून त्याविषयीं स्मरण ह्मणजे स्वप्नावस्था व त्या सर्वांपुढची अंधकारमय सुषुप्ति ( गाढ झोंप ) ही टाकावी. आत्मा स्वयंप्रकाश असल्यामुळें सूर्य जसा रात्रीच अंधकार घालवितो तसा हा या तिन्ही अवस्थेचा अज्ञानांधकार घालवितो.

रूपस्मृत्यंधकारार्थाः प्रत्यया यस्य गोचराः ।
स एवात्मा समो द्रष्टा सर्वभूतेषु सर्वगः ॥ ३४ ॥

अर्थः—जागृती, स्वप्न, सुषप्ती या तिन्ही अवस्थेतील अनुभव ज्याला कळतात तो आत्मा ह्मणावा, तो सर्वत्र सारखा, पहाणारा सर्व भूतांच्या ठिकाणीं रहाणारा असा आहे.

आत्मबुद्धिमनश्चक्षुर्विषयालोकसंगमात् ।
विचित्रो जायते बुद्धेः प्रत्ययोऽज्ञानलक्षणः ॥ ३५ ॥

अर्थः—आत्मा, बुद्धि, मन, डोळे वगैरे इंद्रियें, विषय ह्या सर्वांचा स्वरूपाशीं संबंध आल्यामुळें अज्ञानामुळें बुद्धीचा अनुभव कांहीं निराळा होतो.

विविच्यास्मात्त्वमात्मानं विद्याच्छुद्धं परं पदं ।
द्रष्टारं सर्वभूतस्थं समं सर्वभयातिगम् ॥ ३६ ॥

अर्थः—( ह्या बुद्धि वगैरे समुदायांतून ) आत्मा निवडून काढावा, तें स्थान फार श्रेष्ठ आहे; आत्मा सर्वांना पहाणारा, सर्व भूतांच्या ठिकाणीं रहाणारा, सर्वत्र सारखा, कोणच्याहि प्रकारचें भय तेथें नाहीं.

समस्तं सर्वगं शांतं विमलं व्योमवत् स्थितं ।
निष्कलं निष्क्रियं सर्वं नित्यं द्वंद्वविवर्जितम् ॥ ३७ ॥

अर्थः—सर्व तोच आहे, सर्वत्र ठिकाणीं आहे, विकाररहित आहे, निष्पाप आहे, आकाशाप्रमाणें भरलेला आहे. त्याला कमी-जास्त कळा नाहीं, तो कर्मरहित आहे, त्याचेंच हें रूप आहे, त्याला कधीं दुसरी जोड मिळणार नाहीं.

सर्वप्रत्ययसाक्षीज्ञः कथं ज्ञेयो मयेच्युत ।
विमृश्यैवं विजानीयात् ज्ञानकर्म न वेति वा ॥ ३८ ॥

अर्थः—सर्व अनुभव साक्षी म्हणून पहाणारा तो कसा आहे ? मला कळण्यासारखा आहे कीं नाहीं ? ह्याप्रमाणें विचार करून त्याचें ज्ञान करून घ्यावें. ज्ञानाला कांहीं कर्म पाहिजे कीं नाहीं याचा निर्णय करून घ्यावा.

अदृष्टं द्रष्टृविज्ञातं दृश्यमित्यादि शासनात् ।
नैवं ज्ञेयं मयान्यैर्वा परं ब्रह्म कथंचन ॥ ३९ ॥

अर्थः—पहाणाराला दिसतें तें फार थोडें असतें ह्या वचनावरून तें ब्रह्म न दिसण्यासारखें आहे. तें परब्रह्म मला किंवा दुसऱ्याला कांहीं केलें तरी अशा प्रकारानें जाणतां येणार नाहीं.

स्वरूपाव्यवधानाभ्यां ज्ञानालोकस्वभावतः ।
अन्यज्ञानानपेक्षत्वात् ज्ञातं चैव सदा मया ॥ ४० ॥

अर्थः—जें स्वरूपाहून निराळें असेल, किंवा त्याच्यापासून झाकलेलें असेल तें ओळखायचें असतें. परंतु ज्ञानप्रकाश हा आत्म्याचा स्वभाव आहे, आणि त्याला दुसऱ्या कोणच्याही ज्ञानाची जरूर लागत नाहीं. तेव्हां ( नवीन ) कळावयाचें असें कांहींच नाहीं. आत्म्याचें ज्ञान नेहमींच माझें कायम आहे.

नान्येन ज्योतिषा कार्यं रवेरात्मप्रकाशने ।
स्वबोधान्नान्यबोधेच्छा बोधस्यात्मप्रकाशने ॥ ४१ ॥

अर्थः—सूर्य दिसण्याला दुसऱ्या प्रकाशाची जशी गरज नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याचें ज्ञान होण्याला दुसऱ्या कशाच्या ज्ञानाची जरूर नाहीं.

न तस्यैवान्यतोऽपेक्षा स्वरूपं यस्य यद्भवेत् ।
प्रकाशान्तरदृश्यो न प्रकाशो ह्यस्ति कश्चन ॥ ४२ ॥

अर्थः—ज्याचें जें स्वाभाविक रूप आहे त्याला ( तें दाखविण्याला ) दुसरें कांहीं साधन लागत नाहीं. असा प्रकाश कोणचाहि नाहीं की तो दाखविण्याला दुसरा प्रकाश आणावा लागतो.

व्यक्तिः स्यादप्रकाशस्य प्रकाशात्मसमागमात् ।
प्रकाशस्त्वर्ककार्यः स्यात् इति मिथ्यावचो ह्यतः ॥४३॥

अर्थः—ज्याला स्वतःचा प्रकाश नाहीं तो दिसण्याकरितां प्रकाशरूप दुसरा कोणी आणावा लागतो. प्रकाश हें सूर्याचें कार्य आहे ( सूर्य करील तर प्रकाश, एरवीं नाहीं, ) हें बोलणें खोटें, ( कारण सूर्य असून तेथें प्रकाश नाहीं असें सांपडणारच नाहीं.

यतोऽभूत्वा भवेद्यच तस्य तत् कार्यमिष्यते।
स्वरूपत्वादभूत्वा न प्रकाशो जायते रवेः ॥ ४४ ॥

अर्थः—पूर्वीं एखादी वस्तु नसतांना मग ती झाली तर, ती ज्याच्यापासून झाली त्याचें ती कार्य म्हणतात, त्याप्रमाणें ( प्रकाश हा सूर्याचें कार्य नव्हे ) तो प्रकाश कधीं पूर्वीं सूर्यापाशीं नव्हता आणि मागाहून झाला असा असतच नाहीं, तो सदोदित असतो.

सत्तामात्रे प्रकाशस्य कर्तादित्यादिरिष्यते ।
घटादिव्यक्तितो यद्वत् तद्वद्बोधात्मनीष्यताम् ॥ ४५ ॥

अर्थः—प्रकाशाच्या जवळ असण्याच्या कारणानें घट दिसूं लागतो, त्यावरून प्रकाशाचा कर्ता सूर्य असें म्हणतात; त्याप्रमाणें आत्म्याच्या चैतन्यमात्रेंकरून बोध जर होतो, तर बोध करणारा आत्मा असें कां म्हणत नाहीं!

बिलात्सर्पस्य निर्याणे सूर्यो यद्वत्प्रकाशकः
प्रयत्नेन विना तद्वत् ज्ञातात्मा बोधरूपतः ॥ ४६ ॥

अर्थः—बिळांतून साप बाहेर आला, पण तो दाखविणारा सूर्यच कीं नाहीं? त्याप्रमाणेंच प्रयत्न न करतां ज्ञानस्वरूप आत्मा आमचा आम्हाला समजला असें म्हटलें तर?

दग्धैवमुष्णसत्तायां तद्वद्बोधात्मनीष्यताम् ।
सत्येव यद्रुपायो तु ज्ञाते सर्प इवोत्थिते ॥ ४७ ॥

अ.—( अग्नीचे ) उष्णतासामर्थ्यामुळें ( अग्नीकडे ) जसें

दहन करणारा हें नांव येतें, त्याप्रमाणें आत्म्याकडे जाणीव येते असे समजावें. ( ह्यावरून ) उपाधी असतांना ज्ञान होतें असें झालें. बिळांतून सर्प बाहेर आल्यावर ( सूर्य प्रकाश करतो व ) त्याचें ज्ञान होतें, ह्यावरून हें ज्ञान उपाधीचें झालें.

ज्ञाताऽयत्नोऽपि तद्वज्ज्ञः कर्ता भ्रामकवद्भवेत् ।
स्वरूपेण स्वयं नात्मा ज्ञेयोऽज्ञेयोऽथवा ततः ॥ ४८ ॥

अर्थः—ज्ञानस्वरूप आत्मा कांहीं यत्न न करतां जर जाणणारा झाला, तर तो लोहचुंबकासारखा होईल. वास्तविक स्वरूपानें पाहिलें तर आत्मा जाणण्याजोगा नाहीं, आणि न जाणण्याजोगाहि नाहीं.

विदिताविदिताभ्यां तत् अन्यदेवेति शासनात् ।
बंधमोक्षादयो भावाः तद्वदात्मनि कल्पिताः ॥ ४९ ॥

अर्थः—आत्मा हा कार्यकारणधर्माहून निराळा आहे असें ( केन उपनिषदांत ) सांगितलें आहे. ( हें जसें कर्तेपण, जाणीव आत्म्यावर कल्पिले ) त्याप्रमाणेंच बंध आणि मोक्ष हे धर्म सुद्धां काल्पनिकच आहेत.

नाहोरात्रे यथा सूर्ये प्रभारूपाविशेषतः ।
बोधरूपाविशेषान्न बोधाबोधौऽतथाऽत्मनि ॥ ५० ॥

अर्थः—सूर्याच्या ठिकाणीं प्रकाश नेहमींचा असल्यामुळें त्याच्या जवळ दिवस आणि रात्र हा प्रकार होतच नाहीं. त्याप्रमाणें आत्म्याचें ज्ञानस्वरूप सदोदित असल्यामुळें ज्ञान किंवा अज्ञान असे शब्दच होणें शक्य नाहीं.

यथोक्तं ब्रह्म यो वेद हानोपादानवर्जितम् ।
यथोक्तेन विधानेन स सत्यं नैव जायते ॥ ५१ ॥

अर्थः—मागें सांगितल्याप्रमाणें विचार करून वर दाखिव-

त्याप्रमाणें ब्रह्माचें ज्ञान जो कोणी करून घेईल आणि ध्यायचें टाकायचें ( कर्म करायचें ) या नादांत पडणार नाहीं, त्याला पुनः जन्म येणार नाहीं.

जन्ममृत्युप्रवाहेषु पतितो नैव शक्नुयात् ।
इत उद्धर्तुमात्मानं ज्ञानादन्येन केनचित् ॥५२॥

अर्थः—जन्ममृत्यूच्या परंपरेच्या ओघांत जो सांपडला त्याची सुटका ज्ञानाशिवाय दुसऱ्या उपायानें होणार नाहीं.

भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यंते सर्वसंशयाः ।
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे इतिश्रुतेः ॥५३॥

अर्थः—ह्याला आधार अथर्व वेदांतील वचन सांगतात—त्या आत्म्याचें ज्ञान झाल्यावर अंतःकरणांतील अभिमानाची गांठ सुटते आणि सर्व संशय दूर होतात, नंतर कर्म करण्याचें उरत नाहीं.

ममाहमित्येतदपोह्य सर्वतो । विमुक्तदेहं पदमंबरोपमम् ॥
सुदृष्टशास्त्रानुमितिभ्य ईरितं । विमुच्यतेऽस्मिन्यदि निश्चितो नरः ॥ ५४ ॥

अर्थः—मी ( अभिमान ) आणि मम ( ममता, प्रेम ) हीं सर्व पदार्थांवरून काढून टाकून शास्त्र आणि अनुमान ह्या दोन्ही प्रकारांनीं आम्हीं सिद्ध करून दाखविल्याप्रमाणें देहाचा संबंध नसेलल्या आकाशाप्रमाणें निःसंग आत्म्याचें ज्ञान ज्याला ठाम कळलें तो मोक्षाला जाईल.

---

## अथ पार्थिवप्रकरणं

### स्थूलशरीराविषयीं.

पार्थिवः कठिनो धातुः द्रवो देहे स्मृतोऽम्मयः ।
पक्तिचेष्टावकाशाः स्युः वन्हिवाय्वंबरोद्भवाः ॥ १ ॥

अर्थः—या स्थूल देहांत जो कठीण भाग ( हाडें मांस वगैरे ) तो पृथ्वीचा आहे, पातळ भाग तो अप् याचा आहे, त्याप्रमाणें पचन, गति आणि पोकळी हे भाग अनुक्रमें अग्नि, वायु आणि आकाश यांचे समजावे.

घ्राणादीनि तदर्थाश्च पृथिव्यादिगुणाः क्रमात् ।
रूपालोकवदिष्टं हि सजातीयार्थमिंद्रियम् ॥ २ ॥

अर्थः—नाक वगैरे इंद्रियें आणि ह्यांचे धर्म हे पृथ्वी वगैरे भूतांचे अनुक्रमानें घ्यावे. जो धर्म ज्या इंद्रियाला समजतो, त्याची जाति एक असें समजावें.

बुद्ध्यर्थान्याहुरेतानि वाक्पाण्यादीनि कर्मणे ।
तद्विकल्पार्थमन्तस्थं मन एकादशं भवेत् ॥ ३ ॥

अर्थः—हीं (घ्राण वगैरे ) ज्ञानेंद्रियें होत. वाक् वगैरे हीं कर्म करणारीं कर्मेंद्रियें झालीं. ह्या दहाहि इंद्रियांचें नियम करणारें एक इंद्रिय आंत आहे तें मन, हें अकरावें.

निश्चयार्था भवेद्बुद्धिः तां सर्वार्थानुभाविनीं ।
ज्ञातारमोक्तः स्वरूपेण ज्योतिषा व्यंजयन् सदा ॥४॥

अर्थः—पदार्थाचा निश्चय करणारी ती बुद्धि, ती सर्व प्रकारचे विषय पहाते, तिला आपल्या प्रकाशरूपी स्वरूपानें दाखविणारा, व जाणणारा जो त्याला आत्मा ह्मणतात-

व्यंजकस्तु यथा लोको व्यंग्यस्याकारतां गतः ।
व्यतिकीर्णोऽप्यसंकीर्णः तद्वज्ज्ञः प्रत्ययैः सदा ॥ ५ ॥

अर्थः—प्रकाश घटाला दाखवून त्याच्या आकारा येवढा होतो, तो त्याच्याशीं मिसळून राहतो असा वाटतो पण वास्तविक त्याच्याहून निराळा असतो, त्याप्रमाणें बुद्धीच्या वृत्ती दाखविणारा

आत्मा त्याच्याशीं ऐक्य पावल्यासारखा वाटतो, पण तो अगदीं निराळा असतो.

स्थितो दीपो यथाऽयत्नः प्राप्तं सर्वं प्रकाशयेत् ।
शब्दाद्याकारबुद्धीर्सः प्राप्तास्तद्वत् प्रपश्यति ॥ ६ ॥

अर्थः—एके ठिकाणीं लावलेला दिवा कांहीं खटपट न करतां तेथें येतील त्या वस्तू दाखवितो, त्याप्रमाणें शब्द वगैरे विषयाच्या आकाराची झालेली बुद्धि पहाणारा साक्षी, जी जी वृत्ति उठेल ती ती जाणतो.

शरीरेंद्रियसंघाते आत्मत्वेन गतां धियं ।
नित्यात्मज्योतिषा दीप्तां विशिषंति सुखादयः ॥ ७ ॥

अर्थः—देहादिक इंद्रियांच्या समुदायाच्या ठिकाणीं तदात्म्य पावलेल्या, आणि सदा ज्ञानस्वरूपानें प्रकाशित झालेल्या बुद्धिला सुख वगैरे विकार, विकार करितात.

शिरोदुःखादिनात्मानं दुःख्यस्मीति हि पश्यति ।
द्रष्टाऽन्यो दुःखिनो दृश्यात् द्रष्टत्वाच्च न दुःख्यसौ ॥ ८ ॥

अर्थः—डोकें वगैरे दुखूं लागलें तर मला दुःख होतें असें ह्मणतो हें तादात्म्यामुळें. दुःख होत असलेल्या बुद्धीला पहाणारा निराळा आहे, आणि जो पहाणारा तो दुःखी होणार नाहीं.

दुःखी स्यात् दुःखष्यहंमानात् दुःखिनो दर्शनान्न वा ।
संहतेऽज्ञादिभिर्द्रष्टा दुःखी दुःखस्य नैव सः ॥ ९ ॥

अर्थः—दुसऱ्याला दुःखी पाहून आपण दुःखी होत नाहीं, पण मला दुःख होतें असें तादात्म्य झाल्यास दुःख होतें. सर्व इंद्रियांच्या समुदायाच्या ( ह्म० देहाच्या ) ठिकाणीं झालेलें दुःख पाहणारा तो दुःखाचा साक्षी होईल, त्याचा अनुभव तो घेणार नाहीं.

चक्षुर्वत् कर्मकर्तृत्वं स्याच्चेन्नानेकमेव तत् ।
संहतंच ततो नात्मा द्रष्टृत्वात् कर्मतां व्रजेत् ॥१० ॥

अर्थः–डोळा जसा आरशामध्यें आपण आपल्याला पहातो आणि तो एकच पहाण्याची वस्तु ( कर्म ) आणि पहाणारा ( कर्ता ) होतो त्याप्रमाणें आत्माच कर्म आणि कर्ता कां होणार नाहीं? उत्तर, तसें होत नाहीं. आरशांतला डोळा आणि खरा डोळा असें त्याला एकाच डोळ्याला अनेकत्व घेतां येतें, शिवाय डोळा वगैरे अवयव यांचा सर्व संघात एक आहे, ( तसें आत्म्याच्या ठिकाणीं अंशभेद ह्मणजे अनेकत्व नाहीं ) ह्मणून तो द्रष्टा ( पहाणारा ) जरी झाला तरी कर्म ( पहाण्याची वस्तु ) आपणच होत नाहीं.

ज्ञानयत्नाद्यनेकत्वं आत्मनोऽपि मतं यदि ।
नैकज्ञानगुणत्वात्तु ज्योतिर्वत्तस्य कर्मता ॥ ११ ॥

अर्थः–ज्ञान मिळविण्याकरितां अनेक गोष्टी कराव्या लागतात. त्यावरून आत्मा ( एकच नाहीं ) अनेक आहे असें तुझें मत असेल तर तें बरोबर नाहीं. आत्मा हा केवळ एक, ज्ञानावांचून दुसरें कांहीं नाहीं, त्यामुळें तेजाप्रमाणें त्याला पहाण्याची वस्तु ( कर्मता ) होतां येत नाहीं.

ज्योतिषो द्योतकत्वेऽपि यद्वन्नात्मप्रकाशनम् ।
भेदेप्येवं समत्वाज्ज्ञः आत्मानं नैव पश्यति ॥ १२ ॥

अर्थः—तेज किंवा सूर्यप्रकाश दुसऱ्या वस्तु दाखवितो, पण तो आपल्यालाच प्रकाशक होत नाहीं. त्याप्रमाणें आत्म्याचे अंशभेद धरले तरी सगळ्या ठिकाणीं त्याचें चैतन्यस्वरूप एकच असल्यामुळें तो आपल्याला आपण पहात नाहीं.

यद्धर्मा यः पदार्थो न तस्यैवेयात् स कर्मताम् ।
न ह्यात्मानं दहत्यग्निः तथा नैव प्रकाशयेत् ॥ १३ ॥

अर्थः—ज्या पदार्थाचा जो धर्म असेल त्या धर्माचें कर्म तो होतो ( त्याचा परिणाम त्याच्यावर घडतो ) असें होत नाहीं. अग्नीचा धर्म जाळणें, प्रकाश देणें, पण अग्नि आपण आपल्याला जाळतो किंवा प्रकाश देतो असें होत नाहीं.

एते नैवात्मनात्मानो ग्रहो बुद्धेर्निराकृतः ।
अंशोप्येवं समत्वाद्धि निर्भेदान्न प्रयुज्यते ॥ १४ ॥

अर्थः—बुद्धीच्या योगानें आत्म्याचें ज्ञान होतें हा पक्ष वरच्या दृष्टांतानें खोटा ठरतो. आत्म्याचा एक अंश दुसऱ्याला पहातो म्हटलें तर तेंहि बरोबर नाहीं, कारण आत्मा सर्वत्र सारखा आहे, त्याच्यांत भेदभाव मुळींच नाहीं.

शून्यतापि न युक्तेवं बुद्धेरन्येन दृश्यता ।
युक्तातो घटवत्तस्याः प्राक्सिद्धेश्च विकल्पिता ॥ १५॥

अर्थः—बुद्धीला पहाणाराच कोणी नाहीं असें धरलें तरी तें बरोबर नाहीं. कारण बुद्धीला पहाणारा, घट पहाणाऱ्याप्रमाणें दुसरा कोणी तरी आहे. शिवाय बुद्धीच्या उत्पत्तिपूर्वी तो पहाणाराच ना?

अविकल्पं तदस्त्येव यत् पूर्वं स्याद्विकल्पतः ।
विकल्पोत्पत्तिहेतुत्वात् यद्यस्यैव तु कारणम् ॥ १६ ॥

अर्थः—बुद्धीची उत्पत्ति होण्यापूर्वी तो विकल्परहित आत्मा होता तर मग बुद्धीच्या विकल्पाला हेतु झाल्यामुळें त्या बुद्धिरूप कार्याचें आत्मा हें कारण होईल.

अज्ञानं कल्पनामूलं संसारस्य नियामकम् ।
हित्वात्मानं परं ब्रह्म विद्यान्मुक्तं सदाभयम् ॥ १७ ॥

अर्थः—सर्व कल्पनेला कारण संसार उत्पन्न करणारें एक अज्ञान आहे. तें टाकून देऊन सर्वांत श्रेष्ठ, सदा मुक्त आणि निर्भय जें ब्रह्म तें ओळखावें.

जाग्रत्स्वप्नौ तयोर्बीजं सुषुप्ताख्यं तमोमयम् ।
अन्योन्यस्मिन्नसत्वाच्च नास्तीत्येतत्त्रयं त्यजेत् ॥ १८ ॥

अर्थः—जागृती आणि स्वप्न ( ह्मणजे स्थूल आणि सूक्ष्म देह ) यांचें कारण सुषुप्तिमध्यें ( कारणदेहांत ) असणारें अज्ञान तेंच होय. पण ह्या तिन्ही अवस्था एकमेकींच्या बरोबर नसतात ह्मणजे एक असतांना दुसऱ्या दोन्ही नसतात, ह्याकरितां त्या नाशवंत आहेत असें समजून त्या तिहींचाहि त्याग करावा.

आत्मबुद्धिमनश्चक्षुरालोकार्थादिसंकरात् ।
भ्रांतिः स्यादात्मकर्मेति क्रियाणां सन्निपाततः ॥ १९ ॥

अर्थः—देह, बुद्धि, मन, डोळे, प्रकाश, पदार्थ ( देश, काल ) वगैरे हीं सर्व मिश्रण झाल्यामुळें व अनेक क्रिया एकाच वेळीं झाल्यामुळें आत्मा ह्याहि क्रिया करतो असा भ्रम उत्पन्न होतो.

निमीलोन्मीलने स्थाने वायव्ये ते न चक्षुषः ।
प्रकाशत्वान्मनस्येवं बुद्धौ न स्तः प्रकाशतः ॥ २० ॥

अर्थः—डोळ्याच्या पापण्या हलूं लागतात त्या वातामुळें हलतात, पण त्यावेळीं डोळे किंवा पापण्या हलतात असें आपण ह्मणतों. त्याप्रमाणेंच मन किंवा बुद्धि यांच्या ठिकाणीं चलनवलन नाहीं, तें कार्य प्राणाचें आहे, तरी त्याचा अध्यास होऊन चंचल मन आणि स्थिर बुद्धि असा आरोप करितात.

संकल्पाध्यवसायौ तु मनोबुध्द्योर्यथाक्रमात् ।
नेतरेतरधर्मत्वं सर्व चात्मनि कल्पितम् ॥ २१ ॥

अर्थः—मन संकल्प करतें आणि बुद्धि निश्चय करते, ते एकमेकांचे धर्म उलट एकमेकांकडे ( याचे त्याला ) लावीत नाहीं ( हें खरें ); पण आत्म्याच्या ठिकाणीं हें कांहींच नाहीं. सर्वच अध्यासानें आरोप केलेलें असतें.

स्थानावच्छेददृष्टिः स्यात् इंद्रियाणां तदात्मताम् ।
गताधीस्तां हि पश्यन् ज्ञो देहमात्र इवेक्ष्यते ॥ २२ ॥

अर्थः—अमूक एक स्थान अमूक इंद्रियानें अशी विल्हेवाट लावून इंद्रियाचें देहाशीं तादात्म्य केलें, पुढें त्यांच्या द्वारानें विषयाशीं संयोग पावणारी बुद्धि त्या विषयाशीं तादात्म्य पावली, पुढें तिला पहाणारा आत्मा हा निराळा असून बुद्धिमध्यें बिंबित झाल्या कारणानें ( अपारीच्छिन्न असलेला ) देहायेवढा ( पारीच्छिन्न ) वाटूं लागला.

क्षणिकं हि तदत्यर्थं धर्ममात्रं निरंतरं ।
सादृश्याद्दीपवत्तद्धीः तच्छांतिः पुरुषार्थता ॥ २३ ॥

अर्थः—तें ( ज्ञान ) अतिशय थोडा वेळ टिकणारें असतें, त्या त्या धर्मांच्या पुरतें असतें ( अधिष्ठानाचें नसतें ) पण तें एकसारखें उत्पन्न होत असतें. दिवा जळतो ( तो दर क्षणाला नवीन तेल वगैरे जाळतो ) त्याप्रमाणें तें एकसारखें असल्यामुळें ( चूक न होतां ) त्याची ओळख पटते. असल्या प्रकारच्या भलत्या समजुतीचा निरास करणें हाच पुरुषार्थ आहे, तोच तर केला पाहिजे.

स्वाकारान्यावभासं च येषां रूपादि विद्यते ।
येषां नास्तिमनश्चान्यत् पूर्वोसंगतिरुच्यते ॥ २४ ॥

अर्थः—ज्यांच्या मतानें आकाराची जाणीव होण्याला दुसरें ज्ञान असावें लागतें, आणि रूप वगैरे असे दुसरे पदार्थ आहेत असें जे ( बौद्ध ) ह्मणतात, आणि ज्यांच्या मतानें त्याच्या अवभासाशिवाय दुसरें कांहीं ( खरें मुळाशीं ) नाहीं, त्यांच्या बोलण्यांत मागच्या आणि पुढच्या बोलण्याला कांहीं मेळ नाहीं.

बाह्याकारत्वतो ज्ञप्तेः स्मृत्यभावः सदाक्षणात् ।
क्षणिकत्वाच संस्कारं नैवाधत्ते कचित्तु धीः ॥ २५ ॥

अर्थः—शिवाय, त्यांच्या ज्ञानाला बाह्य आकार धरावा लागेल, आणि दर क्षणाला बदलल्यामुळें त्याचें स्मरण ठेवण्याचें कारणच नाहीं, त्यामुळें बुद्धीवरहि कांहीं संस्कार घडणार नाहीं.

आधारस्याप्यसत्वाच तुल्यता निर्निमित्ततः ।
स्थाने वा क्षणिकत्वस्य हानं स्यान्न तदिष्यते ॥ २६ ॥

अर्थः—शिवाय, त्यांत संस्कार अमक्यावर पडतो ह्मणायला आधार काय धरणार ? दोन्ही क्षणांचें ज्ञान सारखेंच असतें असें गृहीत धरावें लागणार, तेंहि विनाकारण ? बरें मागच्या आणि पुढच्या क्षणाचा पहाणारा कोणी कायम आहे ह्मणशील तर त्या योगानें तुझें क्षणिकत्वाचें मत सुटेल आणि तें तर तुला सोडायचें नाहीं ?

शांतिश्चायत्नसिद्धत्वात् साधनोक्तिरनर्थिका ।
एकस्मिन् समाप्तत्वात् शक्तिर्न्यानपेक्षता ॥ २७ ॥

अर्थः—मग त्यामुळें शांति मिळवायला प्रयत्न करायला नको, व त्यामुळें ती मिळविण्याची साधनें सांगण्याचें कारण नाहीं. प्रत्येक

क्षणाला जर एक एक ज्ञान समाप्त होणार, तर मग शांति मिळ-वायला दुसऱ्या साधनाची जरूर कोठें उरली ?

अपेक्षा यदि भिन्नोऽपि परसंतान इष्यताम् ।
सर्वार्थे क्षणिके कस्मिन् तथाप्यन्यानपेक्षता ॥ २८ ॥

अर्थः—दर क्षणीं भिन्नज्ञान असून तशीच (साधनाची) जरूर आहे, असें ह्मणाल तर कार्यकारणसंबंध नकोच, वाटेल त्या कार्याचें वाटेल तें कारण धरावें. सर्व पदार्थ जर क्षणिक आहेत, तर दुसऱ्याची जरूर कोणच्या पदार्थाला भासणार ?

तुल्यकालसमुद्भूतौ इतरेतरयोगिनौ ।
योगाश्च संस्कृतो यस्तु सोऽन्यं दीक्षितुमर्हति ॥ २९ ॥

अर्थः—आतां एकाच काळीं उत्पन्न झालेले पण एकाच्यायोगानें दुसरा झालेला आहे असे पदार्थ घेतले (उदाहरणार्थ पाऊस आणि गवत) तर पाउसानें गवताला उत्पन्न केलें म्हणून गवताला पाउसाची जरूर आहे असें होत नाहीं का ?

मृषाभ्यासस्तु यत्र स्यात् तन्नाशः तत्र नो मतः ।
सर्वनाशो भवेद्यस्य मोक्षः कस्य फलं वद ॥ ३० ॥

अर्थः—आमच्या मताप्रमाणें ज्या वस्तूचा दुसऱ्यावर खोटा अभ्यास झाला, त्या वस्तूचा त्याच आधाराचे ठिकाणीं नाश हो-णार. त्या अभ्यासाबरोबर आधाराचाहि नाश होतो असें तुम्ही स-मजत्रात तर मोक्ष हें फल कोणाकरतां आहे ?

अस्ति तावत् स्वयंनाम ज्ञानं वात्मान्यदेव वा ।
भारामावगतस्तस्य नाभायस्त्वपि——॥ ३१ ॥

अर्थ.—कांहीं तरी निश्चित रहातें, म

माणखी दुसरें कांहीं ह्मणा. ( लोकव्यवहारांत ) त्याचें अस्तित्व आणि नाश समजतात, तेव्हां नुसता अभाव धरून जमणार नाहीं.

येनाधिगम्यते भावः तत् सत् स्यात्तन्न चेद्भवेत् ।
भावाभावानभिज्ञत्वं लोकस्य स्यान्न चेष्यते ॥ ३२ ॥

अर्थः—ज्याच्या योगानें अभाव समजतो तें सत्य असलें पाहिजे. तें तसें नसेल तर मग लोकांना अस्तित्व आणि अभाव यांचा अनुभव येणार नाही. तो न आला तर चालेल असें ह्मणून भागत नाहीं.

सदसत्सदसच्चेति विकल्पात् प्राक् यदिष्यते ।
तदद्वैतं समत्वात्तु नित्यं चान्यद्विकल्पितात् ॥ ३३ ॥

अर्थः—सत् ( साक्षी आत्मा ) आणि असत् ( जग ) हीं दोन्ही तुझ्या तंट्यापूर्वीच खरी आणि खोटी अनुक्रमें होतीं. त्यापैकीं जें ध्यायला पाहिजे तें अद्वैत, तें नेहमीं सारखेंच राहिल्यामुळें नित्य, आणि दुसरें विकार पावतें ह्मणून अनित्य ( नाशवंत ) समजावें.

विकल्पोऽद्भवतो सत्त्वं स्वप्नदृश्यवदिष्यताम् ।
द्वैतस्य प्रागसत्त्वाच्च सदसत्त्वादिकल्पनात् ॥ ३४ ॥

अर्थः—स्वप्नांत दिसलेलें जसें सगळें खोटें त्याप्रमाणेंच विकल्पामुळें दिसलेलें सर्व असत्य. सत्य आणि असत्य अशी कल्पना होण्यापूर्वी द्वैत मुळींच नव्हतें, त्यावरून तें खोटें.

वाचारंभणशास्त्राच्च विकाराणां ह्यभावता ।
मृत्योःस मृत्युमित्यादेः मम मायेतिच स्मृतेः ॥ ३५ ॥

अर्थः—विकार खोटे असें छांदोग्य ( ६–१–४ ) उपनिषदांत सांगितलें आहे. तो मृत्यु परंपरेंत सांपडतो असें बृहदारण्यांत आहे आणि माझी माया खोटी वगैरे ( गीतेसारख्या ) स्मृतींत सांगितलें आहे.

विशुद्धिश्चात एवास्य विकल्पाच्च विलक्षणः ।
उपादेयो न हेयोऽतः आत्मा नान्यैरकल्पितः ॥ ३६॥

अर्थः—आत्मा अत्यंत निर्मळ असल्यामुळें तो ह्या कल्पनारूप मायेपासून निराळा आहे, त्यामुळें तो घ्यायला किंवा टाकायला येत नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि साधनांनीं आत्म्याची कल्पना होणार नाहीं.

अप्रकाशो यथादित्ये नास्ति ज्योतिःस्वभावतः ।
नित्यबोधस्वरूपत्वात् नाज्ञानं तद्वदात्मनि ॥ ३७ ॥

अर्थः—सूर्याच्या ठिकाणीं वास्तविक पाहतां अंधकार आणि प्रकाश असा भेदच नाहीं, त्याप्रमाणें सदोदित जाणीवस्वरूपीं आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञान नसतें.

तथाऽविक्रियरूपत्वात् नावस्थांतरमात्मनः ।
अवस्थांतरवत्त्वे हि नाशोऽस्य स्यान्न संशयः ॥ ३८ ॥

अर्थः—आत्म्याचें स्वरूप विकाररहित असल्यामुळें त्याची स्थिति बदलत नाहीं. ती बदललीं तर त्याचा नाश होणार हें खास.

मोक्षोऽवस्थांतरं यस्य कृतकः स चलो ध्रुवः ।
न संयोगो वियोगो वा मोक्षो युक्तः कथंचन ॥ ३९ ॥

अर्थः—एका अवस्थेचा पालट होऊन दुसरी अवस्था म्हणजे मोक्ष मिळतो असें म्हटल्यास तो मोक्ष कृतिसाध्य झाला. मग तो नाशवंत होईल. ह्यासाठीं मोक्ष म्हणजे कशाचा कशाशीं संयोग किंवा वियोग आहे असें नाहीं.

संयोगस्यानित्यत्वात् वियोगस्य तथैवच ।
गमनागमने चैव स्वरूपं न तु हीयते ॥ ४० ॥

अर्थः—संयोग धरला किंवा वियोग धरला तर मोक्षाकडे अनि-

त्यपणा येईल. मोक्षाकरतां कोठल्या देशांत जावें यावें लागतें म्हटलें तरी नाश आलाच. तेव्हां मोक्षाचें स्वरूप बदलत नाहीं ( तो कायमचाच आहे. )

स्वरूपस्यानिमित्तत्वात् सनिमित्ता हि चापरे ।
अनुपाद्यं स्वरूपं हि स्वेनात्यक्तं तथैव च ॥ ४१ ॥

अर्थः—ब्रह्मस्वरूपाला कांहीं निमित्त नाहीं, इतर सर्व अवस्था वगैरे यांना निमित्त कारण असतें. स्वरूप कोणी ( नवीन ) आणलें आहे, किंवा टाकलें आहे असें कांहींच होत नाहीं.

स्वरूपत्वाच्च सर्वस्य त्यक्तुं शक्यो ह्यनन्यतः ।
गृहीतुं वा ततो नित्योऽविषयत्वात् पृथक्त्वतः ॥४२॥

अर्थः—स्वरूप ( ब्रह्म ) सर्व ठिकाणीं असल्यामुळें त्याचा भेद करून तें टाकायला येत नाहीं, तें कशाचा विषय होत नाहीं किंवा निराळें दाखवितां येत नाहीं, त्यामुळें त्याचें ग्रहणहि होत नाहीं.

आत्मार्थत्वाच्च सर्वस्य नित्य आत्मैव केवलः ।
त्यजेत्तस्मात्क्रियाः सर्वाः साधनैः सह मोक्षवित् ॥४३

अर्थः—सर्व वस्तुमात्राच्या ठिकाणीं आत्मस्वरूपानें ( अधिष्ठानरूपानें ) ब्रह्म असल्यामुळें निरुपाधिक ब्रह्माशिवाय दुसरें कांहीं नाहीं. यासाठीं मोक्ष जाणल्यानंतर साधनासुद्धां सर्व क्रियांचा त्याग करावा.

आत्मलाभः परो लाभः इति शास्त्रोपपत्तयः ।
अलाभोऽन्यात्मलाभस्तु त्यजेत्तस्मादनात्मताम् ॥४४॥

अर्थः—आत्मज्ञानासारखा दुसरा लाभ नाहीं असें अनेक शास्त्रांत सांगितलें आहे. देहादिकाचा अभिमान धरल्यानें जो कांहीं

झालास। वाटत असेल तो लाभ नव्हे, याकरितां देहाशीं ऐक्य मा-
नण्याचा अभिमान सोडून द्यावा.

गुणानां समभावस्य भ्रंशो न ह्युपपद्यते ।
अविद्यादेः प्रसुप्तत्वात् न चान्यो हेतुरुच्यते ॥ ४५ ॥

अर्थः—ज्या ( ब्रह्म ) ची स्थिति सर्वदा सारखी असणार त्या-
च्या ठिकाणीं त्रिगुणाच्या योगानें स्वरूपभ्रष्टता आली हें ह्मणणेंच
शोभत नाहीं. त्या ठिकाणीं अज्ञान जर मुळींच जाग्यावर नसतें तर
( भ्रष्टतेला ) दुसरें कारण काय देणार?

इतरेतरहेतुत्वे प्रवृत्तिः स्यात् सदा न वा ।
नियमो न प्रवृत्तीनां गुणेष्वात्मनि वा भवेत् ॥ ४६ ॥

अर्थः—ते ( गुण ) एकमेकांला कारण होतात ह्मटलें तर वि-
कारांची प्रवृत्ति सदा व्हायला नको काय? गुणांच्या ठिकाणीं किंवा
आत्म्यामध्यें विकारांची प्रवृत्ति सदोदित असते असा ( अ-
बाधित ) नियम आढळत नाहीं.

विशेषो मुक्तबद्धानां तादर्थं नच युज्यते ।
अर्थार्थिनोस्त्वसंबंधो नार्थी ज्ञो नेतरोऽपि वा ॥४७॥

अर्थः—सांख्य मताप्रमाणें प्रधान कारण धरलें तर तें
सर्वत्र असल्यानें बद्ध आणि मुक्त असा भेद करतां येणार नाहीं.
त्याप्रमाणें एक उपकार करणारा, दुसरा उपकार करून घेणारा हा-
हि त्यांचा संबंध रहात नाहीं. ज्ञानस्वरूप आत्म्याला कांहीं मागा-
यचें असत नाहीं, दुसऱ्याला ( प्रधान जडाला ) त्याचा कांहीं
उपयोग नाहीं.

प्रधानस्यच पारार्थ्यं पुरुषस्याविकारतः ।
न युक्तं सांख्यशास्त्रेऽपि विकारोऽपि न युज्यते ॥४८॥

अर्थः—पुरुषाच्या ठिकाणीं जर विकारच होत नाहीं तर मग त्या प्रधानानें काय करायचें राहिलें ? तेव्हां सांख्यमतवाद्याप्रमाणें सुद्धां अव्यवस्था दिसूं लागते—आत्मा विकारी म्हटला तर तो नाशवंत होणार आणि मग प्रधान आणि पुरुष ही जोडी नेहमीं कशी रहाणार?

संबंधानुपपत्तेश्च प्रकृतेः पुरुषस्यच ।
मिथोऽयुक्तं तदर्थत्वं प्रधानस्याचितित्वतः ॥ ४९ ॥

अर्थः—पुरुष आणि प्रकृति यांचा संबंधच संभवत नाहीं. प्रकृति जड असल्यामुळें ती पुरुषाच्या उपयोगीं पडते असें होणें युक्तीलाच जुळत नाही.

क्रियोत्पत्तौ विनाशित्वं ज्ञानमात्रे च पूर्ववत् ।
निर्निमित्ते त्वनिर्मोक्षः प्रधानस्य प्रसज्यते ॥ ५० ॥

अर्थः—पुरुषाच्या ठिकाणीं कांहीं क्रिया घडते असें धरलें तर तो नाशवंत होईल, ज्ञानसुद्धां होतें म्हटलें की तोच प्रकार होणार. आतां प्रकृतीचा व्यापार कांहीं निमित्ताशिवाय होतो असें धरलें तर मोक्ष मुळीच नाहीं असें म्हणण्याचा प्रसंग येईल.

न प्रकाशयं यथोष्णत्वं ज्ञानेनैवं सुखादयः ।
एकनीडत्वतो ग्राह्याः स्युः कणादादिवर्त्मनाम् ॥५१॥

अर्थः—कणाद वगैरे यांचें मत आहे की विषयी आत्मा आणि विषय हे एकच ठिकाणीं असून आत्मा त्या विषयांचा उपभोग घेतो, तें बरोबर नाहीं. अग्नीच्या ठिकाणची उष्णता ही त्याच्याच अंगच्या प्रकाशानें प्रगट होते म्हटलें तर तें जसें बरोबर नाहीं, त्याप्रमाणेंच सुख वगैरे ज्ञानाच्या योगानें उपभोगाला येतात हें म्हणणें चुकीचें आहे.

युगपत्समवेतत्वं सुखविज्ञानयोरपि ।
मनोयोगैकहेतुत्वात् ग्राह्यत्वं सुखस्यच ॥ ५२ ॥

अर्थः—सुख आणि ज्ञान दोन्ही बरोबरच होतात म्हटलें तर सुख मुळींच उपभोगावयास मिळणार नाहीं कारण त्या दोहोंचा संबंध घडवून देणारें जें मन तें असावें लागतें, तें ह्या ठिकाणीं नसल्यावर सुख मिळणार कसें ?

तथाऽन्येषां चाभिन्नत्वात् युगपज्जन्म नेष्यते ।
गुणानां समवेतत्वं ज्ञानं चेन्न विशेषणात् ॥ ५३ ॥

अर्थ—त्याप्रमाणेंच गुणधर्म सर्व एकमेकापासून भिन्न आहेत, तेव्हां ते सगळे एकदम होतात म्हटलें तर जमत नाहीं आता गुण आणि ज्ञान हीं दोन्ही बरोबरच असतात असें धरलें तर तें बरोबर नाहीं, कारण तसा फरक ( बरोबर नसणें ) प्रत्यक्ष अनुभवास येतो

ज्ञानेनैव विशेष्यत्वात् ज्ञानाप्यत्वं स्मृतेस्तथा
सुखं ज्ञातं मयेत्येवं तवाज्ञानात्मकत्वत ॥ ५४ ॥

अर्थः—त्या वेळीं झालेल्या संस्काराच्या स्मरणाचें झालेलें सुख ज्ञानाच्या योगानें समजतें कारण तें ज्ञानाचा विषय होतें आणि मला सुख समजलें अशी आठवण रहाते, पण तुमच्या मतानें ज्ञान हें आत्म्यापासून निराळें असतें, तेव्हा तें सर्व जड असल्यामुळें सुख होणें संभवत नाहीं

सुखादेर्नात्मधर्मत्वं आत्मनस्तेऽविकारत ।
भेदादन्यस्य कस्मान्न मनसो वाऽविशेषत ॥ ५५ ॥

अर्थ—तुमच्या मतानें आत्म्याला विकार नाहीं, तो सर्वत्र भर लेला आहे, मग सुख वगैरे धर्म आत्म्याच्या ठिकाणीं कसे समजता येतील आत्म्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि, मनाला सुद्धा सुख वगैरे गुण लागणार नाहींत, कारण एका देहांत आत्मा असून त्याला सर्व ठिकाणचें सुख समजतें असें धरावें लागेल

स्यान्मालाऽपरिहार्या तु ज्ञानं चेज्ज्ञेयतां व्रजेत् ।
युगपद्वापि चोत्पत्तिः अभ्युपेताऽत्र इष्यते ॥ ५६ ॥

अर्थः-एक ज्ञान दुसऱ्या ज्ञानानें समजतें असें धरलें तर त्याला जाणणारें तिसरें ज्ञान, त्याला चौथें ह्याप्रमाणें माळच लागेल. यावर दोन्ही ज्ञानें एकदमच होतात असें धरशील तर त्यापासून सुद्धां एकदम शब्दस्पर्श वगैरे ज्ञान होतें असें ठरवायला लागेल.

अवस्थांतरत्वाच्च बंधो नात्मनि विद्यते ।
नाशुद्धिश्चाप्यसंगत्वात् असंगो हीति च श्रुतेः ॥ ५७॥

अर्थः—( आत्म्याला ) दुसरी अवस्था ( कूटस्थाशिवाय ) येत नसल्यामुळें विशेष गुण इत्यादि प्रकारांनीं त्याला बंध येत नाहीं. दुसऱ्याच्या संसर्गानें ( बंधरूपी ) दोष येईल म्हणावा तर आत्मा असंग आहे अशीं श्रुतिवचनें आहेत.

सूक्ष्मैकागोचरेभ्यश्च न लिप्यते इति श्रुतेः ।
एवं तर्हि न मोक्षोस्ति बंधाभावात्कथंचन ॥ ५८ ॥

अर्थः-( मन आणि वाणीला न समजण्याइतका ) सूक्ष्म आत्मा आहे, तो एक, आणि तो कशालाहि विषय होत नाहीं म्हणून त्याला कशाचा लेप नाहीं. असें कठ [ ५-११ ] उपनिषदांत म्हटलें आहे. तेव्हां मुळींच जर आत्म्याला बंध नाहीं तर मोक्ष तरी कल्पना पाहिजे कशाला ?

शास्त्रानर्थक्यमेव स्यात् न बुद्धेर्भ्रांतिरिष्यते ।
बंधो मोक्षश्च तन्नाशः स यथोक्तो न चान्यथा ॥ ५९॥

अर्थः—मग शास्त्राची येवढी जरूर काय ? तसें नाहीं बुद्धिच्या ठिकाणीं अज्ञानानें भ्रांति होते, तोच बंध; त्याची सुटका म्हणजे त्या भ्रांतीचा नाश, तो कसा हें मागें सांगितलेंच आहे.

बोधात्मज्योतिषा दीप्ता बोधमात्मनि मन्यते ।
बुद्धिर्नान्योऽस्ति बोद्धेति सेयं भ्रांतिर्हि धीगता॥६०॥

अर्थः–जाणीवरूपी आत्म्याच्या प्रकाशानें प्रतिबिंबित झालेल्या बुद्धीला आपल्या ठिकाणी चैतन्य आलेंसें वाटतें. मला दुसरा कोणी प्रकाश देणारा नाहीं असें तिला वाटून मग मी बद्ध आहें असें जें ज्ञान तेथें उत्पन्न होतें तीच भ्रांति.

बोधस्यात्मस्वरूपत्वात् नित्यं तत्रोपचर्यते ।
अविवेकोऽप्यनाद्योऽयं संसारो नान्य इष्यते ॥ ६१ ॥

अर्थः–जाणीव हें आत्म्याचें नित्य स्वरूप असल्यामुळें ती तेथें ( असूनहि ) ( नयी ) उत्पन्न झाली असें वाटतें. तेव्हां हा अनादि ( केव्हांपासून झाला न समजणारा ) संसार हा अविवेकानें ( विचार न केल्यानें ) झाला आहे असेंच ठरतें.

मोक्षस्तन्नाश एव स्यात् नान्यथाऽनुपपत्तितः ।
येषां वस्त्वंतरापत्तिः मोक्षो नाशस्तु तैर्मतः ॥ ६२ ॥

अर्थः–त्या अविचाराला घालविणें ह्मणजेच मोक्ष असें ह्मणणेंच बरोबर ठरतें. मोक्ष ह्मणजे दुसरी कांहीं वस्तु मिळविणें असें ज्यांचें मत असेल ते मोक्ष नाशिवंत समजतात असें होईल.

अवस्थांतरमप्येवं अविकारान्न युज्यते ।
विकारोऽवयवित्वं स्यात् ततो नाशो घटादिवत्॥६३॥

अर्थः–मोक्ष ह्मणजे दुसरा कांहीं अवस्थेचा पालट असें जे ह्मणतील, त्यांचाहि मोक्ष तसलाच नाशवंत होईल. आत्मा विकाररहित असल्यामुळें हें बोलणें जुळत नाहीं. विकार आहे ह्मटलें की त्या वस्तूला अवयव आले आणि ज्याला अवयव आले त्याला नाश आलाच.

तस्मात्भ्रांतिरतोऽन्याहि बंधमोक्षादिकल्पनाः ।
सांख्यकाणादबौद्धानां मीमांसाहतकल्पनाः ॥ ६४ ॥

अर्थः—तेव्हां बंधमोक्ष वगैरे ज्या दुसऱ्या कल्पना आहेत त्या सर्व चुकीच्या आहेत. सांख्य, काणाद, बौद्ध वगैरे सर्वांची मतें विचाराला न जुळणारी अशीं आहेत.

शास्त्रयुक्तिविहीनत्वात् नादर्तव्याः कदाचन ।
शक्यन्ते शतशो वक्तुं दोषास्तासां सहस्रशः ॥ ६५ ॥

अर्थः—त्यांचे विचार शास्त्राला आणि युक्तीला जुळत नाहींत म्हणून त्यांना मुळींच मान देऊं नये. त्यांच्या बोलण्यांत शेंकडो हजारों चुक्या दाखवितां येतील.

अपि निंदोपपत्तेश्च यान्यतोऽन्यानि चेत्यतः ।
त्यक्त्वानो ह्यन्यशास्त्रोक्तीः मतिं कुर्यात् दृढां बुधः॥ ६६॥

अर्थः—जीं कांहीं याशिवाय दुसरीं शास्त्रें आहेत त्यांची निंदा केली असल्यामुळें अन्यशास्त्रांतील वचनें सोडून दिली पाहिजेत आणि शहाण्या माणसानें आपली बुद्धि दृढ केली पाहिजे. ( पक्का निश्चय करावा. )

श्रद्धाभक्ती पुरस्कृत्य हित्वा सर्वमनार्जवम् ।
वेदांतस्यैव तत्त्वार्थे व्यासस्याभिमतौ तथा ॥ ६७ ॥

अर्थः—वेदाच्या शेवटीं सांगितलेल्या उपनिषदावर आणि व्यासांच्या ग्रंथावर दृढविश्वास ठेवावा, परमेश्वराची भक्ति करावी आणि मनाचा वाकडेपणा ( विकल्प ) सोडून द्यावा.

इतिप्रणुन्नाद्वयवादकल्पनाः । निरात्मवादाश्च तथाहि युक्तितः ॥ व्यपेतशङ्काः परिवादतः स्थिराः ॥ मुमुक्षवो ज्ञानपदे स्युरित्युत ॥ ६८ ॥

अर्थः--ह्याप्रमाणें युक्तीच्या साहाय्यानें द्वैतकल्पना आणि आत्मा नाहीं असें म्हणणाऱ्यांचीं मतें खोडून काढलीं. आतां शंका सोडून देऊन वाद करण्यापासून शांत व्हावें म्हणजे मुमुक्षूला ज्ञान कायमचें मिळेल.

स्वसाक्षिकं ज्ञानमतीव निर्मलं । विकल्पनाभ्यो विपरीतमद्वयम् । अवाप्य सम्यग्यदि निश्चितो भवेत् । निरन्वयो निर्वृतिमेति शाश्वतीम् ॥ ६९ ॥

अर्थः--ज्ञानस्वरूप आत्मा आपला आपण साक्षी आहे, तो निर्मळ आहे, त्याच्या ठिकाणीं कांहींच कल्पना संभवत नाहीं, तो अद्वितीय आहे, त्याचें चांगलें ज्ञान करून घेऊन जर दृढ निश्चय झाला, तर सर्व अज्ञानकार्य नाहींसें होऊन अखंड सुख प्राप्त होईल.

इदं रहस्यं परमं परायणं । व्यपेतदोषैरभिमानवर्जितैः । समीक्ष्य कार्यो मतिरार्जवे सदा । न तस्वदवस्त्वान्यमतिर्हि कश्चन ॥ ७० ॥

अर्थः--हें गुप्त ज्ञान सर्वांत श्रेष्ठ आहे, तें सर्वांला आश्रय आहे, सर्व विषयांकडची ओढ टाकून, अहंकार सोडून, सर्व नीट समजून घ्यावें आणि सदा उजू ब्रह्माच्या ठिकाणीं मन ठेवावें. आत्म्याशिवाय इतर गोष्टी ज्याला सत्य वाटतात, त्याला खरें ज्ञान झालें असें होणार नाहीं.

अनेकजन्मांतरसंचितैर्नरो । विमुच्यतेऽज्ञाननिमित्तपातकैः ॥ इदं विदित्वा परमं हि पावनं । न लिप्यते व्योम इवेह कर्मभिः ॥ ७१ ॥

अर्थः--अज्ञानाच्या योगानें मागील जन्मांत पातकें करून

सांठवून ठेवलेली असतील, त्यांतून मनुष्य मुक्त होतो, हें पवित्र ज्ञान कळलें असतां मग आकाशाला जसा कशाचा स्पर्श होत नाहीं, त्यासारखा त्याला पुनः कर्माचा संपर्क होत नाहीं.

प्रशांतचित्ताय जितेंद्रियाय च । प्रहीणदोषाय यथोक्तकारिणे ॥ गुणान्वितायानुगताय सर्वदा । प्रदेयमेतत् सततं मुमुक्षवे ॥ ७२ ॥

अर्थः—ज्याचें चित्त शांत झालें, ज्यानें इंद्रियें जिंकलीं, ज्यानें सर्व विषय सोडले, वर सांगितल्याप्रमाणें जो आचरण करितो, ज्यानें सुगुण संपादन केले, जो गुरूस शरण गेला, अशा मुमुक्षूला हें ज्ञान द्यावें.

परस्य देहे न यथाभिमानिता । परस्य तद्वत्परमार्थमीक्ष्यच ॥ इदंहि विज्ञानमतीव निर्मलं । समाप्तमुक्तोऽप्य भवेच्च सर्वतः ॥ ७३ ॥

अर्थः—दुसऱ्या देहाच्या विषयीं जसा केव्हांहि अभिमान वाटणार नाहीं, त्याप्रमाणेंच आपल्या देहाच्या ठिकाणीं अभिमान वाढूं देऊं नये आणि सर्वांत जो श्रेष्ठ पुरुषार्थ तो समजून घ्यावा; हें अत्यंत पवित्र असें ज्ञान मिळविल्यावर सर्वप्रकारें तो मुक्त होईल.

न हीह लाभोऽप्यधिकोऽस्ति कश्चन । स्वरूपलाभात् सद्गतोहि नान्यतः ॥ न देयमैन्द्रादपि राज्यतोऽधिकं । स्वरूपलाभं त्वपरीक्ष्य यत्नतः ॥ ७४ ॥

अर्थः—स्वरूपाची प्राप्ति होणें याच्यापेक्षां मोठा फायदा दुसरा कोणचाच नाहीं. ती प्राप्ति या असल्या ज्ञानानेंच होईल, दुसरी कशानें होणार नाहीं. या स्वरूपाच्या प्राप्तीचा फायदा कष्टोर्शानें परीक्षा केल्याशिवाय कोणास देऊं नये. ती प्राप्ति इंद्रलोकच्या राज्यापेक्षां जास्त आहे.

अथ सम्यङ्मतिप्रकरणम्
उत्तम विचार.

आत्मा ज्ञेयः परो ह्यात्मा यस्मादन्यन्न विद्यते ।
सर्वज्ञः सर्वदृक् शुद्धः तस्मै ज्ञेयात्मने नमः ॥ १ ॥

अर्थः— आत्म्याची ओळख करावी, तो सर्वांत श्रेष्ठ आहे, त्याच्याशिवाय येथें कांहीं नाहीं. तो सर्व जाणणारा, पहाणारा आहे, निर्मल आहे. अशा ज्ञानरूप आत्म्याला नमस्कार असो.

पदवाक्यप्रमाणज्ञैः दीपभूतैः प्रकाशितम् ।
ब्रह्म वेदरहस्यं यैः तान्नित्यं प्रणतोऽस्म्यहम् ॥ २ ॥

अर्थः—(त्वं, तत्) पद आणि (तत्वमसि हें) वाक्य यांचा बरोबर अर्थ जाणणारे, जे आम्हांला दिव्यासारखे होऊन वेदांतलें सार जें ब्रह्म त्याचें ज्ञान करून देतात, त्यांच्या चरणीं माझा सर्वदा नमस्कार असो.

यद्वाक्यसूर्यांशुसंपातप्रणष्टध्वांतकल्मषः ।
प्रणम्य तान्गुरून् वक्ष्ये ब्रह्मविद्यां विनिश्चितम् ॥ ३ ॥

अर्थः—ज्यांच्या वाणीरूप सूर्याचा किरण पडतांच पातक-रूपी अंधकार सर्व नाहींसा झाला, त्या माझ्या गुरूंच्या चरणीं नम्र होऊन ब्रह्मविद्येचें तत्त्व सांगावयास मी आरंभ करतों.

आत्मलाभात्परो नान्यो लाभः कश्चन विद्यते ।
यदर्था वेदवादाश्च स्मार्ताश्चापि तु याः क्रियाः ॥ ४ ॥

अर्थ— आत्मप्राप्तियेवढी मोटी हिताची गोष्ट दुसरी नाहीं. तिच्याकरतां ही सर्व श्रुतिवचनें, स्मृतिवाक्यें, आणि सर्व कर्म-मार्ग सांगितले आहेत.

आत्मार्थोऽपि च यो लाभः सुखायेष्टो विपर्ययः ।
आत्मलाभः परः प्रोक्तो नित्यत्वात् ब्रह्मवेदिभिः ॥५॥

अर्थः—सुखाकारितां जी वस्तु हावीशी वाटते ती खरोखर आत्म्याकरितांच आहे, परंतु त्यापासून दुःख होण्याचा संभव असतो–पण आत्मप्राप्तिच्या ठिकाणीं तसा प्रसंग नसतो. तो आत्मा नित्य असल्यामुळें ब्रह्मज्ञानी लोक तो सर्वांत श्रेष्ठ आहे ह्मणतात.

स्वयंलब्धस्वभावत्वात् लाभस्तस्य न चान्यतः।
अन्यापेक्षस्तु यो लाभः सोन्यदृष्टिसमुद्भवः॥ ६॥

अर्थः—त्याचा लाभ त्याच्यापासूनच होणारा असल्यामुळें तो दुसऱ्या साधनांनीं व्हावयाचा नाहीं. ज्याची प्राप्ति दुसऱ्या गोष्टीवर अवलंबून असते, ती वस्तु अनात्मवस्तूच्या ठिकाणी येणाऱ्या अनुभवासारखी झालेली असते ( ती आत्मा नसते ).

अन्या दृष्टिस्त्वविद्या स्यात् तन्नाशो मोक्ष उच्यते।
ज्ञानेनैव तु सोऽपि स्यात् विरोधित्वान्न कर्मणा॥ ७॥

अर्थः—हा अनात्मवस्तूच्या ठिकाणचा अनुभव तेंच अज्ञान, तें नाहींसें झालें की मोक्ष आहेच. तो ज्ञानानेंच मिळणार, कर्म करून मिळणार नाहीं, कारण तें ज्ञानाच्या स्वभावाविरुद्ध आहे.

कर्मकार्यस्त्वनित्यः स्यात् अविद्याकामकारणः।
प्रमाणं वेद एवात्र ज्ञानस्याधिगमे स्मृतः॥ ८॥

अर्थः—अज्ञानामुळें झालेल्या इच्छेपासून होणाऱ्या कार्याप्रमाणें मोक्ष जर कर्माच्या योगानें मिळणार असता तर तो नाशवंत असता. ज्ञानापासून मोक्ष मिळेल ह्याला आधार श्रुतिवाक्यें–छांदोग्य ( ८–१–६, ७–१–३ ), तैतिरीय–( २–१ )–आहेत.

ज्ञानैकार्थपरत्वात्तु वाक्यमेकं ततो विदुः।
एकत्वं ह्यात्मनो ज्ञेयं वाक्यार्थप्रतिपत्तितः॥ ९॥

अर्थः—वेदांचा मुख्य उद्देश ज्ञान देणें येवढाच आहे. त्यांतून

सारांशरूपानें त्यांतील वाक्याचा अर्थ घेऊन एक वाक्य काढलें तें हें की आत्मा एक ( अद्वितीय ) आहे असें जाणावें.

वाच्यभेदात्तु तद्भेदः कल्प्यो वाच्योऽपि तच्छ्रुतेः ।

अयं त्वेतत्ततः प्रोक्तं रूपं नाम च कर्मच ॥ १० ॥

अर्थः-त्या आत्म्याच्या वाच्याच्या भेदामुळें आत्म्यावर भेदाचा आभास झाला. तें वाच्य श्रुतीनें तीन शब्दांनीं बृहदारण्यकांत ( ३-६-१ ) सांगितलें आहे, रूप, नाम आणि कर्म—

असदेतत्त्रयं तस्मात् अन्योन्येन हि कल्पितम् ।

कृतो वर्णो यथा शब्दात् श्रुतोऽन्यत्र धिया बहिः॥११॥

अर्थः—हीं तिन्ही खोटीं, कारण तीं एकमेकांनीं रचलेली आहेत. शब्दामुळें निघालेली कल्पना ( इंद्र हजार डोळ्यांचा वगैरे ) बुद्धीनें निराळ्या ठिकाणीं अनुमानानें बसविली.

दृष्टं चापि यथारूपं बुद्धेः शब्दाय कल्पते ।

एवमेतज्जगत्सर्वं भ्रांतिबुद्धिविकल्पितम् ॥ १२ ॥

अर्थः—किंवा (भिंतीवर) काढलेलें जें चित्र पाहिलें, त्याच्यावर बुद्धीनें कल्पना बसवून त्याचें शब्दांनीं वर्णन केलें. ह्याप्रमाणें अविचारी बुद्धीनें कल्पनेवर रचलेलें हें सर्व जग आहे.

असदेतत्ततो युक्तं सच्चिन्मात्रं न कल्पितम् ।

वेद्यापि स एवाद्यो वेद्यं चान्यत्तु कल्पितम् ॥ १३ ॥

अर्थः—म्हणून तें खोटें आहे. फक्त सत् चित् स्वरूप जें आहे तेवढें मात्र योग्य ( खरें ) आहे, तें कल्पनेवर रचलेलें नाहीं. तोच सर्वांच्या पूर्वीचा [ आत्मा ] आहे. वेदसुद्धां त्याच्या करता रचलेला आहे. त्याच्याशिवाय जें कांहीं दुसरें आहे असें वाटेल तें सर्व कल्पित—म्हणून खोटें.

येन वेत्ति स वेदः स्यात् स्वप्ने सर्वं तु मायया ।
येन पश्यति तच्चक्षुः शृणोति श्रोत्रमुच्यते ॥ १४ ॥

अर्थः—स्वप्नामध्यें ज्याच्या योगानें कळतें तो वेद म्हणावा तर त्यावेळीं मायेशिवाय दुसरें कांहीं नसतें. मग पहाणारा तो डोळा, आणि ऐकणारा कान–( हे तेथें स्वप्नांत कसे पटणार ? )

येन स्वप्नगतो वक्ति सा वाक् घ्राणं तथैवच ।
रसनस्पर्शने चैव मनश्चान्यत्तथेंद्रियम् ॥ १५ ॥

अर्थः—स्वप्नांत बोलते ती वाणी, तसेंच घ्राणेंद्रिय, जिव्हा, स्पर्शेंद्रिय, त्याचप्रमाणें आणखी एक इंद्रिय मन, हीं सर्व तेथें काय करतात बरें ?

कल्प्योपाधिभिरेवैतत् भिन्नं ज्ञानमनेकधा ।
आधिभेदाद्यथा भेदो मणेरेकस्य जायते ॥ १६ ॥

अर्थः—ह्या प्रकारच्या उपाधींमुळें ज्ञान एक असून त्या त्या इंद्रियाच्या द्वारानें तें भिन्न झालें, पण वास्तविक तसें नव्हे. स्फटिकाच्या जवळ दुसरे रंग मांडले म्हणून स्फटिक निरनिराळ्या रंगांचा वाटला.

जाग्रतश्च यथा भेदो ज्ञानस्यास्य विकल्पितः ।
बुद्धिस्थं व्याकरोत्यर्थं भ्रांत्या तृष्णोद्भवक्रियः ॥१७॥

अर्थः—ह्या ज्ञानस्वरूप आत्म्याला जाग्रतावस्थेमध्यें तसाच भेद लावला आहे. तो बुद्धीमध्यें प्रतिबिंब पावून तिनें ग्रहण केलेल्या विषयांना आपल्यावर मानून घेतो आणि इच्छेपासून होणाऱ्या सर्व क्रिया भ्रांतिष्टासारखा करूं लागतो.

स्वप्ने वद्गत्मबोधे यो बहिश्चान्तस्तथैव च ।
आलेख्याध्ययने यद्वत् तदन्योन्यधियोद्भवम् ॥ १८ ॥

अर्थः—स्वप्नांतल्याप्रमाणेंच जागृतीमध्यें सुद्धां आंत आणि बाहेर सारखा व्यवहार होतो. लिहिलेली पोथी पाहून पाठ करावें, पाठ केलेलें लिहून काढावें. ह्याप्रमाणें एकमेकाचा परिणाम एकमेकांवर होतो, त्याप्रमाणें हा संबंध समजावा.

यदायं कल्पयेद्भेदं तत्कामः सन् यथा क्रतुः ।
यत्कामस्तत्क्रतुर्भूत्वा कृतं यत्तत्प्रपद्यते ॥ १९ ॥

अर्थः—अशा अविचारानें भेद ( द्वैत ) मानूं लागला म्हणजे त्याविषयीं इच्छा उत्पन्न होते, मग अमूक गोष्ट केली पाहिजे (उदाहरणार्थ यज्ञ) असा ध्यास लागतो, त्या इच्छेप्रमाणें कर्म केल्यावर फल मिळतें, मग त्याच्या उपभोगानें पुनः कर्म करतो.

अविद्याप्रभवं सर्वं असत्तस्मादिदं जगत् ।
तद्गता दृश्यते यस्मात्सुषुप्ते न च गृह्यते ॥ २० ॥

अर्थः—तेव्हां ही सगळी सृष्टि अज्ञानापासून झालेली आहे; त्या अज्ञानामुळें जागृतींत हें सर्व आहेसें वाटतें, पण गाढ झोंपेंत त्यापैकीं कांहींच हातीं येत नाहीं.

विद्याविद्ये श्रुतिप्रोक्ते एकत्वान्यधियौ हि नः ।
तस्मात्सर्वप्रयत्नेन शास्त्रे विद्या निरूप्यते ॥ २१ ॥

अर्थः—अद्वैत समजणें ही विद्या, द्वैत मानणें ही अविद्या असें वेदांत सांगितलें आहे; आणि याकरितांच ( अध्यारोप वगैरे वाद काढून ) निरनिराळ्या यत्नांनीं विद्येचें स्पष्टीकरण शास्त्रानें केलें आहे.

चित्ते ह्यादर्शवद्यस्मात् शुद्धे विद्या प्रकाशते ।
यमैर्नित्यैश्च यज्ञैश्च तपोभिस्तस्य शोधनम् ॥ २२ ॥

अर्थः—आरसा स्वच्छ असला म्हणजे त्यांत जसें प्रतिबिंब

स्वच्छ दिसतें, त्याप्रमाणें निष्पाप अंतःकरण झालें असतां विद्येचा अनुभव येतो. यासाठीं यम, नियम, यज्ञ आणि तप यांच्या योगानें तें ( चित्त ) शुद्ध करावें.

शारीरादि तपः कुर्यात् तद्विशुध्यर्थमुत्तमम् ।
मन आदि समाधानं तत्तद्देहविशोषणम् ॥ २३ ॥

अर्थः--तें मन शुद्ध करण्याकरितां शारीरिक, वाचिक, वगैरे तप करावें. मन वगैरे स्थिर होण्याकरितां त्या त्या ऋतुमानाप्रमाणें देहाला कष्ट देऊन तो स्थूल होऊं देऊं नये.

मनसश्चेंद्रियाणांच ह्यैकाग्र्यं परमं तपः ।
तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते ॥ २४ ॥

अर्थः--मन आणि इंद्रियें ज्यायोगानें एकाग्र होतील ( स्वाधीन रहातील ) त्याला उत्तम तप ह्मणावें. सर्व विहित गोष्टींमध्यें तप हें श्रेष्ठ होय. तप आद्यकर्तव्य समजावें.

दृष्टं जागरितं विद्यात् स्मृतं स्वप्नं तदेव तु ।
सुषुप्तं तदभावंच स्वमात्मानं परं पदं ॥ २५ ॥

अर्थः--बाह्येंद्रियांनी विषयग्रहण ही जागृती, त्याची आठवण तें स्वप्न, त्याचा अभाव ती गाढ झोंप, पण आपलें स्वरूप ओळखणें हें सर्वांत श्रेष्ठ स्थान होय.

सुषुप्ताख्यं तमोऽज्ञानं बीजं स्वप्नप्रबोधयोः ।
स्वात्मबोधप्रदग्धं स्यात् बीजं दग्धं यथा भवम् ॥ २६

अर्थः--गाढ झोंपेंतला जो अंधकार तेंच अज्ञान, तें स्वप्न आणि जागृती या अवस्थांचें बीज होय. आत्म्याची जाणीव करून घेऊन तें बीज जाळलें ह्मणजे मग भाजलेलें बीं उगवत नाहीं त्याप्रमाणें [ पुनः ] भ्रम होणार नाहीं.

तदेवैकं त्रिधा ज्ञेयं मायाचीनं पुनः क्रमात् ।
मायास्थात्माऽविकारोऽपि बहुधैको जलार्कवत् ॥ २७॥

अर्थ —तें मायारूपी बीं तीन प्रकारचें असतें. त्या आत्म्याला मायेनें घेरलें तरी तो विकाररहितच एकटाच असतो. पाण्यात पडलेलें सूर्याचें प्रतिबिंब अनेक ठिकाणीं असलें तरी सूर्य एकच असतो.

बीजं चैकं यथा भिन्नं प्राणस्वप्नादिभिस्तथा ।
स्वप्नजाग्रच्छरीरेषु तद्वच्चात्मा जलेन्दुवत् ॥ २८ ॥

अर्थ —माया बीज एक असून प्राण ( अव्याकृत अवस्था ) स्वप्न, मूर्छा वगैरे निरनिराळ्या वाटतात, त्याप्रमाणेंच पाण्यातील चंद्र-प्रतिबिंबासारखा आत्मा सूक्ष्म, स्थूल शरीरामध्यें तैजस, प्राज्ञ वगैरे नावाचा वाटतो.

मायाहस्तिनमारुह्य मायाव्येको यथा व्रजेत् ।
आगच्छंस्तद्वदेवात्मा प्राणस्वप्नादिगोऽचल ॥ २९ ॥

अर्थ —कोणी एक जादूगार आपण निर्माण केलेल्या जादूच्या हत्तीवर बसून ( वाटेल तिकडे ) जातो येतो, पण तो खरोखर जागच्या जागीच असतो, त्याप्रमाणें स्थूल, सूक्ष्म शरीरात आत्मा गेल्यासारखा वाटतो

न हि हस्ती तदारूढो मायाव्यन्यो यथा स्थित ।
न प्राणादि न तद्द्रष्टा तथाऽन्योऽज्ञः सदा दृशिः ॥३०॥

अर्थः—हत्तीहि ( खरा ) नाही, त्याच्यावर बसणाराहि ( खरा ) नाही, जादूगार निराळाच, प्रथम होता तसाच असतो, त्याप्रमाणें प्राण वगैरेहि नाहीत, त्यांना पहाणारा नाही. तो निराळा आत्मा सदा ज्ञानरूप आहे.

अबद्धचक्षुषो नास्ति माया मायाविनोऽपि वा ।
बद्धाक्षस्यैव सा माया मायाव्येव ततो भवेत् ॥३१ ॥

अर्थः— ( त्या जादूगारानें ) ज्यांचे डोळे भारले नसतील त्यांना ती माया ( हत्ती वगैरे ) नसतेच, त्याप्रमाणें त्या जादूगारालाहि नसते. ज्याचे डोळे जादूनें ( बांधले ) भारले असतील, त्याला हत्ती दिसतो आणि त्याच्यावर बसणारा दिसतो.

साक्षाद्देवः स विज्ञेयः साक्षादात्मेतिच श्रुतेः ।
भिद्यते हृदयग्रंथिः न वेदित्यादितः श्रुतेः ॥ ३२ ॥

अर्थः—तो प्रत्यक्ष आला आहे, असें बृहदारण्य ( ५·४·१ ) उपनिषदांत सांगितलें आहे, त्यावरून तो प्रत्यक्ष ब्रह्म जाणावा. त्यामुळें नेचत् वगैरे केन ( १३ ) उपनिषदांत वगैरे सांगितल्याप्रमाणें हृदयांतील सर्व संशयांच्या गांठी उकलतात.

अशब्दादि त्वतो नास्य ग्रहणं चेन्द्रियैर्भवेत् ।
सुखादिभ्यस्तथान्यत्वात् बुद्धावादि कथं भवेत्॥ ३३॥

अर्थः—शब्द वगैरे रहित तो असल्यामुळें इंद्रियांना त्याचें ज्ञान होणार नाहीं. सुख वगैरे विषयांहून तो निराळा असल्यामुळें बुद्धीला तरी तो कसा सापडणार ?

अदृश्योऽपि यथा राहुः चंद्रे बिंबं यथांभसि ।
सर्वगोऽपि तथैवात्मा बुद्धावेव प्रगृह्यते ॥ ३४ ॥

अर्थ—राहू दिसत नसून तो चंद्रग्रहणाच्या वेळीं समजतो, पाण्यांत पडलेल्या प्रतिबिंबावरून बिंब ओळखतें; त्याप्रमाणें सर्व ठिकाणीं आत्मा असूनहि तो बुद्धीमध्यें शिरला आहे असा वाटून त्याचा भास होतो.

भानोर्बिंबं यथा चोष्णं जले दृष्टं न चांभसः ।
बुद्धौ बोधो न तद्धर्मः तथैव स्याद्विधर्मतः ॥ ३५ ॥

अर्थः—पाण्यांत पडलेले सूर्याचे किरण उष्ण असतात, तो गुण पाण्याचा नव्हे, त्याप्रमाणें बुद्धीच्या ठिकाणीं दिसणारी जाणीव बुद्धीची नव्हे, कारण ती मुळींच जड वगैरे निराळ्या गुणाची आहे.

चक्षुर्युक्ता धियो वृत्तिः या तां पश्यन्नलुप्तदृक् ।
दृष्टेर्द्रष्टा भवेदात्मा श्रुतेः श्रोता तथा भवेत् ॥ ३६ ॥

अर्थः—डोळ्याच्या वाटेनें जी बुद्धीची वृत्ति ( पहाण्याची ) ती पहाणारा अकुंठज्ञानसामर्थ्याचा आहे. तोच आत्मा पहाण्याचा पहाणारा, श्रवणाचा ऐकणारा होतो.

केवलां मनसो वृत्तिं पश्यन् मंता मतेरजः ।
विज्ञाता लुप्तशक्तित्वात् तथा शास्त्रे न हीत्यतः॥३७॥

अर्थः—केवळ मनाची वृत्ति ( चिंतनाची ) तिला पाहणारा सुद्धा तोच जन्मरहित ( आत्मा ) आहे. त्याचें सामर्थ्य कधींच कमी पडत नाहीं, म्हणून तो सदा ज्ञानी आहे. याप्रमाणेंच (या अर्थाचें) नहि वगैरे बृहदारण्य ( ६-३ ) वाक्य आहे.

ध्यायतीलविकारित्वं तथा लेलायतीत्यपि ।
अत्र स्तेनेति शुद्धत्वं तथा नन्वागतं श्रुतेः ॥ ३८ ॥

अर्थः—ध्यान करीत असो किंवा कांहीं क्रिया होत असो, आत्मा अविकारी आहे. ह्याला आधार चोर शुद्ध होतो वगैरे बृहदारण्य ( ६-३ ), त्याला पुण्य लागत नाहीं वगैरे त्याच उपनिषदांत ( ५-४ ) वाक्य आहे.

शक्त्यलोपात्सुषुप्ते ज्ञः तथाबोधेऽविकारितः ।
ज्ञेयस्यैव विशेषस्तु यत्र वेति श्रुतेर्वचः ॥ ३९ ॥

अर्थः—गाढ झोपेंत आत्मा असतोच, त्याची शक्ति कधींच लोप पावत नाहीं. त्याचप्रमाणें जागृतीमध्यें ( व स्वप्नांतहि ) त्याला विकार होत नाहीं. तो जर जाणिवेचा विषय झाला असता तर यत्र वा वगैरे बृहदारण्यांत ( ६–३ ) सांगितल्याप्रमाणें जाणणारांची मालिकाच लागली असती.

व्यवधानाद्धि पारोक्ष्यं लोकदृष्टेरनात्मनः ।
दृष्टेरात्मस्वरूपत्वात् प्रत्यक्षं ब्रह्म तत्स्मृतम् ॥ ४० ॥

अर्थः—अनात्म वस्तू ( घट वगैरे ). ह्या लौकिक दृष्टीच्या ( डोळ्याच्या ) आड झाला की दिसत नाहीं, पण ज्ञान हेंच आत्म्याचें स्वरूप असल्यामुळें ब्रह्म प्रत्यक्ष आहे असें स्मृति सांगते.

नहि दीपांतरापेक्षा यद्वद्दीपप्रकाशने ।
बोधस्यात्मस्वरूपत्वात् न बोधोऽन्यस्तथेष्यते ॥४१॥

अर्थः—दिवा लागलेला असतां तो दाखविण्याकरितां जशी दुसऱ्या दिव्याची जरूर नाहीं, त्याप्रमाणेंच जाणीव हें आत्म्याचें रूप असल्यामुळें त्याच्या ओळखीला दुसऱ्या जाणिवेची जरूर नाहीं.

विषयत्वं विकारित्वं नानात्वं वा न हीष्यते ।
न हेयो नाप्युपादेय आत्मा नान्येन वा ततः ॥४२॥

अर्थः—आत्मा विषय होत नाहीं, विकार पावत नाहीं, तो अनेक प्रकारचा होत नाहीं. तो दुसऱ्या कशाकडून टाकण्यासारखा नाहीं किंवा घेण्यासारखाहि नाहीं.

सबाह्याभ्यंतरो जीर्णो जन्ममृत्युजरातिगः ।
अहमात्मेति यो वेत्ति कुतोऽन्वेव बिभेति सः ॥४३॥

अर्थः—आंत बाहेर सगळीकडे भरलेला, ज्यानें जन्म, मृत्यु, म्हातारपण जिंकलें असा, असा आत्मा मीच आहें असें ज्याला समजलें, त्याला कशाची भीति वाटत नाही.

प्रागेवैतद्विधेः कर्म वर्तित्वादेरपोहनात् ।
तदस्थूलादि शास्त्रेभ्यः तत्त्वमेवेति निश्चयात् ॥ ४४ ॥

अर्थः—आत्मा स्थूल नाहीं वगैरे शास्त्रवचनांनीं वर्ण, धर्म वगैरे सर्वांचा त्याग करून, मीच ब्रह्म आहें असा निश्चय होईपर्यंत मात्र हें कर्म विधियुक्त करावें.

पूर्वं देहपरित्यागे जात्यादीनां प्रहाणतः ।
देहस्यैव तु जात्यादिः तस्याप्येवं ह्यनात्मतः ॥ ४५ ॥

अर्थः—अगोदर देहाचा अभिमान सोडावा म्हणजे देहासंबंधी जात वगैरे सुटणार. जात, धर्म हीं देहाला लागू आहेत, आणि ह्यावरूनच देह हा आत्मा नव्हे असें होतें.

ममाहं चेत्यतोऽविद्या शरीरादिष्वनात्मसु ।
आत्मज्ञानेन हेया स्यात् असुराणामिति श्रुतेः ॥४६॥

अर्थः—आत्मा नसणारे जे देह वगैरे तेच मी आहें असें ऐक्य मानणें ह्यालाच अज्ञान म्हणतात. आत्म्याचें ज्ञान करून घेऊन तें घालवावें, ह्याला आधार–हें राक्षसाचें ज्ञान वगैरे छांदोग्यांत ( ८–८–५ ) सांगितलें आहे.

दशाहाशौचकार्याणां पारिव्राज्ये निवर्तनम् ।
यथा ज्ञानस्य संप्राप्तौ तद्जात्यादिकर्मणाम् ॥ ४७ ॥

अर्थः—संन्यास घेतल्यावर जसा सुतक वगैरेचा संबंध नाहीं,

त्याप्रमाणें ज्ञानप्राप्तीनंतर जाति वगैरे वर्णाश्रमाचें कर्म करावयाचें नसतें.

यत्कामस्तत्क्रतुर्भूत्वा कृतं तत्फलं प्रपद्यते ।
यदा स्वात्मदृशः कामाः प्रमुच्यन्तेऽमृतस्तदा ॥ ४८ ॥

अर्थः—इच्छा मनांत धरली की त्याचा ध्यास लागून कर्म घडतें व त्यापासून फल येतें. इकडे आपण कोण याची जाणीव झाली म्हणजे सर्व इच्छा नाहींशा होतात आणि मोक्ष मिळतो.

आत्मरूपविधेः कार्यं क्रियादिभ्यो निवर्तनम् ।
न साध्यं साधनं वात्मा नित्यतृप्तः स्मृतेर्मतः ॥ ४९ ॥

अर्थः—आत्मज्ञान झाल्यानंतर क्रिया वगैरे सुटल्या पाहिजेत. कारण आत्मा नित्यतृप्त आहे असें स्मृति सांगते, त्याच्या प्राप्तीला कांहीं साध्य किंवा साधन लागत नाहीं.

उत्पाद्याप्यविकार्याणि संस्कार्यं च क्रियाफलं ।
नातोऽन्यत्कर्मणा कार्यं त्यजेत्तस्मात्ससाधनं ॥ ५० ॥

अर्थः—कार्यें करून सोडावी, क्रियेच्या फलाची इच्छा धरूं नये. ज्ञानानंतर आतां कर्माचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून साधनासहवर्तमान कर्म टाकून द्यावीं.

तापान्तरत्वादनित्यत्वात् आत्मार्थत्वाच या बहिः ।
संहृत्यात्मनि तां प्रीतिं सत्यार्थी गुरुमाश्रयेत् ॥५१॥

अर्थः—आपल्या स्वतःच्या सुखासाठीं जी बाहेरल्या ( स्त्री पुत्रादिक ) पदार्थांवर आवड असते, तिच्यापासून अखेर दुःख होणार आणि ती शेवट टिकणारी नाहीं असें जाणून तिचा विस्तार आटपून, ती आवड एकट्या आत्म्यावर लावावी, आणि सत्य काय याची ओळख करून घेण्याकरतां गुरूला शरण जावें.

शांतं मार्गं तथा मुक्तं निष्क्रियं ब्रह्मणि स्थितं ।
श्रुतेराचार्यवान्वेद तद्धिद्धीति स्मृतेस्तथा ॥ ५२ ॥

अर्थः—ज्याचें चित्त शांत झालें आहे, जो विद्वान् आहे, मोक्ष ज्यानें मिळविला आहे, ज्याला काहीं कर्तव्य उरलें नाहीं, ज्याची ब्रह्मस्थिति कायम आहे, असा गुरु असावा. जो गुरूला शरण जाईल त्याला ज्ञान होईल असें छांदोग्यांत ( ६–१४–२ ) सांगितलें आहे. गुरूला शरण जाऊन ज्ञान समजून घे वगैरे श्रीमद्भगवद्गीतां ( ४–३४ ) येथें सांगितलें आहे.

स गुरुस्तारयेद्युक्तं शिष्यं शिष्यगुणान्वितं ।
ब्रह्मविद्याप्लवेनाशु स्वान्तध्वान्तमहोदधिं ॥ ५३ ॥

अर्थ —अशा प्रकारचा गुरु असेल आणि शिष्याच्या अंगीं असावे ते गुण संपादन केलेला शिष्य असेल तर ब्रह्मज्ञानरूपी नौकेच्या आश्रयानें अंतःकरणांत आत्म्याचा विसररूपी जो मोठा समुद्र त्यांतून तो गुरु त्या शिष्याला तारील—

दृष्टिः स्पृष्टिः श्रुतिर्घ्रातिः मतिर्विज्ञातिरेवच ।
शक्तयोऽन्याश्च भिद्यन्ते चिद्रूपत्वेऽप्युपाधिभिः ॥५४॥

अर्थः—पहाणें, स्पर्श करणें, ऐकणें, वास घेणें, मनन करणें, जाणणें, ह्या सर्व क्रिया त्या त्या विषयाच्या उपाधीमुळें निरनिराळ्या वाटतात, पण त्यांचा चैतन्यरूपावर नुसता आरोप आहे.

अपायोद्भूतिहीनाभिः नित्यं दीप्यन् रविर्यथा ।
सर्वज्ञः सर्वदृक् शुद्धः सर्वं जानाति सर्वदा ॥ ५५ ॥

अर्थः-ज्यांना जन्म आणि नाश नाहीं ( म्हणजे जीं सर्वदा सूर्याजवळ आहेतच ) अशा किरणांनीं नेहमीं प्रकाश करणारा सूर्य जसा कधानें विटाळत नाहीं, त्याप्रमाणें सर्व इंद्रियांच्या वृत्ती-

मुळें सर्व पहाणारा असें जरी म्हणतो, तरी नेहमीं ज्ञानस्वरूप असणारा आत्मा शुद्धच आहे, त्याला ह्या वृत्तींचा विकार होत नाहीं.

अन्यदृष्टिः शरीरस्थः तावन्मात्रो ह्यविद्यया ।
जलेंद्वाद्युपमाभिस्तु तद्धर्माच विभाव्यते ॥ ५६ ॥

अर्थः—शरीरांत शिरल्यामुळें आत्म्याविषयीं विसर पडून अज्ञानामुळें त्या त्या शरीरायेवढाच मी असें जरी तो मानूं लागला, तरी तो निराळा असतो. पाण्यांतल्या चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें आत्मा त्या त्या क्रिया करतो असें वाटतें.

दृष्ट्वा बाह्यं निमील्याथ स्मृत्वा तत्प्रविहायच ।
अथोन्मील्यात्मनो दृष्टिं ब्रह्म प्राप्नोत्यनन्वगः ॥ ५७ ॥

अर्थः—हें सर्व दृश्य जग काय आहे याचें ज्ञान करून घेऊन, ( स्थूलाचा अभिमान सोडून ) त्याचें स्मरण किंवा स्वप्न तें टाकून, ( सूक्ष्म शरीर विसरून ) आत्म्याचें निरुपाधिक ज्ञान करून घेतलें म्हणजे ब्रह्मप्राप्ति होईल, त्याच्याकरतां कोठें जायला नको.

ध्याणाद्येवं त्रिकं हित्वा तीर्णोऽज्ञानमहोदधिम् ।
स्वात्मस्थो निर्गुणः शुद्धो बुद्धो मुक्तः स्वतोहि सः ॥५८

अर्थः—ह्याप्रमाणें स्थूल, सूक्ष्म, कारण ह्या तिहींचा त्याग करून अज्ञानरूपी मोठ्या समुद्रांतून तरून गेल्यावर आत्मरूपाच्या ठिकाणीं स्थिरपणा येऊन, तो गुणरहित, निर्मल, ज्ञानी, बंधमुक्त निजस्वरूपानें राहील.

अजोऽहं चामरोऽमृत्युः अजरोऽभय एवच ।
सर्वज्ञः सर्वदृक् शुद्ध इति बुद्धो न जायते ॥ ५९ ॥

अर्थः——मी जन्मरहित, मरण नसलेला, मृत्यूला न भिणारा,

ज्ञातारा न होणारा, निर्भय, पूर्णज्ञानी, सर्व पहाणारा, निष्पाप, अशी ओळख झाल्यावर पुन: देहांत यावें लागणार नाहीं.

पूर्वोक्त यत्तमोबीजं तन्नास्तीति विनिश्चयः ।
तदभावे कुतो जन्म ब्रह्मैकत्वं विजानतः ॥ ६० ॥

अर्थ—अज्ञान उपाधि मूळकारण असें पूर्वी सांगितलें तें जगत् ( माया ) नाहींच, असा दृढ निश्चय असल्यावर, मग जन्म कुठून येणार. सर्व ब्रह्मच असें त्याला ज्ञान झालेलें असतें.

क्षीरात्सर्पिर्यथोद्धृत्य क्षिप्तं तस्मिन्न पूर्ववत् ।
बुद्ध्यादेस्तत्तथाऽसत्यात् न देही पूर्ववद्भवेत् ॥ ६१ ॥

अर्थ—दुधातून लोणी काढून तें पुन: त्यात टाकलें तर पूर्वीप्रमाणें मिसळत नाहीं ( निराळें रहातें ), त्याप्रमाणें बुद्धि वगैरे ठिकाणच्या असत्य भासापासून जाणीवरूप निराळें काढल्यावर ( समजल्यावर ) पुन: तो देहाभिमानी होणार नाहीं.

सत्यं ज्ञानमनंतंच रसादेः पंचकात्परम् ।
स्वाप्नदृश्यादि शास्त्रोक्तं अहं ब्रह्मेति निर्भयः ॥ ६२ ॥

अर्थ—अन्न, प्राण, मन, विज्ञान आणि आनंद ह्या पंच कोशांतून सत्य काय तें अंतरहित ज्ञान आहे अदृश्य वगैरे सर्वांत स्थिर तो आहे असें तैत्तिरिय उपनिषदांत ( २–७ ) सांगितलें आहे, त्यावरून मी आतां निर्भय झालों, मीच ब्रह्म आहे.

यस्माद्भीताः प्रवर्तन्ते वाङ्मनःपावकादयः ।
तदात्मानंदतत्त्वज्ञो न बिभेति कुतश्चन ॥ ६३ ॥

अर्थ—वाणी, मन, अग्नि वगैरे ज्याला भिऊन ( आपआपलें ) काम करतात, तो आनंदरूप तत्त्वज्ञानी आत्मा होय, तो कोणाला भीत नाहीं.

नामादिभ्यः परे भूम्नि स्वाराज्ये चेत्स्थितोऽद्वये ।
प्रणमेत्कं तदात्मज्ञो न कार्यं कर्मणा तदा ॥ ६४ ॥

अर्थः—नामापासून आरंभ करून एकापेक्षां एक अधिक अशा सर्वज्ञाच्या स्वतंत्रतेच्या शेवटच्या अद्वितीयस्थानीं श्रेष्ठ कायम जाऊन बसल्यावर मग आत्मज्ञान्यानें नमस्कार कोणाला करावयाचा ? नंतर त्याला कर्म करण्याचें उरलें नाहीं.

विराड्वैश्वानरो बाह्यः स्मरन्नंतः प्रजापतिः ।
प्रविलीने तु सर्वस्मिन् प्राज्ञोऽव्याकृतमुच्यते ॥ ६५ ॥

अर्थः—त्याला जागृतीमध्यें विश्व वैश्वानर ह्मणतात, स्वप्नकालीं त्याला तैजस हिरण्यगर्भ ह्मणतात, आणि गाढ झोपेंत मायोपाधिक ईश्वर किंवा प्राज्ञ असें त्याला ह्मणतात.

वाचारंभणमात्रत्वात् सुषुप्तादि त्रिकं त्वसत् ।
सत्योऽज्ञश्चाहमित्येवं सत्यसंधो विमुच्यते ॥ ६६ ॥

अर्थः—हें सर्व व्यर्थ बोलणें आहे ह्मणून ह्या तिन्ही अवस्था खोट्या. ज्ञानस्वरूप आत्मा तेवढा खरा, असें खरें ज्ञान ज्याला झालें, तो मोक्षाला गेला.

भारूपत्वाद्यथा भानोः नाहोरात्रे तथैव च ।
ज्ञानाज्ञाने न मे स्यातां चिद्रूपत्वाविशेषतः ॥ ६७ ॥

अर्थः—सूर्याचें स्वरूपच प्रकाशरूप असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं दिवस आणि रात्र नसते, त्याप्रमाणें एकसारखा चैतन्यरूप मी असल्यामुळें ज्ञान आणि अज्ञान हीं दोन्हीं माझ्या ठिकाणीं संभवत नाहींत.

शास्त्रस्यानतिशङ्क्यत्वात् मय्येव स्यामहं सदा ।
ब्रह्मणो मे न हेयं स्यात् ग्राह्यं वेत्ति च संस्मरेत् ॥६८॥

अर्थः--शास्त्रात सांगितलेल्या गोष्टी निःसंशय खऱ्या असल्यांमुळें मी सदोदित ब्रह्म आहें. मला ब्रह्माला कांहीं टाकावयाचें आहे किंवा मिळवावयाचें आहे असें कांहींच नाही.

अहमेव च भूतेषु सर्वेष्वेको नभो यथा ।
मयि सर्वाणि भूतानि पश्यन्नेवं न जायते ॥ ६९ ॥

अर्थ ---आकाशाप्रमाणें मीच एकटा सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणीं आहें, आणि माझ्यामध्यें सर्व प्राणिमात्र आहेत, असें ज्ञान ज्याला झालें, तो पुन जन्माला येत नाहीं.

न बाह्यं मध्यतो वाऽन्त विद्यतेऽन्यत्स्वत क्वचित् ।
अबाह्यांतः श्रुते किंचित् तस्माच्छुद्ध स्वयंप्रभः ॥७०॥

अर्थ -मला मजपासून किंवा दुसऱ्यापासून बाहेर, मध्यें किंवा आंत असला कांहीं ( भेदाचा ) प्रकार नाहीं. बाह्य नाहीं, आंत नाहीं वगैरे बृहदारण्य ( ४-५-१९ ) वाक्यावरून मी निष्पाप स्वप्रकाशित आहें.

नेति नेत्यादि शास्त्रेभ्यः प्रपंचोपशमोऽद्वय ।
अविज्ञातादि शास्त्राच्च नैव ज्ञेयो ह्यतोऽन्यथा ॥ ७१ ॥

अर्थः-हें नाहीं, तें नाहीं, असा निषेध करून प्रपंचाच्या गोष्टी गाळतां गाळतां शेवटीं अद्वैत राहील अविज्ञाता वगैरे बृहदारण्य ( ५-८-११ ) उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें त्याचें ज्ञान अशा निषेधानें होईल, एरवीं नाहीं.

सर्वस्यात्माहमेवेति ब्रह्म चेद्विदितं परम् ।
स आत्मा सर्वभूतानां आत्मा ह्येषामिति श्रुति ॥७२॥

अर्थः---मी सर्वांचा आत्मा आहें, याप्रमाणें श्रेष्ठ ब्रह्म जाण-

त्यावर, तोच सर्व भूतांचा आत्मा होतो, हाच त्यांचा आत्मा वगैरे बृहदारण्यांत ( ३–४–१० ) वचनें आहेत.

जीवश्चेत्परमात्मानं स्वात्मानं देवमञ्जसा ।
देवोपास्यः स देवानां पशुत्वाच निवर्तते ॥ ७३ ॥

अर्थः–हा जीव ( निराळा नाहीं ) तोच परमात्मा, तोच देव, तो सर्व देवांपैकीं पूजनीय देव होणार, त्याला उपाधीमुळें आलेलें अज्ञान नाहींसें होतें.

अहमेव सदात्मज्ञः शून्यस्त्वन्यैर्यथांबरं ।
इत्येवं सत्यसंधत्वात् असद्वाता न बध्यते ॥ ७४ ॥

अर्थः––मीच सदा आत्मा, ज्ञानी, आकाशाप्रमाणें येथें कशाचा दुसऱ्याचा संपर्क नाहीं, याप्रमाणें सत्य नेहमी असणारा, असत्या ( तस्करचोरा ) प्रमाणें बंधन पावत नाहीं.

कृपणास्तेऽन्यथैवातो विदुर्ब्रह्म परंहि ये ।
स्वराड्योऽन्यदक् स्वस्थः तस्य देवाः असन्वशे ॥७५॥

अर्थः––अशा प्रकारचें ब्रह्म नाहीं वगैरे जे कोणी म्हणतात, त्यांच्या अज्ञानाची कींव येते; जो सर्वश्रेष्ठ ब्रह्म, जो सर्वास आपले ठिकाणीं पहातो, ज्याला आपलें रूप कळलें, त्याच्या अंकित सर्व देव असतात.

हित्वा जात्यादिसंबंधान् वाचोऽन्याः सहकर्मभिः ।
ओमित्येवं सदात्मानं सर्वं शून्यं प्रपद्यथ ॥ ७६ ॥

अर्थः—जात, वर्ण वगैरे आणि इतर कर्मासुद्धां वृत्तिरूपी उपाधी टाकून सर्वांत निर्मळ असें आपलें आत्मस्वरूप ॐ तें प्राप्त करून घ्यावें.

सेतुं सर्वव्यवस्थानां अहोरात्रादिवर्जितं ।
तिर्यगूर्ध्वमधः सर्वं सकृज्ज्योतिरनामयम् ॥ ७७ ॥

अर्थः---वर्णाश्रममर्यादांना आधारभूत, जेथें दिवस आणि रात्र यांची अपेक्षा, बाजूला, वर, खालीं सगळीकडे भरलेला, नित्यप्रकाशरूप, निरोगी-( असलें स्वरूप आहे. )

धर्माधर्मविनिर्मुक्तं भूतभव्यात्कृताकृतात् ।
स्वमात्मानं परं विद्यात् विमुक्तं सर्वबंधनैः ॥ ७८ ॥

अर्थः---जेथें धर्म अधर्म यांचा; किंवा मागें झालेलें, पुढें होणारें वगैरे कालाचा आणि कार्यकारणसंबंधाचा, संपर्क नाहीं, सर्व बंधनांपासून सुटलेला असा आपला श्रेष्ठ आत्मा ओळखावा.

अकुर्वन् सर्वकृच्छुद्धः तिष्ठन्नत्येति धावतः ।
मायया सर्वशक्तित्वात् अजः सन् बहुधा मतः ॥७९॥

अर्थः---सर्व करून कांहीं न करणारा, सर्व धांवणाऱ्या ( मन वगैरे ) पेक्षां अधिक वेगवान् असून जागचा न हालणारा, निर्मळ, मायेच्या योगानें सर्व प्रकारचें सामर्थ्य असलेला, जन्मरहित असून ह्या जगरूपानें नटलेला ( आत्मा आहे ).

राजवत्साक्षिमात्रत्वात् सान्निध्यात् भ्रामको यथा ।
भ्रामयन् जगदात्माहं निःक्रियो कारकोऽद्वयः ॥८०॥

अर्थः---राजाप्रमाणें सर्व गोष्टींचा साक्षी [ त्यांतलें कांहीं न करणारा ] लोहचुंबकाप्रमाणें नुसत्या जवळ असण्यानें सगळ्यांस गति देणारा, जगाचा आत्मा, क्रियारहित, अद्वैत, कारणरहित आत्मा मी आहें.

निर्गुणं निःक्रियं नित्यं निर्द्वंद्वं यन्निरामयम् ।
शुद्धं बुद्धं तथा मुक्तं तद्ब्रह्मास्मीति धारयेत् ॥ ८१ ॥

अर्थः—गुण व क्रियारहित, नित्य, अद्वैत, रोगरहित, शुद्ध, ज्ञानी, मुक्त ब्रह्म मी आहे असा विचार करावा.

बंधं मोक्षं च सर्वं यत इदमुभयं हेयमेकं द्वयं च ।
ज्ञेयं ज्ञेयाभ्यतीतं परममधिगतं तत्त्वमेकं विशुद्धं ॥८२॥

अर्थः—बंध आणि मोक्ष वगैरे सर्व ज्याच्यापासून झाले, हे द्वैत तरी त्याज्य असून ज्याच्या आधारावर भासले, जाणिवेस योग्य असून ज्याचें ज्ञान ( इंद्रियांनीं ) होत नाहीं, असें सर्वांत श्रेष्ठ, शुद्ध, अद्वितीय तत्त्व आहे.

विज्ञायैतद्यथावच्छ्रुतिमुनिगदितं शोकमोहादतीतः ।
सर्वज्ञः सर्वकृत्स्याद्भवभयरहितो ब्राह्मणो वा प्रकृत्यः॥
न स्वयं स्वस्पनान्यश्च नान्यस्यात्मा च हेयगः ।
उपादेयो न चाप्येवं इति सम्यङ् मतिः स्मृता ॥ ८३॥

अर्थः—वेदांतशास्त्रांत आणि ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें हें ज्ञान संपादन करून घेऊन, शोकमोहांतून सुटावें, म्हणजे त्याला ब्रह्म कळेल, तो सर्वज्ञानी होईल, त्याला कांहीं करावयाचें रहाणार नाहीं, त्याला संसाराची भीति उरणार नाहीं. त्याचे सर्व हेतु पूर्ण झाले. आत्म्याला टाकणें हें स्वतःला किंवा दुसऱ्या कोणाला शक्य नाहीं. त्याप्रमाणेंच त्याला मिळवायचें असें कांहीं नाहीं. याप्रकारचें ज्ञान तें उत्तम होय असें ब्रह्मज्ञानी म्हणतात.

आत्मप्रत्यायिका ह्येषा सर्ववेदांतगोचरा ।
ज्ञात्वैनां हि विमुच्यंते सर्वसंसारबंधनैः ॥ ८४ ॥

अर्थः—वेदांतील वचनाच्या आधारानें हें लिहिलें आहे, आत्मा ब्रह्म आहे असा अनुभव यामुळें येणार आहे. त्या ज्ञानानें संसाराचे सर्व पाशांपासून सुटका होईल.

रहस्यं सर्ववेदानां देवानां चापि यत्परम् ।
पवित्रं परमं ह्येतत् तदेतत्सम्प्रकाशितम् ॥ ८५ ॥

अर्थः-वेदांतील गूढ, देवाना सुद्धा जें मोठें महत्वाचें वाटतें, आणि अत्यंत पवित्र असलें हें शास्त्र आम्हीं उत्तम प्रकारानें सांगितलें.

नैतद्देयमशांताय रहस्यं ज्ञानमुत्तमम् ।
विरक्ताय प्रदातव्यं शिष्यायानुगताय च ॥ ८६ ॥

अर्थः—ज्याचें मन शांत झालें नाहीं त्याला हें उत्तम, गुप्त, ज्ञान देऊं नको पण संसारतापाला कंटाळून जो शरण येऊन शिष्य होईल त्याला हें अवश्य सांगावें

ददतश्चात्मनो ज्ञानं निष्क्रयोऽन्यो न विद्यते ।
ज्ञानमिच्छस्तरेत्तस्मात् युक्तःशिष्यगुणैः सदा ॥ ८७ ॥

अर्थ –आत्म्याचें ज्ञान करून देणें ह्याच्या इतकें मोल कशाचेंहि नाहीं. यासाठीं शिष्याला योग्य जे गुण ते संपादन करून ज्ञान मिळविण्याची खटपट करावी ह्मणजे तो मुक्त होईल

ज्ञानं ज्ञेयं तथा ज्ञाता यस्मादन्यत्र विद्यते ।
सर्वज्ञ सर्वशक्तिर्यः तस्मै ज्ञानात्मने नम ॥ ८८ ॥

अर्थ —जाणण्याची वस्तु, जाणणारा आणि जाणीव ही त्रिपुटी ज्याच्याशिवाय नाहीं, असा तो सर्वज्ञानी, सर्वशक्तिमान् त्या ज्ञानस्वरूपाला नमस्कार करतों.

विद्यया तारिता स्मो यै जन्ममृत्युमहोदधिम् ।
सर्वज्ञेभ्यो नमस्तेभ्यो गुरुभ्योऽज्ञानसंकुलम् ॥ ८९ ॥

अर्थ—अज्ञानानें भरलेल्या जन्ममृत्युरूपी संसारसागरातून विद्येच्या योगानें ज्या गुरुमहाराजानीं आह्मास परतीराला नेलें, त्या सर्वज्ञानी गुरुचरणास नमस्कार करतों.

---

## अथ तत्त्वमसिप्रकरणं

अद्वैतम्

येनात्मना विलीयन्ते उद्भवन्ति च वृत्तयः।
नित्यावगतये तस्मै नमो धीप्रत्ययात्मने ॥ १ ॥

अर्थ —ज्या आत्म्यापासून बुद्धीच्या वृत्ती उत्पन्न होतात आणि ज्याच्या ठिकाणीं त्या लीन होतात, जेथें अखंड जाणीव आहे, जो बुद्धीच्या अनुभवाचा साक्षी आहे, त्या आत्म्याला नमस्कार करतों.

प्रमथ्य वज्रोपमयुक्तिसंभृतैः। श्रुतेररातीन् शतशो वचोऽसिभिः॥ ररक्ष वेदार्थनिधिं विशालधी। नमो यतींद्राय गुरोर्गरीयसे ॥ २ ॥

अर्थः—वज्राच्यासारख्या युक्तिवादांनी पाणी दिलेल्या अशा श्रुतिवाक्यरूप तरवारींनीं हजारों शत्रूंचा ( मतवाद्यांचा ) नाश ( खंडन ) करून ज्या अत्यंत बुद्धिमान् यतिरायानीं वेदार्थसागर सरक्षण केला, त्या गुरूच्या गुरूस नमस्कार असो.

नित्यमुक्तः सदेवास्मीत्येवं चेन्न भवेन्मतिः।
किमर्थं श्रावयत्येव मातृवच्छ्रुतिरादृता ॥ ३ ॥

अर्थः—मी नित्यमुक्त आहें, सत् आहें, अशी दृढ बुद्धि वेदांतवाक्यश्रवणानें जर होणारी नसती तर वेदामध्यें पुन: पुन: त्याचा इतका आदर (उल्लेख) का केला असता, आणि मातेप्रमाणें पुत्रवात्सल्यानें वारंवार तेंच तें का सांगितलें असतें.

सिद्धादेवाहमित्यस्मात् युष्मद्धर्मो निषिध्यते।
रज्ज्वामिवाहिधीर्युक्त्या तत्त्वमित्यादिशासने ॥ ४ ॥

अर्थ —अहं हा अस्मत्प्रत्यय स्वतःसिद्ध आहे, त्याच्यावर

आभासानें आलेले युष्मत्प्रत्ययाचे धर्म तुंव तो इ० वगैरे वेदांत-वाक्यावरून युक्तीनें निवारण करावे, ह्मणजे दोरीवर सापाचा झालेला भास घालविल्याप्रमाणें खाली आत्मतत्त्वच स्पष्ट दिसूं लागेल.

शास्त्रप्रामाण्यतो ज्ञेया धर्मादेरस्तिता यथा ।
विषापोहो यथा ध्यानात् त्रुटिः स्यात्पाप्मनस्तथा ॥५॥

अर्थः—शास्त्रवचनाच्या ( छांदोग्य ६-२-६ ) आधारानें आत्म्याच्या ठिकाणी इतर धर्म नाहींत, केवळ सत्तामात्र आहे, असें समजून घ्यावें. ( गरुडमंत्राचें वगैरे ) ध्यान करून विष उतरावयाचें, त्याप्रमाणें अविद्येच्या योगानें पापाची समजूत धरून बसलेल्या आत्म्याच्या समजुतीचें निवारण करावें

सद्ब्रह्माहं करोमीति प्रत्ययावात्मसाक्षिकौ ।
तयोरज्ञानजस्यैव त्यागो युक्ततरो मतः ॥ ६ ॥

अर्थः-मी ब्रह्म आहें, मी क्रिया करतों, हे दोन्ही अनुभव आत्म्याचे अस्तित्वाची साक्ष देतात, या मानानें ते दोन्ही सारखेच. पण त्या दोन्हीहि अनुभवाचा त्यागच केला पाहिजे.

सदस्मीति प्रमाणोत्था धीरन्या तन्निभोद्भवा ।
प्रत्यक्षादिनिभा वाऽपि बाध्यते दिग्भ्रमादिवत् ॥ ७ ॥

अर्थः-मी सत् आहें अशी बुद्धि प्रमाणसिद्ध असूनहि त्याच्यासारखीच मी कर्ता अशी बुद्धि उत्पन्न होते. आपल्या डोळ्यांनीं ज्या गोष्टी प्रत्यक्ष दिसतात, त्यांत सुद्धां दिशाभूल होऊन विपरीत दिसूं लागतें.

कुरु भोक्षेति यच्छास्त्रं लायबुद्ध्यनुवादि तत् ।
सदस्मीति श्रुतेर्जाता बाध्यतेऽन्या तयैव धीः ॥ ८ ॥

अर्थः–कर्ता ( बृहदारण्यक-३-१० ) भोक्ता ( कठ-३-४ ) वगैरे प्रकारचीं वाक्यें श्रुतीमध्यें आलीं आहेत, तीं लोकांतील ह्मणण्याचा अनुवाद करण्या करितां लिहिलेलीं आहेत. ( त्याजवरून लोक असें ह्मणतात असें किंवा पूर्व पक्ष मांडून दाखविला आहे. ) मी सत् आहें ही बुद्धि मात्र श्रुतिची ( उपदेशपर ) आहे, हिच्या योगानें दुसऱ्या ( अनात्म्य बुद्धीचा नाश करावा.

सदैव त्वमसीत्युक्ते नात्मनो मुक्तता स्थिरा ।
प्रवर्तते प्रसंचक्षा अतो युक्त्याऽनुचिंतयेत् ॥ ९ ॥

अर्थः–तूंच सत् आहेस असें ह्मटलें असतां आत्म्याला स्थिर मोक्ष नाहीं असा तर्क करीत बसणें ही शब्दांची ओढाताण, पुनः तेंच तेंच बोलणें आहे, याकरितां नीट सयुक्तिक रीतीनें त्याची उपपत्ति लावावी.

सकृदुक्तं न गृह्णाति वाक्यार्थज्ञोऽपि यो भवेत् ।
अपेक्षते त एवान्यत् अवोचाम द्वयं हि तत् ॥ १० ॥

अर्थः–एकदां सांगितल्याबरोबर तूं ब्रह्म आहेस या वाक्याचा अर्थ जर समजला नाहीं, आणि त्याला तो समजून घेण्याची इच्छा असेल तर तसें त्याला सांगितलें पाहिजे. हीं दोन्ही ( वाक्यचिंतन आणि युक्तिवाद ) आम्ही सांगितलीं आहेत.

नियोगोऽप्रतिपन्नत्वात्कर्मणा स यथा भवेत् ।
अविरुद्धो भवेत्तावद्यावत्संवेद्यता दृढा ॥ ११ ॥

अर्थः––जोंपर्यंत तें महावाक्याचें ज्ञान नीट मनांत ठसलें नाहीं, तोंपर्यंत त्या वाक्याचा अनुभव नसल्यामुळें त्याचसाठीं कर्मे ( यज्ञयागादि ) केलीं पाहिजेत असें झालें.

चेष्टितं च तथा मिथ्या स्वच्छन्दः प्रतिपद्यते ।
प्रसंख्यानमतः कार्यं यावदात्मानुभूयते ॥ १२ ॥

अर्थः—आत्मा समजायला तो स्वज्ञात आहे म्हणजे दुसऱ्याची त्याला जरूर नाहीं, तर मग शम दम वगैरे नियमाचें कांहीं कारण नाहीं असें होईल. तेव्हां ( तसें न होण्याकरता ) पुनः पुनः तेंच सारणें भाग आहे. आत्म्याचा साक्षात्कार होईपर्यंत तसें केलें पाहिजे.

सदस्मीति च विज्ञानमक्षजो बाधते ध्रुवम् ।
शब्दोत्थं दृढसंस्कारो दोषैश्चाकृष्यते बहिः ॥ १३ ॥

अर्थः—मी सत् आहें ह्याचा अनुभव इंद्रियांच्या प्रत्यक्ष प्रत्ययामुळें येत नाहीं कारण शब्द वगैरे विषयांचा फार दिवसांचा परिणाम दृढ झालेला असतो, आणि द्वेष वगैरे दोषांनीं तो जीव बाहेर विषयाकडे ओढून नेल्याप्रमाणें जातो.

श्रुतानुमानजन्मानौ सामान्यविषयौ यतः ।
प्रत्ययावक्षजोऽवश्यं विशेषार्थो निवारयेत् ॥ १४ ॥

अर्थः—वेद आणि विचार ह्यांच्या पासून येणाऱ्या सामान्य विषयासंबंधाच्या अनुभवावर प्रत्यक्ष इंद्रियांना येणाऱ्या प्रत्ययाच्या विशेषधर्मांचा पगडा बसून तो अनुभव विसरतो.

वाक्यार्थप्रत्ययी कश्चित् निर्दुःखो नोपलभ्यते ।
यदि वा दृश्यते कश्चित् वाक्यार्थश्रुतिमात्रतः ॥ १५ ॥

अर्थः—महावाक्याचा अर्थ समजतांच दुःखापासून सुटला असा कोणी मनुष्य आढळत नाहीं. कोणी क्वचित् तसा असला तर तो वाक्याचा अर्थ ऐकल्याबरोबरच तसा होतो ( मग अर्थ समजण्यांत जास्त काय आहे ? )

निर्दुःखोऽतीतदेहेषु कृतभावोऽनुमीयते ।
चर्या नोऽशास्त्रसंवेद्या स्यादनिष्टं तथा सति ॥ १६ ॥

अर्थः—दुःखांतून सुटल्याचीं तशीं जीं कांहीं उदाहरणें आहेत, त्यांत त्यांनीं मागील जन्मीं तसें साधन संपादन केलें होतें असा तर्क करणें भाग आहे. नाहींतर संन्यास वगैरे घेण्याचा सांगितलेला विधि शास्त्रविहित नाहीं असें होईल, आणि असली गोष्ट होणें चांगलें नाहीं.

सदसीति फलं चोक्त्वा विधेयं साधनं यतः ।
न तदन्यत्प्रसंख्यानात् प्रसिद्धार्थमिहेष्यते ॥ १७ ॥

अर्थः—तूं सत् आहेस हा अनुभव ज्याचें फल येईल असें साधन (कर्म) आवश्यक आहे. असें ठरल्यावर शब्दाची पुनरावृत्ति करणें ( पुनः पुनः शब्द उच्चारून समजून घेणें ) याशिवाय ही गोष्ट साध्य होण्यास दुसरा उपाय दिसत नाहीं.

तस्मादनुभवायैव प्रसंचक्षीत यत्नतः ।
त्यजन्साधनतत्साध्यविरुद्धं शमनादिमान् ॥ १८ ॥

अर्थः—तेव्हां साध्य ( जो आत्मसाक्षात्कार ) आणि त्याच्या विरुद्ध जें साधन ( कर्म करणें ) तें टाकून शमदमादि साधनचतुष्टयसंपन्न पुरुषानें यत्न करून ( त्या महावाक्याचा ) अनुभव येण्यासाठीं प्रसंख्यान ( शब्द पुनरावृत्ति ) करावें असें ( तुमचें म्हणणें.

नैतदेवं रहस्यानां नेति नेत्यवसानतः ।
क्रियासाध्यं पुरा श्राव्यं न मोक्षो नित्यसिद्धतः ॥१९॥

अर्थः—हें बरोबर नाहीं. वेदांतील रहस्य जो उपनिषद्भाग त्यामध्यें हें नाहीं, हें नाहीं असें म्हणून ( दृश्य वस्तूचा ) निषेध

करून शेष रहाणारा तो आत्मा असें दाखविलें आहे ( त्याची उपपत्ति कशी लावणार ? ) क्रियाकर्मांच्या योगानें ज्या काहीं गोष्टी ( स्वर्ग वगैरे ) मिळविण्याच्या त्या ( वेदाच्या ) पूर्वकांडात सांगून टाकल्या शिवाय मोक्ष नित्यसिद्ध असल्यामुळें त्याला काहींच कर्मांची जरूर नाहीं.

पुत्रदुःखं यथाऽध्यस्तं पिताऽदुःखी स्वआत्मनि।
अहंकर्ता तथाऽध्यस्तो नित्यादुःखे स्व आत्मनि ॥२०॥

अर्थ –बापाला स्वतः काहीं दुःख होत नसता, मुलाचें दुःखणें पाहून त्याचा आपल्यावर अध्यास करून तो जसा झुरू लागतो, त्याप्रमाणें संसारदुःखापासून नेहमीं अलिप्त असलेला जीव मी कर्ता असा अभिमान धरून प्रपंचदुःखात पडतो

सोऽध्यासो नेतिनेतीति प्राग्वत्प्रतिषिध्यते।
भूयाऽध्यासविधिः कश्चित् कुतश्चिन्नोपपद्यते ॥ २१ ॥

अर्थ —तसला अध्यास जणू काय झाला आहे असें धरून तें आत्मा नाहीं, तें आत्मा नाहीं, अशा निषेधानें निवारण केला आहे वास्तविक पाहिलें तर अध्यास तरी कोठून कशाचा झाला आहे असें म्हणणेंहि बरोबर नाहीं

आत्मनीह यथाध्यासः प्रतिषेधस्तथैव च।
मलाध्यासनिषेधौ खे क्रियेते च यथा बुधैः ॥२२॥

अर्थ —आकाश मलिन झालें आहे असा अध्यास आणि तें स्वच्छ आहे हा निषेध अज्ञानी लोक करतात त्याप्रमाणें आत्म्यावर विषयादिकांचा अध्यास आणि निषेध समजावा

यत्नश्चेत्प्रतिषिध्येत मोक्षोऽनित्यो भवेत्ध्रुवम्।
अतो नासन्निषेधोऽयं दिव्यमिचयनादिवत् ॥ २३ ॥

अर्थः—संसाराचा अध्यास आत्म्यावर झाला आहे हें ( प्रमाणानें ) सिद्ध झालें तर निश्चित मोक्ष नाशवंत होईल. म्हणून आकाशांत अग्नि वगैरे दिसल्याप्रमाणें हा संसार झालाच नाहीं. असा त्याचा निषेध समजावा.

संभाव्यो गोचरे शब्दः प्रत्ययो वा न चान्यथा ।
न संभाव्यौ तदात्मत्वात् अहंकर्तुस्तथैवच ॥ २४ ॥

अर्थः—परमात्मा हा कशाचाही विषयच होऊं शकत नाहीं, शब्द किंवा त्याचा प्रत्यय हे दोन्ही तेथें नाहींत. कारण अहंकार मानणारा म्हणून जो तुम्ही म्हणता, तोच आत्मा होय.

अहंकर्त्रात्मनि न्यस्तं चैतन्ये कर्तृतादि यत् ।
नेति नेतीति तत्सर्वं साहकर्त्रा निषिध्यते ॥ २५ ॥

अर्थः—चैतन्यरूप आत्म्याच्या ठिकाणीं अभिमानी चित्तानें जें कर्तृत्व वगैरे मानलें तें तें नाहीं, तें नाहीं, याप्रमाणें सांगून श्रुतीनें त्या अभिमानी चित्तासह सर्व वगळून टाकलें.

उपलब्धिः स्वयंज्योतिः दृशिः प्रत्यक् सदाक्रियः ।
साक्षात्सर्वांतरः साक्षी चेता नित्योऽगुणोऽद्वयः॥२६॥

अर्थः—(मग शिल्लक राहिल्याची) प्राप्ति होणारा तो स्वयंप्रकाश, ज्ञानस्वरूप, अपरोक्ष, कर्मरहित, प्रत्यक्ष सर्वांच्या अंतर्यामी राहणारा, सर्वांस चेतना देणारा, त्रिकालाबाधित, गुणरहित, अद्वितीय, असा तो आहे.

सन्निधौ सर्वदा तस्य स्याचदाभोऽभिमानकृत् ।
आत्मात्मीयं द्वयं चातः स्यादहंममगोचरः ॥ २७ ॥

अर्थः—अहंभाव ( चित्र ) आत्म्याच्या जवळ नेहमीं असल्यामुळें त्याला त्या आत्म्याचा प्रकाश मिळून आत्म्यासारखें सामर्थ्य त्याला

येईल, मग एक आत्मा आणि दुसरें आत्म्याचें असें द्वय उत्पन्न होऊन तें अहं आणि मम ह्या शब्दांनी दाखविलें जाईल-

जातिकर्मादिमत्त्वाद्धि तस्मिन् शब्दास्त्वहंकृति ।
न कश्चिद्वर्तते शब्दः तदाभावात्त्व आत्मनि ॥ २८ ॥

अर्थः--पण त्या अहंभावाच्या ठिकाणींच जातिकर्म वगैरे शब्दांची जाणीव होणार, आत्म्याचे ठिकाणी हे धर्म कांहींच नसल्यामुळें कोणताहि शब्द तेथें लागत नाहीं.

आभासो यत्र तत्रैव शब्दा प्रत्यग्दृशि स्थिताः ।
लक्षयेयुर्न साक्षात्तं अभिदध्युः कथंचन ॥ २९ ॥

अर्थः--ज्या ( अंतःकरणाच्या ) ठिकाणीं आभास झाला त्या ठिकाणीं शब्द वगैरे रहाणार, प्रत्यक्षासारख्या दिसणाऱ्या आत्म्याला लक्षणेनें ते दाखवितील, पण प्रत्यक्ष त्याला विशेषण लागेल असा बोध होणार नाहीं.

न ह्यजात्यादिमान् कश्चित् अर्थः शब्दैर्निरूप्यते ॥३०॥

अर्थः--ज्याला जाति वगैरे धर्म नाहींत अशी वस्तू शब्दांनीं सांगतां येत नाहीं.

आत्माभासो यथाहंकृत् आत्मशब्दैस्तथोच्यते ।
उल्मुकादौ यथाग्न्यर्थाः परार्थत्वान्न चाञ्जसा॥ ३१ ॥

अर्थः--आत्म्याचा भास झालेला अहंभाव आत्मा ह्या शब्दांनी दाखविला जातो--कोलीत वगैरे जळत आहे ह्या वाक्यांत अग्नीचा जळण्याचा धर्म कोलतीवर लावला जातो. त्याप्रमाणें ह्या जडाच्या ठिकाणीं आत्म्याचे धर्म आले हें बरोबरच झालें.

मुखादन्यो मुखाभासो यथादर्शानुकारतः ।
आभासान्मुखमप्येवं आदर्शानुवर्तनात् ॥ ३२ ॥

अर्थः–आरसा असेल त्याप्रमाणें त्यांत दिसलेलें तोंडाचें प्रतिबिंब तोंडाहून निराळें असतें, त्याप्रमाणेंच आरशावरून असें दिसतें कीं प्रतिबिंबाहून बिंब ( मुख ) निराळेंच आहे.

अहंकृत्यात्मनिर्भासो मुखाभासवदिष्यते ।
मुखवत्स्मृत आत्माऽन्योऽविविक्तौ तौ तथैव च ॥३३॥

अर्थः–आरशांत तोंड दिसल्याप्रमाणें अंतःकरणाच्या ठिकाणीं अहंभाव हें आत्म्याचें प्रतिबिंब पडतें. पण त्या प्रतिबिंबाहून तोंड जसें निराळें त्याप्रमाणें आत्मा त्या अंतःकरणाहून निराळा आहे. ह्याप्रमाणें वाटतें खरें, पण वास्तविक पहातां, तीं दोन्ही एकमेकांहून निराळीं नाहींत. मुख नसतें तर प्रतिबिंब नाहीं. त्याप्रमाणें आत्म्याचा आभास हा आत्म्याहून कांहीं निराळा नाहींच.

संसारी च स इत्येक आभासो यस्त्वहंकृतिः ।
वस्तु छाया स्मृतेरन्यत् माधुर्यादि च कारणम् ॥३४॥

अर्थः–हा आभास-हें अभिमानी अंतःकरणांतलें मीतींबद्दे हेंच कोणाच्या मतानें संसार करतें. वस्तूसारखीच तिची छाया असें स्मृतिकार सांगतात, शिवाय गोडी वगैरेचा अनुभव पदार्थाहून निराळा येतोना!

चैकदेशो विकारोवा तदाभासाश्रयः परे ।
अहंकर्तैव संसारी स्वतंत्र इति केचन ॥ ३५ ॥

अर्थः–ज्ञानस्वरूप आत्म्याचा एक अंश तो संसारी ( जीव ) असें कोणी ह्मणतात, कोणी तो त्याचा विकार ह्मणतात, चैतन्याभास झालेला अहंकार हा संसारी असें कोणी ह्मणतात. सारांश कोणाचेंहि मत घेतलें तरी संसारी ( जीव ) स्वतंत्र आहे असें कोणी ह्मणत नाहीं.

अहंकारादिसंतानः संसारी नान्वयी क्वचित् ।
इत्येवं सौगता आहुः तत्र न्यायो विचार्यताम् ॥३६॥

अर्थः—अहंकार वगैरे ज्ञान एकसारखें ज्याला होतें तोच संसारी, तो कोणी दुसऱ्यापासून भासलेला वगैरे नाहीं असें सौगतांचें मत आहे, त्याचा मात्र नीट विचार करा.

संसारिणां कथा त्वास्तां मकृतं त्वधुनोच्यते ।
मुखाभासो य आदर्शे धर्मो नान्यतरस्य सः ॥ ३७ ॥

अर्थः—ही संसारीबद्दल गोष्ट संसारीवद्दल निघाली, ती सध्यां राहूं द्या. आपला आभासाचा विषय चालूं होता, तोच पुढें सांगतों.

द्वयोरेकस्य चेद्धर्मो वियुक्तेऽन्यतरे भवेत् । मुखेन व्यपदेशोऽस्य मुखस्यैवेति चेन्मतम् । नादर्शनानुविधानाच्च मुखे सत्यविभावतः ॥ ३८ ॥

अर्थः—आरशांत जें प्रतिबिंब दिसतें तें कोणाचें ? दोहोंपैकी कशाचें नव्हे. ( तोंड आणि आरसा या ) दोहोंपैकी एकाचा तो धर्म असता तर तो एक असतांना ज्याचा धर्म त्याच्या ठिकाणीं तो दिसावा. तोंड पहात नसलें तर प्रतिबिंब आरशांत दिसत नाहीं, यावरून तें तोंडाचा धर्म नाहीं. आहे असें म्हणणें असेल तर एक आरसा असल्याशिवाय तें दिसत नाहीं आणि दुसरें आरसा नसतांना तें मुखावर कोठें दिसत नाहीं.

द्वयोरेवेति चेतन्न द्वयोरेवाप्यदर्शनात् ।
अदृश्यस्य सतो दृष्टिः स्याद्राहोश्चंद्रसूर्ययोः ॥ ३९ ॥

अर्थः—तो धर्म ( तोंड व आरसा या ) दोघांचा आहे असें म्हणाल तर दोन्हींचा संयोग नसतांना तें प्रतिबिंब दिसत नाहीं. बरें तर जसा राहू अदृश्य असून चंद्र आणि सूर्य याच्या ठिकाणीं तो दिसतो त्याप्रमाणें कोणा तरी सत् वस्तूचें हें रूप असेल- ( ही शंका. )

राहोः प्रागेव वस्तुत्वं सिद्धं शास्त्रप्रमाणतः ।
छायापक्षे त्ववस्तुत्वं तस्य स्यात्पूर्वयुक्तितः ॥ ४० ॥

अर्थः—ज्योतिःशास्त्र, पुराण इत्यादि ठिकाणीं राहू आहे असें धरलेलें आहे, तेव्हां राहू निराळी वस्तू आहे असें ठरलें; राहू नसून ग्रहण लागण्याचें कारण पृथ्वी व चंद्र यांची छाया आहे असें कोणी ह्मणतात, मग त्यांत राहू नाहींच असें होतें. तेथें मग ३७ श्लोकांत सांगितलेलाच सिद्धांत मांडावा लागतो.

छायाक्रांतेर्निषेधोऽयं न तु वस्तुत्वसाधकः ।
न ह्यर्थान्तरनिष्ठं सत् वाक्यमर्थान्तरं वदेत् ॥ ४१ ॥

अर्थः—छायेनें आस होत नाहीं असें ह्मटल्यानें छाया ही वस्तु आहे असें ठरत नाहीं. एका ठिकाणीं अर्थबोध करणारें वाक्य दुसऱ्या ठिकाणीं निराळा कांहीं अर्थ दाखवील असें होणार नाहीं.

माधुर्यादि च यत्कार्यं उष्णद्रव्याद्यसेवनात् ।
छायाया न स्वरूपत्वात् अपामेव च दर्शनात् ॥ ४२ ॥

अर्थः—सावलींत बसलेल्या मनुष्याला पाणी गोड लागतें, तें त्या वेळीं कडत पदार्थ घेतला नसल्यानें वाटतें. ( डोंगराच्या ) सावलींत गोडी नसते, ती पाण्यांत असते.

आत्माभासाश्रयाश्चैवं मुखाभासाश्रया यथा ।
गम्यते शास्त्रयुक्तिभ्यां आभासासत्वमेव च ॥ ४३ ॥

अर्थः—तेव्हां मुख, त्याचें प्रतिबिंब आणि ( त्याचा आश्रय ) आरसा हीं जशीं तीन, त्याप्रमाणेंच आत्मा ( त्याचा आभास ) जीव, आणि ( त्याचा आश्रय ) अंतःकरण हीं वास्तविक निराळीं नसून निराळीं वाटतात. ह्मणून शास्त्रांतील वाक्यांनीं आणि युक्तीनें आभास खोटा असें ठरलें.

न दृशेरविकारित्वात् आभासस्याप्यवस्तुतः ।
नाचितित्वादहं कर्तुः कस्य संसारिता भवेत् ॥ ४४ ॥

अर्थः—आत्मा ( ज्ञानी ) विकार पावत नाहीं, आभास तर खोटा ठरला, अंतःकरण तें तर जड पडलें, तेव्हां संसार कोणावर लादावयाचा !

अविद्यामात्र एवातः संसारोऽस्त्वविवेकतः ।
कूटस्थेनात्मना नित्यमात्मवानात्मनीव सः ॥ ४५ ॥

अर्थः—तेव्हां संसार म्हणजे केवळ अविद्येचें कार्य, हो अविचाराचा परिणाम आहे. आत्मा कूटस्थ, नित्य व आपल्या आत्मरूपानें आपल्या ठिकाणीं रहाणारा आहे.

रज्जुसर्पो यथा रज्ज्वा सात्मकः प्राग्विवेकतः ।
अवस्तु सन्नपि ह्येव कूटस्थेनात्मना तथा ॥ ४६ ॥

अर्थः—दोरीचा वाटलेला साप विचार करीपर्यंत खराच आहे असा वाटतो, त्याप्रमाणें संसार खोटा असून कूटस्थ आत्म्यावर तो खरोखरच आहे असा भास होतो.

आत्माभासाश्रयश्चात्मा प्रत्ययैः स्वैर्विकारवान् ।
सुखीदुःखी च संसारी नित्य एवेति केचन ॥ ४७ ॥

अर्थः—आत्म्याच्या आभासाला आश्रय आत्माच आहे. तो आपल्या प्रत्ययामुळें विकार पावतो, सुखदुःख भोगतो, संसारी होतो, हें नित्य आहे असें कोणी प्रतिपादन करतात.

आत्माभासापरिज्ञानात् याथात्म्येन विमोहिताः ।
अहंकर्तात्मेति मन्यन्ते ते निरागमाः ॥ ४८ ॥

अर्थः—आत्मा आणि त्याचा आभास यांचें खरें ज्ञान न झा-

त्यामुळें मूढ होऊन अंतःकरणप्रतिबिंबालाच जे आत्मा ह्मणतात, ते वेदांतील वचनें पहात नाहींत ( असेंच ह्मटलें पाहिजे. )

संसारो वस्तु संस्तेषां कर्तृभोक्तृत्वलक्षणः ।
आत्माभासाश्रयाज्ञानात् संसरन्त्यविवेकतः ॥ ४९ ॥

अर्थः—आत्मा, आभास ( जीव ) आणि आश्रय ( चित्त ) ह्यांचें ज्ञान न झाल्यामुळें अविचारानें ते संसारांत पडतात; त्यांच्या मतानें मी करतों, मी भोगतों, ह्याप्रकारचा संसार खराच आहे.

चैतन्याभासता बुद्धेरात्मनस्तत्स्वरूपता ।
स्याच्चेत्तं ज्ञानशब्दैश्च वेदः शास्तीति युज्यते ॥ ५० ॥

अर्थः—बुद्धीच्या ठिकाणीं चैतन्याचा भास होऊन तीच आत्मस्वरूपानें जर भासूं लागली तर आत्मा ज्ञानपूर्ण, सत् आणि आनंदस्वरूप आहे असें वर्णन जें वेदांत केलें तें बरोबर जुळतें.

प्रकृतिप्रत्ययार्थौ यौ भिन्नावेकाश्रयौ यथा ।
करोति गच्छतीत्यादौ दृष्टौ लोकप्रसिद्धितः ॥ ५१ ॥

अर्थः—प्रकृति ( क्रिया ) आणि प्रत्ययार्थ ( कर्ता ) हे दोन निरनिराळे असून एकाच आश्रयावर रहातात; तो करतो, तो जातो, ह्या दोन क्रिया निराळ्या, पण आश्रय एक हें लोकांना ठाऊकच आहे.

नानयोर्द्व्याश्रयत्वं च लोके दृष्टं स्मृतौ तथा ।
जानात्यर्थेषु को हेतुः द्व्याश्रयत्वे निगद्यताम् ॥ ५२ ॥

अर्थः—हे प्रकृति प्रत्यय निरनिराळ्या दोन वस्तूंवर रहातात, असा लोकांचा अनुभव नाहीं. स्मृतींत ( व्याकरणांत ) हि तसा आधार नाहीं. मग जाणिवेच्या वेळीं मात्र बुद्धि आणि आत्मा निरनिराळे समजण्यांत फायदा कोणचा?

आत्माभासस्तु तिङ्वाच्यो धात्वर्थश्च धियः क्रिया ।
उभयं चाविवेकेन जानातीत्युच्यते मृषा ॥ ५३ ॥

अर्थः—आत्म्याचा भास हा प्रत्ययावरून समजतो आणि बुद्धी-च्याकडून होणाऱ्या क्रिया ( वृत्ति ) त्या त्या क्रियेच्या अर्थावरून ओळखतां येतात. दोन्ही ( आत्माभास आणि बुद्धि ) अज्ञानामुळें जाणीव ( ज्ञान ) ग्रहण करतात अशी खोटी समज होते.

न बुद्धेरवबोधोऽस्ति नात्मनो विद्यते क्रिया ।
अतो नान्यतरस्यापि जानातीति च युज्यते ॥ ५४ ॥

अर्थः—बुद्धीच्या ठिकाणीं ( ज्ञानरूप ) चैतन्य येणार कसें, त्याप्रमाणेंच आत्म्याच्या हातून कर्म घडणार कसें? तेव्हां दोघांच्या-कडेहि जाणीव जाऊं शकत नाहीं.

नाप्यतो भावशब्देन ज्ञप्तिरित्यपि युज्यते ।
न ह्यात्मा विक्रियामात्रो नित्य आत्मेति शासनात् ५५

अर्थः—त्या ( आत्म्याच्या ) ठिकाणीं जाणणेपणा आहे अशा तऱ्हेनेंहि ज्ञानशब्दाचा प्रयोग तेथें होत नाहीं, आत्मा नित्य आहे असें श्रुति सांगते, तेव्हां त्याला कोणत्याच प्रकारानें क्रियेचा संबंध येणार नाहीं.

न बुद्धेर्बुद्धिवाच्यत्वं करणं न ह्यकर्तृकम् ।
नापि ज्ञायत इत्येवं कर्मशब्दैर्निरूप्यते ॥ ५६ ॥

अर्थः—ज्यानें बोध होतो ती बुद्धि असें म्हटलें तरी ती क्रिया चित्ताकडेच जाते, आत्म्याकडे येत नाहीं. बुद्धि हें ज्ञानाचें साधन ( हत्यार ) मानलें, तर कर्त्याशिवाय नुसतें साधन असत नाहीं. त्याप्रमाणेंच जाणला जातो वगैरे क्रियावाचक शब्दांनीं आत्म्याचा बोध होत नाहीं.

न येषामेक एवात्मा निर्दुःखो अविक्रियः सदा ।
तेषां स्याच्छब्दवाच्यत्वं ज्ञेयत्वं चात्मनः सदा ॥५७॥

**अर्थः**—ज्यांच्या मताप्रमाणें आत्मा अद्वितीय, दुःखरहित, कर्मरहित आहे, त्यांच्या मताप्रमाणें त्याला शब्दबोध, आणि जाणला जाणें वगैरे क्रिया लागणार नाहींत.

यदाहंकर्तृरात्मत्वं तदा शब्दार्थमुख्यता ।
नाशनायादिमत्त्वात्तु श्रुतौ तस्यात्मतेष्यते ॥ ५८ ॥

**अर्थः**—जेव्हां अहंकर्त्या ( चित्त ) ला आत्मा ह्मणाल तेव्हां त्याचा बोध शब्दांनीं करतां येईल. पण त्या अभिमानी जीवाला खाणें पिणें वगैरे लागत असल्यामुळें त्याच्याकडे आत्मपणा नाहीं असें श्रुति सांगते.

हन्त तर्हि न मुख्यार्थो नापि गौणः कथंचन ।
जानातीत्यादिशब्दस्य गतिर्वाच्या तथापि तु ॥५९॥

**अर्थः**—जाणणें वगैरे शब्दांचा मुख्यार्थहि लागत नाहीं, गौण अर्थ तर नाहींच नाहीं, मग शब्दांची स्थिति काय समजावी ?

शब्दानामयथार्थत्वे वेदस्याप्यप्रमाणता ।
साच नेष्टा ततो ग्राह्या गतिरस्य प्रसिद्धितः ॥ ६० ॥

**अर्थः**—शब्दांचा जर काहींच अर्थ होणार नाहीं, तर मग वेद ( शब्दरूप असल्यामुळें ) खोटे ( निरर्थक ) ठरतील. हें तर असें व्हायला नको, तेव्हां शब्दांचा जो प्रसिद्ध ( अर्थबोधाचा ) व्यापार तो कबूल केला पाहिजे.

प्रसिद्धिर्मूढलोकस्य यदि ग्राह्या निरात्मता ।
लोकायतिकसिद्धांतः सा चानिष्टा प्रसज्यते ॥६१॥

**अर्थः**—प्रसिद्ध अर्थ कोणाचा प्रमाण मानावयाचा ? मूर्ख लो·

कोंचा घ्यायचा असला तर ( निरात्मवादी ) लोकायतिकाच्या म्हण॰ण्याप्रमाणें आत्मा नाहीं असें म्हणा, असला सिद्धांत तुम्हाला कबूल नाहीं.

अभियुक्तप्रसिद्धिश्चेत्पूर्ववत् दुर्विवेकता ।
गतिशून्यं न वेदोऽयं प्रमाणं स वदत्वुत ॥ ६२ ॥

अर्थः— विद्वान् लोकांनीं केलेला अर्थ धरावयाचा तर मग पूर्वीप्रमाणेंच तो ( आत्मा ) नीट लवकर समजत नाहीं असें हो॰ईल. तसें होत नाहीं. तसें असतें तर आपली गति नाहीं हेंच ज्ञान असें वेदानें सांगितलें असतें.

आदर्शे मुखसामान्यं मुखस्येष्टं हि मानवैः ।
मुखस्य प्रतिबिंबो हि मुखाकारेण दृश्यते ॥ ६३ ॥

अर्थः—आरशांत जें रूप पाहिलें तसेंच आपलें तोंड असेंक असें लोक मानतात; त्याप्रमाणेंच तोंडाचें प्रतिबिंब ( व आरशांत पडलें तें ) तोंडाच्या आकाराचेंच आहे असें गृहीत धरतात.

यत्र यस्यावभासस्तु तयोरेवाविवेकतः ।
जानातीति क्रिया सर्वो लोको वक्ति स्वभावतः ॥६४॥

अर्थः—ज्याचा भास होतो आणि जेथें होतो, त्या दोहोंची निरनिराळी समज न पडल्यामुळें जाणीव ही क्रिया सर्व लोक स्वा॰भाविकपणें लावूं लागतात.

बुद्धेः कर्तृत्वमध्यस्य जानातीति च सच्यते ।
तथा चैतन्यमध्यस्य ज्ञत्वं बुद्धिरिहोच्यते ॥ ६५ ॥

अर्थः—बुद्धीचा कर्तेपणा आत्म्यावर लादून आत्मा जाणतो म्हणून जाणीवरूप आहे असें म्हणतात, आणि बुद्धीवर चैतन्य कल्पून बुद्धीकडे जाणीव देतात.

स्वरूपं चात्मनो ज्ञानं नित्यं ज्योतिः श्रुतेर्यतः ।
न बुध्या क्रियते तस्माज्ञात्मनान्येन वा सदा ॥ ६६ ॥

अर्थः—ज्ञान हें आत्म्याचें स्वरूप आहे, तो नित्य प्रकाशमान आहे असें वेद सांगतात, तेव्हां त्याच्या ठिकाणीं जाणीव बुद्धीनें किंवा दुसरी कशानें आणलेली अशी नसते.

देहेऽहंमत्ययो यद्वज्जानातीति च लौकिकाः ।
वदंति ज्ञानकर्तृत्वं तद्वद्बुद्देस्तथात्मनः ॥ ६७ ॥

अर्थः—साधारण लोक देहालाच मी ही संज्ञा लावून मग त्याच्याकडे जाणण्याचा धर्म लावतात, त्याप्रमाणें बुद्धीवर ज्ञान आणि आत्म्याकडे कर्तेपणा लावतात.

बौद्धैस्तु मत्ययैरेवं क्रियमाणैश्च चिन्निभैः ।
मोहिताः क्रियते ज्ञानमित्याहुस्तार्किका जनाः ॥६८॥

अर्थ—चैतन्याच्या प्रतिबिंबामुळें चैतन्यासारख्या वाटणाऱ्या बुद्धीच्या निरनिराळ्या वृत्तीमुळें भूल पडून तार्किक मंडळी ह्मणतात कीं ज्ञान उत्पन्न होतें.

तस्माज्ज्ञाभासबुद्धीनामविवेकात्प्रवर्तिताः ।
जानातीत्यादिशब्दश्च मत्ययो या च तत्स्मृतिः ॥६९॥

अर्थः—ह्यावरून जाणीव वगैरे अर्थाचे शब्द, त्यांचा अनुभव आणि त्यांचें स्मरण हीं तिन्ही उत्पन्न होण्याला मूळ आत्म्याचें प्रतिबिंब आणि बुद्धि यांचें ऐक्य मानलें तें होय.

आदर्शानुविधायित्वं छायाया अस्यते मुखे ।
बुद्धिधर्मानुकारित्वं ज्ञाभासस्य तथेष्यते ॥ ७० ॥

अर्थः—आरशांतलें प्रतिबिंब मुख आहे असें मानल्याप्रमाणेंच आत्म्यावर बुद्धीचे सर्व धर्म लादले जातात.

बुद्धेस्तु प्रत्ययास्तस्मादात्माभासेन दीपिताः ।
ग्राहका इव भासंते दहंतीवोल्मुकादयः ॥ ७१ ॥

अर्थः—त्यामुळें बुद्धीच्या सर्व वृत्ति आत्म्याच्या प्रतिबिंबानें प्रकाशमान होऊन चैतन्ययुक्त वाटतात. उदाहरण, अग्नीच्या गुणाचा आरोप करून कोलीत जाळतें असें आपण ह्मणतों.

स्वयमेवावभास्यंते ग्राहकाः स्वयमेव च ।
इत्येवं ग्राहकास्तित्वं प्रतिषेधन्ति सौगताः ॥ ७२ ॥

अर्थः—ह्या बुद्धीच्या वृत्ति स्वतःच प्रकाशमान आहेत व त्यांना स्वतःच ज्ञान आहे असें ह्मणून त्याचें ज्ञान असणारा दुसरा कोणी नाहीं असें सौगत ह्मणतात,

यद्येवं नान्यदस्यास्ते किं तद्वारणमुच्यताम् ।
भावाभावौ हि तेषां यौ नान्यग्राह्यौ सता यदि ॥७३॥

अर्थः—त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें ह्या वृत्तीला जाणणारा दुसरा कोणी नाहीं त्याचें खंडन कसें करणार ? त्या वृत्तीचें उत्पन्न होणें आणि नाश पावणें ह्यांना जाणणारा जर सत् ( आत्मा ) नाहीं तर मग दुसरा कोणी आहे काय ?

अन्वयी ग्राहकस्तेषामित्येतदपि तत्समम् ।
अचितित्वस्य तुल्यत्वादन्यस्मिन्ग्राहके सति ॥ ७४ ॥

अर्थः—तसा दुसरा कोणी जाणणारा असेल तर तो त्या वृत्तीच्या बरोबर असला पाहिजे आणि तोहि त्यांच्याप्रमाणेंच जड ठरेल.

अध्यक्षस्य समीपे तु सिद्धिः स्यादितिचेन्मतम् ।
नाध्यक्षेऽनुपकारित्वादन्यत्रापि प्रसंगतः ॥ ७५ ॥

अर्थः—साक्षी समक्ष असल्यामुळें तसा अनुभव येतो असें ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण साक्षी कोणालाच कांहीं

( मदत वगैरे ) करीत नाहीं, तेव्हां इतर वस्तूकडे सुद्धां तसाच ( अनुभवाचा ) समय येईल.

अर्थी दुःखीच यः श्रोता सत्वध्यक्षोऽथ वेतरः ।
अध्यक्षस्य च दुःखित्वमर्थित्वं च न ते मतम् ॥ ७६ ॥

अर्थः—ज्याला मोक्ष पाहिजे, जो दुःखाचा अनुभव घेतो असा शिष्य तोच स्वतः साक्षी किंवा दुसरा कोणी असतो ? तुमच्या मताप्रमाणें साक्षी दुःखी किंवा कांहीं मागणारा असत नाहीं.

कर्ताऽध्यक्षः सदस्मीति नैव सद्ग्रहमर्हति ।
सदेवासीति मिथ्योक्तिः श्रुतेरपि न युज्यते ॥ ७७ ॥

अर्थः—साक्षीला कर्ता वगैरे प्रकारचा विकारी समजल्यावर मग तो सत् आहे असा अनुभव येणार नाहीं. तशा स्थितींत तो मी सत् आहे म्हणूं लागेल तर तें बोलणें खोटें. शिवाय तसें श्रुतीमध्यें प्रमाण नाहीं.

अविविच्योभयं वक्ति श्रुतिश्चेत् स्याद् ग्रहस्तथा ।
अस्मद्यस्तु विविच्यैव त्वमेवेति वदेयदि ॥
प्रत्ययान्वयिनिष्ठत्वमुक्तदोषः प्रसज्यते ॥ ७८ ॥

अर्थः—आत्मा आणि अहंकार ( अंतःकरण ) यांचा भेद न करतां श्रुति बोलत आहे आणि त्यामुळें सत् याचा भास होतो. अस्मत्‌पासून त्वं याचा निराळा बोध करून प्रत्ययाच्या ( अहंकाराच्या ) ठिकाणीं त्वं याचा अनुभव धरला तर श्रुति खोटें बोलते असल्या प्रकारचा वर सांगितलेला दोष येईल.

त्वमित्यध्यक्षनिष्ठश्चेदहमध्यक्षयोः कथम् ।
संबंधो वाच्य एवात्र येन त्वमिति लक्षयेत् ॥ ७९ ॥

अर्थः—त्वं हें पद अध्यक्षाच्या ठिकाणींच लावलें ...

अहं आणि अध्यक्ष यांचा संबंध व्हायला पाहिजे. तो कसा निघणार, तो निघाल्याशिवाय त्वं या पदाला संबंध लक्षणेनें लागणार नाहीं.

द्रष्टृदृश्यत्वसंबंधो ह्यध्यक्षेऽक्रिये कथम् ॥ ८० ॥

अर्थः—पहाणारा आणि पहाणें यांचा संबंध अध्यक्ष अविकारी असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कसा संभवेल.

अक्रियत्वेऽपि तादात्म्यमध्यक्षस्य भवेन्नहि ।
आत्माध्यक्षो ममास्मीति संबंधाग्रहणेन धीः ॥ ८१ ॥

अर्थः—अध्यक्ष अविकारी असूनहि त्याचें तादात्म्य होणें म्हणाल तर माझा आत्मा अध्यक्ष आहे असल्या संबंधाच्या ठिकाणीं तादात्म्यबुद्धि होणें शक्य नाहीं.

संबंधग्रहणं शास्त्रादिति चेन्मन्यसे नहि ।
पूर्वोक्ताः स्युस्त्रिधा दोषा ग्रहो वा स्यान्ममेति च॥८२॥

अर्थः—छांदोग्य ( ३-४ ) वचन धरून अंतःकरण आणि आत्मा यांचा संबंध सांगू लागशील तर तें बरोबर नाहीं. त्यामुळें पूर्वी सांगितलेले ( अहंकार जड आहे, त्याला ज्ञान नाहीं आणि अध्यक्ष निर्विकारी हे ) तीन दोष येतील. शिवाय, त्यामुळें माझा अध्यक्ष असा प्रकार झालें तर संबंध येईल ( तादात्म्य कोठें सिद्ध होतें ! )

अहन्धिर्दशिरूपेण भाति बुद्धिर्यदा तदा ।
अन्यथा अपि तस्याः स्युः तप्तायोविस्फुलिंगवत् ॥८३॥

अर्थः—जडबुद्धि चैतन्ययुक्त वाटूं लागली म्हणजे तिच्या वृत्तीसुद्धां चैतन्यरूप दिसणार. उदाहरणार्थ तापलेल्या लोखंडापासून निघालेल्या ठिणग्या अग्निकणासारख्या वाटतात.

आभासस्तदभावश्च दृशेः सीम्नो न चान्यथा ।
लोकस्य युक्तितः स्यातां तद्ग्रहश्च तथा सति ॥८४॥

अर्थः—लोकांचें ज्ञान मर्यादित असतें तेव्हां आत्म्याचा आभास आणि त्याचा अभाव युक्तीनें सिद्ध करतात, आणि त्यावरूनच बुद्धीला मीच आत्मा असें वाटतें, ह्याला दुसरा मार्ग नाहीं.

नन्वेवं दृशि संक्रान्तिरयःपिण्डेऽग्निवत् भवेत् ।
मुखाभासवदित्येतदादर्शे तन्निराकृतम् ॥ ८५ ॥

अर्थः—असें ह्मणाल तर लोखंडाच्या गोळ्यांत अग्नि शिरला ह्मणण्याप्रमाणें बुद्धीच्या ठिकाणीं आत्मा दिसतो असें होईल. आरशांत दिसणारें तोंडाचें प्रतिबिंब खोटें हें ( मागेंच ) सिद्ध करून दाखविलें आहे.

कृष्णायोलोहिताभासमित्येतद् दृष्टमुच्यते ।
दृष्टदार्ष्टान्ततुल्यत्वं न तु सर्वात्मना क्वचित् ॥ ८६ ॥

अर्थः—काळें लोखंड तांबडें दिसतें तसें बुद्धीवर चैतन्य येतें ह्मणायला लागाल तर तसें नाहीं. दृष्टांत आणि ज्याला दृष्टांत लावायचा तो ( दार्ष्टांत–सिद्धांत ) अगदीं सर्व प्रकारांनीं सारखे असत नाहींत.

तथैव चेतनाभासं चित्तं चैतन्यवद्भवेत् ।
मुखाभासो यथादर्शे आभासश्चोदितो मृषा ॥ ८७ ॥

अर्थः—आरशांत जसें तोंडाचें प्रतिबिंब दिसतें त्याप्रमाणें चैतन्याचें प्रतिबिंब पडलेलें चित्त चैतन्याप्रमाणें भासेल. पण आभास ( उपाधीवर अवलंबून असल्यामुळें ) तो खोटा हें सांगितलेंच आहे.

चित्तं चेतनमित्येतच्छास्त्रयुक्तिविवर्जितम् ।
देहस्यापि प्रसंगः स्याच्चक्षुरादेस्तथैव च ॥ ८८ ॥

अर्थः—चित्त चैतन्ययुक्त आहे हें म्हणणें शास्त्राला आणि युक्तीला धरून नाहीं त्याप्रमाणें देह, डोळे वगैरे सर्व इंद्रियें तशीच ( चेतनायुक्त ) होऊं लागतील.

तदप्यस्त्विति चेन्न लोकायतिकसंगते ।
न च धीर्देहिरस्मीति यथाभासो न चेतसि ॥ ८९ ॥

अर्थ —होईना असें म्हणशील तर तसें नाहीं. त्यामुळें लोकायतिकाप्रमाणें वेदबाह्य मत होईल चित्ताच्या ठिकाणी आत्म्याचा आभास झालाच नसता तर मी ब्रह्म आहें अशी बुद्धि उत्पन्न झाली नसती

सदस्मीतिधियोऽभावे व्यर्थं स्यात्तत्त्वमस्यपि ।
युष्मदस्मद्विभागज्ञे स्यादर्थवदिदं वचः ॥ ९० ॥

अर्थ —मी सत् आहें असें जर ठरत नसेल तर तें तू आहेस असें जें महावाक्य त्याचा उपयोग कांहींच नाहीं मी आणि तू याचा भेद समजणाऱ्या मनुष्यालाच त्या ( महा ) वाक्याचा अर्थ समजणार ( इतरांना तसा अधिकारच नाहीं )

ममेदं प्रत्ययौ ज्ञेयौ युष्मन्येवं न संशयः ।
अहमित्यस्मदि स्यात् अयमस्मीति चोभयोः ॥९१॥

अर्थ —मम ( माझें ) आणि इदं ( हें ) हे दोन्ही प्रत्यय युष्मत् म्हणजे अनात्म्याच्या ठिकाणीच लागतात, यांत शंका नाहीं, अहं हा प्रत्यय आभासामुळें अस्मत् म्हणजे आत्म्याला लागतो, आणि अयं ( हा ) हा प्रत्यय ( मी हा, देह वगैरे हे, आहे ) आत्मा आणि अनात्मा या दोहींकडे लागतो.

अन्योन्यापेक्षया तेषां प्रधानगुणतेष्यते ।
विशेषणविशेष्यत्वं तथा ग्राह्यं हि युक्तितः ॥ ९२ ॥

अर्थः—त्यांना एकमेकांची जरूर लागते व त्यामुळें एक प्रधान आणि दुसरें गुण असें म्हणतात; तेंच एक विशेषण आणि दुसरें विशेष्य असें युक्तीच्या साहाय्यानें समजून घ्यावें.

ममेदं द्वयमप्येतन्मध्यमस्य विशेषणम् ।
धनी गोमान्यथा तद्वद्देहोऽहंकर्तुरेवच ॥ ९३ ॥

अर्थः—मागें श्लोकामध्यें सांगितलेला जो अस्मत् प्रत्यय आत्मा त्याला मम ( माझें ) आणि इदं ( हें ) हीं दोन्ही विशेषणें ( गुणदर्शक ) होतात. पैसेवाला गाईवाला मी, ह्यांना पैसा, गाई वगैरे मीचीं विशेषणें ( गुण दाखविणारीं ) झालीं, त्याप्रमाणें हा स्थूल देह अहं अभिमानी आत्म्याचा आहे.

बुद्ध्यारूढं सदा सर्वं साहंकर्ताच साक्षिणः ।
तस्मात्सर्वावभासो ज्ञः किंचिदप्यस्पृशन्सदा ॥ ९४ ॥

अर्थः—बुद्धीच्या ठिकाणीं जी जी वृत्ति उठेल ती चैतन्याभास मनासुद्धा साक्षी जो केवळ आत्मा त्याचीं विशेषणें (गुण) दाखविणारीं होते. त्यावरून सर्वांना प्रकाश करणारा ज्ञानस्वरूप आत्मा कशालाहि लिप्त न होतां रहातो.

प्रतिलोममिदं सर्वं यथोक्तं लोकबुद्धितः ।
अविवेकधियामस्ति नास्ति सर्वं विवेकिनाम् ॥ ९५ ॥

अर्थः—लोकाच्या म्हणण्याप्रमाणें होवें म्हणून जें सांगितलें तें सर्व अनात्मा आहे. तें आहे असें विचार न करणाराला वाटतें, विचार करणाराला त्यातलें काहींच नाहीं.

अन्वयव्यतिरेकौहि पदार्थस्य पदस्यच ।
स्यादेतदहमित्यत्र युक्तिरेवावधारणे ॥ ९६ ॥

अर्थः--पदार्थ ( आत्मा ) नेहमीं साक्षी आहे, तो कधींही दृश्य नाहीं, जें अहंकारादि दृश्य तें नेहमीं विशेषण असतें, हा पदार्थाचा अन्वय व्यतिरेक, आत्मा--चैतन्य, ज्ञानरूप, सत आहे, कर्ता, भोक्ता वगैरे क्रिया त्याला लागत नाहीं, हा पदाचा अन्वय व्यतिरेक, हें समजून घेण्याला युक्तिशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

नाद्राक्षमहमित्यस्मिन् सुषुप्तेऽन्यन्मनागपि ।
न वारयति दृष्टिं स्वां मत्ययं तु निषेधति ॥ ९७ ॥

अर्थः---गाढ झोपेंत असतांना मला कांहीं एक दिसत नाहीं, या म्हणण्यांत दिसण्याचा जो अनुभव तो आला नाहीं म्हणतो, पण मला पहाण्याची शक्ति नव्हती असें म्हणत नाहीं.

स्वयंज्योतिर्न हि द्रष्टुरित्येवं संविदोऽस्तिताम् । कौटस्थ्यंच तथा तस्याः प्रत्ययस्य तु छमताम् । स्वयमेवाब्रवीच्छास्त्रं मायथावगतौ पृथक् ॥ ९८ ॥

अर्थः--आत्मा स्वप्रकाश आहे, पहाणाऱ्याची दृष्टि कधीं खंड पावत नाहीं असें बृहदारण्य ( ६--३ ) येथें सांगितलें आहे. त्या चेतनेचें अस्तित्व आणि त्याचा कूटस्थपणा, त्याप्रमाणेंच प्रत्ययाचा नाशवंत स्वभाव, शास्त्रांत ( वेदांत ) सांगितलेला आहे, आत्मा आणि प्रत्यय हीं दोन्ही वेगवेगळीं स्पष्ट दाखविलीं आहेत.

एवं विज्ञातवाक्यार्थे श्रुतिलोकप्रसिद्धितः ।
श्रुतिस्तत्त्वमसीत्याह श्रोतुर्मोहापनुत्तये ॥ ९९ ॥

अर्थः--याप्रमाणें वेदांत आणि लोक...

वाक्यांचा अर्थ समजून घेतल्यावर ऐकणाऱ्याचा भ्रम घालविण्याकरितां वेदांत तूंच तो आहेस हें महावाक्य सांगितलें आहे.

ब्रह्मा दाशरथेर्यद्वदुक्त्यै वापानुदद्यमः ।
तस्य विष्णुत्वसंबोधे न यत्नांतरमूचिवान् ॥ १०० ॥

अर्थः—रामचंद्राला आपण विष्णु आहांत येवढें बोलून ब्रह्मदेवानें मनुष्यदेहांत आल्यामुळें त्याला पडलेला विसर घालविला. विष्णुरूप कळण्याकरितां त्याला दुसरी खटपट करावी लागली नाहीं.

अहंशब्दस्य निष्ठा या ज्योतिषि प्रत्यगात्मनि ।
सैवोक्ता सदसीत्येवं फलं तत्र विमुक्तता ॥ १०१ ॥

अर्थः—स्वप्रकाश असा जो निर्विकारी आत्मा त्याच्यावर अहंशब्दानें लक्षणेनें जी वृत्ति ग्रहण केली होती, ती तूं सत् आहेस असें सांगितल्यानें घालविल्याबरोबर, त्याचा परिणाम मुक्ति हा झाला.

श्रुतमात्रेण चेन्न स्यात् कार्यं तत्र भवेत् ध्रुवम् ।
व्यवहारात्पुरापीष्टः सद्भावः स्वयमात्मनः ॥ १०२ ॥

अर्थः—नुसतें महावाक्य कानीं पडल्यानें बोध होत नसेल तर त्याकरितां कांहीं तरी कर्म करावें लागेल ( आणि तें तर संभवनीय नाहीं. ) हा उपदेशाचा व्यवहार होण्यापूर्वीपासून आत्मा स्वतःसिद्ध सत् आहे.

अशनायादिनिर्मुक्त्यै तत्कालात् जायते ममा ।
तत्त्वमस्यादिवाक्यार्थे त्रिषु कालेष्वसंशयः ॥ १०३ ॥

अर्थः—गुरुवाक्य ऐकतांच खाणें-पिणें वगैरे आत्म्यावर लादलेले दोष नाहींसे झाल्याचें अनुमान कळतें. तूंच तो आहेस या

महावाक्याच्या अर्थासंबंधानें कोणच्याहि काळीं शंका येणें शक्य नाहीं.

प्रतिबंधविहीनत्वात् स्वयं चानुभवात्मनः ।
जायेतैव प्रमा तत्र स्वात्मन्येव न संशयः ॥ १०४ ॥

अर्थः—वस्तूचें ज्ञान झालें असतयामुळें ( वाक्यार्थज्ञानाची ) हरकत दूर होऊन आत्म्याच्या ठिकाणीं प्रमाण वाटतें, ( खोटेपणा वाटत नाहीं ) यांत शंका नाहीं.

किं सदेवाहमस्मीति किंवाऽन्यत्प्रतिपद्यते ।
सदेव चेदहंशब्दः सता मुख्यार्थ इष्यताम् ॥ १०५ ॥

अर्थः—मी ब्रह्म आहें असा अनुभव सदोदित रहातो किंवा दुसरें कांहीं होतें ? मी हा प्रत्यय सदा असेल तर असणें हा मुख्यार्थ झाला.

अन्यचेत्सदहंग्राहप्रतिपत्तिर्मृषैव सा ।
तस्मान्मुख्यग्रहे नास्ति वारणावगतेरिह ॥ १०६ ॥

अर्थः—दुसरें कांहीं झालें असवें तर मी सत् आहें हा अनुभव खोटाच ठरेल ( केव्हांच येणार नाहीं ). यासाठीं महावाक्याचा मुख्यार्थ समजणार नाहीं असें म्हणायला कांहींच कारण दिसत नाहीं.

प्रत्ययी प्रत्ययश्चैव यदाभासौ तदर्थता ।
तयोरचितिमत्वाच चैतन्ये कल्पते फलम् ॥ १०७ ॥

अर्थः—प्रत्यय ज्याला येतो तें अंतःकरण आणि त्याची वृत्ति ही ज्याच्या आधारानें भासतात, त्याच्याकडे त्यांचा संबंध जातो. तीं दोन्ही जड असतयामुळें चैतन्यरूप आत्म्याकडे फळाचा आरोप होतो.

कूटस्थेऽपि फलं योग्यं राजनीव जयादिकम् ।
तद्नात्मत्वहेतुभ्यां क्रियायाः प्रत्ययस्यच ॥ १०८ ॥

अर्थः—अंतःकरण आणि अभिमानवृत्ति हीं दोन्ही जड असल्यामुळें आणि हीं हेतु ( कारण ) होत नसल्यामुळें फल दुसरीकडे जाणारच नाहीं, कूटस्थाकडेच जाईल. उदाहरण—जय मिळाला तो राजाला मिळाला असें ह्मणतात.

आदर्शस्तु यदाभासो मुखाकारः स एव सः ।
यथैवं प्रत्ययादर्शो यदा भासस्तदा ह्ययम् ॥ १०९ ॥

अर्थः—ज्याच्या योगानें आरशांतले प्रतिबिंबाला मुखाचा आकार आला तेंच तोंड नव्हे काय ? त्याप्रमाणेंच ज्याच्या चैतन्यामुळें अंतःकरण चैतन्यविशिष्ट दिसलें तोच मी.

इत्येवं प्रतिपत्तिः स्यात् सदस्मीति च नान्यथा ।
तत्त्वमित्युपदेशोऽपि द्वाराभावादनर्थकः ॥ ११० ॥

अर्थः—ह्या प्रकारचा अनुभव आल्यामुळें मी नेहमीं सत्च असणार. मग तूंच तो आहेस असला हा उपदेश करायला कांहीं प्रसंग नसल्यामुळें तो विनाकारण केला असें होतें.

श्रोतुः स्यादुपदेशश्चेत् अर्थतत्त्वं तथा भवेत् ।
अध्यक्षस्य न चेदिष्टं श्रोतृत्वं कस्य तद्भवेत् ॥ १११ ॥

अर्थः—ऐकणाराला उपदेश केला तर कांहीं तरी त्याला उपयोग होईल; येथें अध्यक्ष ( साक्षी ) याच्याकडे श्रोतेपणा लावला नाहीं, तर मग तो कोणाकडे लावणार?

अध्यक्षस्य समीपे स्यात् बुद्धेरेवेति चेन्मतम् ।
न तत्कृतोपकारोऽस्ति काष्ठवद्वन कल्पते ॥ ११२ ॥

अर्थः—अध्यक्षाच्या शेजारीं असलेल्या ( सहवासानें राहि-

लेल्या ) बुद्धीला उपदेश होतो असें ( तुमचें ) मत असेल तर त्या शेजारी असण्याचा फायदा कांहीं होत नाहीं, बुद्धीच्या शेजारीं लांकूड ठेवल्याप्रमाणें तो साक्षी. तो उपकार काय करणार !

बुद्धौ चेत्तत्कृतः कश्चित् नत्वेव परिणामिता ।
आभासेऽपि च को दोषः सति श्रुत्याद्यनुग्रहे ॥११३॥

अर्थः—जरी बुद्धीवर कांहीं परिणाम झाला तरी त्याचा विकार आत्म्याला होत नाहीं. ( तुमच्या समजुतीकरितां ) असें धरलें कीं विकार होतो, तरी त्यापासून आभासाची जी प्रमाणाःचरून सिद्धि दाखविली त्याच्यांत काय हरकत आली !

आभासे परिणामश्चेत् न रज्ज्वादिनिभत्ववत् ।
सर्पादेश्च तथाऽत्रोक्तं आदर्शेच मुखत्ववत् ॥ ११४ ॥

अर्थः—आभास असतांनाहि परिणाम ( आत्म्यावर विकार ) होतो असें धरलें तर तें दोरी दिसत असून ती साप आहे किंवा आरशांत दिसणारें प्रतिबिंबच तोंड आहे असें म्हटल्याप्रमाणें होईल.

नात्माभासत्वसिद्धिश्चेत् आत्मनो ग्रहणात्पृथक् ।
मुखादेश्च पृथक्सिद्धिः इह त्वन्योन्यसंश्रयः ॥ ११५ ॥

अर्थः—आत्म्याचें ज्ञान होण्याशिवाय निराळ्या कारणासाठीं आत्म्याचा आभास मानण्याचें कारण नाहीं. आरशांत तोंड दिसलें तें नसतें दिसलें, तरी तोंड हें रहाणारच. हीं दोन्ही एकमेकांवर अवलंबून असणार. आत्मा आहे म्हणून आभास घडणार, व वहा आभास झाल्यावरून आत्मा सिद्ध होतो.

अध्यक्षस्य पृथक्सिद्धौ आभासस्य तदीयता ।
आभासस्य तदीयत्वे ह्यध्यक्षस्यातिरिक्तता ॥ ११६ ॥

अर्थः—साक्षी ( आत्मा ) निराळा आहेच, म्हणून त्याचा आ-

भास वाटतो आणि आभास त्याच्यापासून होतो, यावरून अध्यक्ष ह्याहून निराळा आहे असें ठरतें.

नैवं स्वप्ने पृथक्सिद्धेः प्रत्ययस्य दृशेस्तथा ।
रथादेस्तत्र शून्यत्वात् प्रत्ययस्यात्मना ग्रहः ॥ ११७ ॥

अर्थः—पण असा प्रकार स्वप्नांत नसतो. तेथें अंतःकरण आणि आत्मा हे निरनिराळे दिसत नाहींत. त्याठिकाणीं रथ ( स्थूल देह ) वगैरे नसल्यामुळें आत्माच अंतःकरण वगैरे सर्व बनलेला असतो.

अवगत्या हि संव्याप्तः प्रत्ययो विषयाकृतिः ।
जायते स यदाकारः स बाह्यो विषयो मतः ॥ ११८ ॥

अर्थः—जाणिवेनें व्याप्त झालेलें अंतःकरण त्या विषयाच्या आकारानें बनतें अशा वेळीं त्या अंतःकरणाचा जो आकार बनतो, तोच बाह्य विषय होय.

कर्मेप्सितस्तमत्वात्सः तद्वान् कार्ये नियुज्यते ।
आकारो यत्र चार्प्येत करणं तदिहोच्यते ॥ ११९॥

अर्थः—इच्छा उत्पन्न झाल्यामुळें कर्म घडतें, आणि त्या विषयावर आसक्ति असल्यानें तो विषयी कर्म करूं लागतो. त्या विषयाचा आकार जेथें येतो तें अंतःकरण हें साधन ह्मणतात, त्याच्या द्वारानें विषयोपभोग होतो.

यदाभासेन संव्याप्तः संज्ञातेति निगद्यते ।
त्रयमेतद्विविच्यात्र यो जानाति स आत्मवित् ॥१२०॥

अर्थः—ज्याच्या आधारानें अंतःकरणांत प्रतिबिंब पडून तो आत्मा ज्ञानी असें ह्मणतां येतें; ह्या तिहींचा ( ह्मणजे विषय

अंतःकरण आणि आत्मा यांचा ) निरनिराळा प्रकार ज्याला समजला त्याला आत्म्याचें खरें ज्ञान झालें असें समजावें.

सम्यक्संशयमिथ्योक्ताः मत्ययाव्यभिचारिणः ।
एकैवावगतिस्तेषु भेदस्तु मत्ययार्पितः ॥ १२१ ॥

अर्थः—खरें ज्ञान, शंका, आणि खोटें ज्ञान असे तीन प्रकार अंतःकरणाच्या अनुभवाचे होत. त्या सर्वांला आधार एकच. भेद वाटला तो अंतःकरणाच्या उपाधीमुळें.

आधिभेदाद्यथा भेदो मणेरवगतेस्तथा ।
अशुद्धिः परिणामश्च सर्वं मत्ययसंश्रयात् ॥ १२२ ॥

अर्थः—स्फटिकाच्या जवळ जसला रंग ठेवावा तसला निराळा स्फटिक दिसतो, त्याप्रमाणें ज्ञानपूर्ण आत्म्याच्या ठिकाणीं मलिनपणा, विकार वगैरे सर्व अंतःकरणामुळें वाटतात.

प्रथनं ग्राहणं सिद्धिः मत्ययानामिहान्यतः ।
आपरोक्ष्याचदेवोक्तं अनुमानं मदीपवत् ॥ १२३ ॥

अर्थः—अंतःकरणाचें स्फुरण, जाणीव, स्वरूपज्ञान हीं परोक्ष्यावाचून दुसऱ्या कशाच्या तरी योगानें होतात असें म्हणायला ( तीं जड असतात, कारण तीं नाशवंत आहेत. उदाहरण, जसा दिवा, याप्रमाणें ) अनुमान बांधावें लागेल.

किमन्यद्ग्राहयेत्कश्चित् मपाणेन तु केनचित् ।
विनैव तु प्रमाणेन निराकृत्यान्यस्य शेषतः ॥ १२४ ॥

अर्थः—त्याचें ज्ञान होतें तें एखादें प्रमाण ( दृष्टांत ) दाखवून होत असलना ! किंवा प्रमाण नसेल तर दुसरें अमुक तें नाहीं असा निषेध करून बाकी उरेल तें असें तर दाखवाल ना!

शब्देनैव प्रमाणेन निवृत्तिश्चेदिहोच्यते ।
अध्यक्षस्याप्रसिद्धत्वात् शून्यतैव प्रसज्यते ॥१२५॥
अर्थः—शब्दप्रमाण देऊनच अनात्म वस्तूचा निषेध करावयाचा असतो, असें ह्मणाल तर मग खालीं कांहींच राहिलें नाहीं, ( शून्यवाद झाला? ) कारण अध्यक्ष ( साक्षी ) तुमच्या मतानें मुळींच ( प्रसिद्ध ) माहीत नाहीं; ( आणि अनात्मा सर्व अगोदर सोडून टाकला. )

चेतनस्त्वं कथं देह इति चेन्नाप्रसिद्धितः ।
चेतनस्यान्यतः सिद्धौ एवं स्यादन्यहानतः ॥१२६॥
अर्थः—तूं चैतन्ययुक्त असून देह वगैरे जड पदार्थ तूं कसा होशील ? असें लोकांत प्रसिद्ध ( कोणी ह्मणत ) नाहीं. बरें तूं स्वतः चैतन्यरूप नाहीं ह्मणशील तर ज्याचा निषेध केला त्या जडांतच तूंहि वगळला जाशील ह्मणजे बाकी शून्यच राहिलें.

अध्यक्षः स्वयमस्त्येव चेतनस्यापरोक्षतः ।
तुल्य एव प्रबोधः स्यात् अन्यस्यासत्त्ववादिना॥१२७॥
अर्थः—चैतन्य अपरोक्ष सिद्ध असल्यामुळें अध्यक्ष स्वतःसिद्ध आहे, असें ह्मणाल तर त्या शून्यवाद्याच्या शून्याप्रमाणेंच तुमचें ज्ञान सुद्धां प्रमाणावांचून सिद्ध आहे, तेव्हां दोन्ही सारखेच असें होईल.

अहमज्ञासिषं चेद इति लोकस्मृतेरिह ।
करणं कर्म कर्ता च सिद्धास्त्वेकक्षणे किल ॥ १२८ ॥
अर्थः—मला हें ठाऊक होतें असा लोकाचा स्मरणानंतर व्यवहार होतो. त्यावरून एकाच वेळीं कर्ता, कर्म, करण ही त्रिपुटी तयार होते.

प्रामाण्येऽपि स्मृतेः सैघयात् यौगपद्यं विभाव्यते ।
क्रमेण ग्रहणं पूर्व स्मृतेः पश्चात्तथैव च ॥ १२९ ॥

अर्थः—आठवणीच्या व्यवहाराचा दृष्टांत बरोबर आहे, पण तेथल्या घाईमुळें ही त्रिपुटी एकदम झालीशी वाटते; पण तसा प्रकार येथें नाहीं. पूर्वी ज्ञान झालें होतें, त्याचें स्मरण मागाहून झालें इतकेंच.

अज्ञातिरपिदं मां चेत्यपेक्षा जायते ध्रुवम् ।
विशेषोऽपेक्ष्यते यत्र तत्र नैवैककालता ॥ १३० ॥

अर्थः—हें ( अमूक ) जाणलें व्रांत हें हें प्रत्यक्ष आहे आणि मी याची अप्रत्यक्ष ( दुसऱ्या कशाची तरी ) जरूर दृष्टीस पडते. जिथें कांहीं विशेषाची ( गुणाची ) निराळी फोड दिसते तिथें सर्वच गोष्टी एकाच वेळीं झालेल्या असत नाहींत.

आत्मनोग्रहणेचापि त्रयाणामिह संभवात् ।
आत्मन्यासक्तकर्तृत्वं न स्यात्करणकर्मणोः ॥ १३१ ॥

अर्थः—आत्म्याचें ज्ञान होण्यालासुद्धा त्रिपुटी लागणें संभवनीय दिसते. आत्म्याच्या ठिकाणी कर्तेपण गुरल्यामुळें तेथें कर्म आणि करण हीं दिसत नाहींत.

व्याप्तुमिष्टं च यत्कर्तुः क्रियया कर्म तत्स्मृतम् ।
अतो हि कर्तृतंत्रत्वं तस्येष्टं नान्यतंत्रता ॥ १३२ ॥

अर्थः—कर्त्याच्या क्रियेनें जें व्यापण्यास योग्य असतें त्याला कर्म म्हणावें असें ( व्याकरण शास्त्रांत ) सांगितलें आहे. त्यावरून कर्म हें कर्त्यावर अवलंबून असतें, दुसऱ्या कशावर नसतें, असें ठरतें.

शब्दाद्वाऽनुमितेर्वापि प्रमाणाद्वा ततोऽन्यतः ।
सिद्धिः सर्वपदार्थानां स्यादस्मं मति नान्यथा ॥ १३३

अर्थः—तेव्हां शब्दांनी, अनुमान काढून, दृष्टांतानें किंवा इतर तऱ्हेनें सर्व पदार्थ अज्ञ मनुष्याला समजून घ्यावे लागतात. त्याला ह्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

अध्यक्षस्यापि सिद्धिः स्यात् प्रमाणेन विनैव वा ।
विना स्वस्य प्रसिद्धिस्तु नाज्ञे प्रत्युपयुज्यते ॥ १३४ ॥

अर्थः—दृष्टांतानें किंवा त्याच्याशिवाय साक्षी सुद्धां अज्ञमनुष्याला समजेल, परंतु तो ( साक्षी ) प्रसिद्ध असल्यावांचून त्याची समज नीट पडावयाची नाहीं.

तस्यैवाज्ञत्वमिष्टं चेत्र ज्ञानत्वेऽन्या मतिर्भवेत् ।
अन्यस्यैवाज्ञतायां च तद्विज्ञाने मृषा भवेत् ॥ १३५ ॥

अर्थः—ज्ञानस्वरूप आत्मा अज्ञानी होतो म्हटला तर त्याचें ज्ञान होण्याला दुसरें ज्ञान पाहिजे. आत्म्यावांचून दुसरें सर्व जड, व अज्ञानपूर्ण, तेव्हां त्याचें ज्ञान होण्याला बुद्धि पाहिजे.

ज्ञातता स्वात्मलाभो वा सिद्धिः स्यादन्यदेव वा ।
ज्ञातत्वेऽनन्तरोक्तौ त्वं पक्षौ संस्मर्तुमर्हसि ॥ १३६ ॥

अर्थः—सिद्धि म्हणजे काय ? ज्ञान किंवा आत्मस्वरूप प्राप्ति किंवा दुसरें कांहीं ? ज्ञान म्हटलें की मागील श्लोकांत सांगितलेले दोन्ही दोष आले.

सिद्धिः स्यात्स्वात्मलाभश्चेद्यत्नस्तत्र निरर्थकः
सर्वलोकप्रसिद्धत्वात् स्वहेतुभ्यस्तु वस्तुनः ॥१३७॥

अर्थः—सिद्धि म्हणजे आत्मस्वरूपप्राप्ति म्हणाल तर मग त्याकरतां प्रयत्न करणें फुकट होय. आत्मवस्तु प्राप्त होण्याला कारण तीच स्वतःच आहे, ( त्याला दुसरें साधन नाहीं ) असें सर्व लोकांना माहीत आहे.

ज्ञानज्ञेयादिवादेऽतः सिद्धिर्ज्ञातत्वमुच्यते ।
अध्यक्षाध्यक्षयोः सिद्धिः ज्ञेयत्वं नात्मलाभतः॥१३८॥

अर्थः–ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान अशा त्रिपुटीच्या प्रकरणांत ज्ञान होणें ह्यालाच सिद्धि ह्मणतात. साक्षी आणि अंतःकरण यांचें ज्ञान हाच सिद्धि, त्यांत आत्मस्वरूपप्राप्ति येत नाही.

स्पष्टत्वं कर्मकर्त्रादेः सिद्धिता यदि कल्पते ।
स्पष्टताऽस्पष्टते स्यातां अन्यस्यैव न चात्मनः ॥१३९॥

अर्थः–कर्ता आणि कर्म हीं निरनिराळीं स्पष्ट दाखविणें ह्याला जर सिद्धि ह्मणावें तर आत्मा प्रथम अस्पष्ट होता काय? स्पष्ट ज्ञान आणि अस्पष्ट ज्ञान असला प्रकार आत्म्याला लागू नाही, तो इतर जड वस्तूकडे लागू.

अद्रष्टुर्नैव चांधस्य स्पष्टीभावो घटस्य तु ।
कर्त्रादेः स्पष्टतेष्टा चेत् द्रष्टताऽध्यक्षकर्तृका ॥ १४० ॥

अर्थः–जो घटाकडे पहात नाहीं किंवा जो आंधळा आहे, त्याला घट स्पष्ट दाखविणें तेंच ज्ञान ( असें भट्टाचार्य ह्मणतात. ) मग कर्तादिकाची स्पष्टता ह्मणजेच जर सिद्धि तर मग पहाणें ही क्रिया दुसऱ्या कोणा साक्षीकडे लावली पाहिजे

अनुभूतेः किमन्यस्मिन् स्याच्चवापेक्षया वद ।
अनुभवात्परीष्टा स्यात् स्योप्यनुभूतिरेव नः ॥ १४१ ॥

अर्थः–जाणीव दुसऱ्याकडे जाते असें ठरल्यानें तुझा काय मतलब सिद्ध होणार सांग. जाणिवेचा आश्रय जो ज्ञाता त्याच्या ठिकाणीं ती होते असें ह्मणशील तर आमचें ह्मणणें कीं ज्ञाता तीच जाणीव ( ती निराळी आहे कोठें ? )

अभिन्नोऽपि हि बुध्यात्मा विपर्यासितदर्शनैः ।
ग्राह्यग्राहकसंवित्ति भेदवानिव लक्ष्यते ॥ १४२ ॥

अर्थः—बुद्धीपासून आत्मा निराळा नाहीं, तरी अज्ञानानें भ्रांत झालेल्या लोकांना ग्रहण करण्याची वस्तु, ग्रहण करणारा आणि ग्रहण करणें अशा त्रिपुटीमुळें अनेक प्रकारचा वाटतो.

भूतिर्येषां क्रिया सैव कारकं सैव चोच्यते ।
सत्वं नाशित्वमस्याश्चेत् सकर्तृत्वं तथेष्यताम् ॥१४३॥

अर्थः—ज्याला जाणीव होते तोच क्रिया करतो व तोच कारक ( साधन ) होतो असें क्षणशील तर, त्या जाणिवेला सत्पणा असून नाश मानावा लागेल. तेव्हांच त्याच्याकडे कर्तेपणा देतां येईल.

न कश्चिदेष्यते धर्म इति चेत्पक्षहानता ।
नन्वस्तित्वादयो धर्मा नास्तित्वादिनिवृत्तयः ॥
न भूतेस्तर्हि नाशित्वं स्वालक्षण्यं मतं हि ते ॥ १४४॥

अर्थः—त्याला कोणताच धर्म ( गुण ) लावूं नका असें क्षणशील तर तुझें ( पहिलें ) मत ( अनुभव क्षणिक आहे हें ) खंडण व्हा-यला लागेल. अस्तित्व ( आहे पण ) हें धरून नाहीं म्हणणाऱ्या वगैरे मताचें निवारण करावयाचें ( असें क्षणशील ) तर तुझ्या मताप्रमाणें जाणीव नाशवंत नाही, ती स्वतःच जाणली जाते.

स्वलक्षणावधिर्नाशो नाशोऽनाशनिवृत्तिता ।
अगोरसत्वं गोत्वं ते ननु तद्गोत्वलक्षणम् ॥ १४५ ॥

अर्थः—आपलें स्वरूप कळेपर्यंतचाच नाश धरावा, आणि अनाशित्वधर्माचें निवारण करण्यापुरता नाश समजला म्हणजे झालें. गाईचें लक्षण ज्यांत नाहीं असे ( घोडा वगैरे ) नाहीं म्हणण्या-

करितां गायपणा धर्म धरशील तर तो धर्म गाईपणाचें लक्षण होणार नाहीं.

क्षणवाच्योऽपि योऽर्थः स्यात् सोप्यन्याभाव एव ते ॥१४७

अर्थः---क्षण हा ज्याचा वाच्यार्थ आहे तो अक्षण ( स्थिरपणा ) याचा अभाव दासावितो असें ( कांहीं वेदेवांकडे बोलल्याप्रमाणें ) झालें.

भेदाभावेऽप्यभावस्य भेदो नामभिरिष्यते ।
नामभेदैरनेकत्वं एकस्य स्यात्कथं तव ॥ १४७ ॥

अर्थः--ज्या आत्म्याच्या स्वरूपांत मुळींच भेद नाहीं तेथें नुसत्या ( शब्दांच्या विपलापालटीनें ) नांवें देण्यानें भेद करण्याचें तुझ्या मनांत आलें. जें मूळचें अद्वैत त्याला नुसती निरनिराळीं नांवें दिलीं तर त्याच्या ठिकाणी अनेकपणा कसा येईल ?

अपोहो यदि भिन्नानां हस्तित्वस्य कथं गवि ।
नाभावा भेदकाः सर्वे विशेषा वा कथंचन ॥ १४८ ॥

अर्थः—निराळ्या ( सर्व प्राण्यां ) चा बोध होऊं नये म्हणून जो धर्म सांगितला तो गाईवर कसा राहील ( त्यानें गाईचा बोध कसा होईल ). अभाव ( घोडा नाहीं, गाढव नाहीं वगैरे ) आणि विशेष ( गाईचे तुकडे, डोकें वगैरे ) ह्यावरून त्या गाईचे तितके प्रकार होत नाहीत.

नामजात्यादयो यद्वत् संविदस्तेऽविशेषतः ॥ १४९ ॥

अर्थः---(मग तुझ्या मताप्रमाणें ) नाम, जाति वगैरे यांनी एकाच व्यक्तीचा बोध होत असल्यामुळें तीं निरनिराळीं विशेषणेंच नव्हेत.

प्रत्यक्षमनुमानं वा व्यवहारे यदिच्छसि ।
क्रियाकारकभेदैस्तत् अभ्युपेयं ध्रुवं भवेत् ॥ १५० ॥

अर्थः—ज्ञानस्वरूप आत्म्याच्या ठिकाणीं क्रिया आणि कारक ( साधन ) याच्या भेदामुळें प्रत्यक्ष अनुमान काढून व्यवहारांतलें जें तुला सिद्ध करावयाचें होतें, तें झालें काय ?

तस्मान्नीलं तथा पीतं घटादिर्वा विशेषणं ।
संविदस्तदुपेयं स्यात् येन चाप्यनुभूयते ॥ १५१ ॥

अर्थः—तेव्हां निळें, पिंवळें किंवा घट वगैरे जें कांहीं विशेषण असेल त्याचें ज्ञान ज्या ज्ञानपूर्ण अधिष्ठानानें होतें, त्या आत्म्याकडे तें लावावयाचें.

रूपादीनां यथान्यः स्यात् ग्राह्यत्वाद् ग्राहकस्तथा ।
प्रत्ययस्तत्तथाऽन्यः स्यात् व्यंजकत्वात्प्रदीपवत्॥१५२॥

अर्थः—रूप वगैरे विषय ग्रहण करितां येतात, तेव्हां त्यांचा ग्रहण करणारा त्याच्याहून वेगळा. त्याप्रमाणेंच प्रकाश करणारा दिवा ( घटाहून निराळा ) तसाच आत्मा अंतःकरणाचा व्यंजक ( बोध करणारा ) म्हणून त्याहून निराळा.

अध्यक्षस्य दृशेः कीदृक् संबंधः संभविष्यति ।
अध्यक्ष्येण तु दृश्येन मुक्त्वान्यो दृग्दृश्यताम् ॥१५३॥

अर्थः—अध्यक्ष ( साक्षी ) पूर्णज्ञानी आत्मा आणि अध्यक्ष्य ( प्रत्यय, अंतःकरण ) जें दृश्य ह्या दोघामधला एक द्रष्टा आणि दुसरा दृश्य हा संबंध सोडून दुसरा काय संबंध आहे.

अध्यक्षेण कृता दृष्टिः दृश्यं व्याप्नोत्यथापि या ।
नित्याध्यक्षकृतः कश्चित् उपकारो भवेद्धियां ॥१५४॥

अर्थः–साक्षीचें पदार्थी दृश्य वस्तूला सर्व बाजूंनी व्यापणें किंवा नाहीं. हा साक्षी बुद्धीवर कांहीं तरी परिणाम नेहमीं करतो काय?

स चोक्तस्तन्निभत्वं प्राक् संव्याप्तिश्च घटादिषु ।
यथाऽऽलोकादिसंव्याप्तिः व्यंजकत्वाद्धियस्तथा ॥१५५

अर्थः–तो परिणाम मागेंच सांगितला, त्यामुळें बुद्धीवर चैतन्य दिसूं लागलें. घट वगैरेच्या ठिकाणीं प्रकाश वगैरे जसा व्यापून असतो त्याप्रमाणें हा त्याचा प्रकाशक असल्यामुळें व्यापून रहातो.

आलोकस्थो घटो यद्वत् बुध्यारूढो भवेत्तथा ।
धीव्याप्तिः स्याद्घटारोहो धियो व्याप्तौ क्रमो भवेत् १५६

अर्थः—प्रकाशांत असलेलें भांडें दृष्टीस पडतें त्याप्रमाणें त्याची कल्पना बुद्धीनें ग्रहण केली म्हणजे जी बुद्धीवर चढते. यांत बुद्धीच्या ग्रहण करण्यांत अनुक्रम असतो.

पूर्वं स्यात्प्रत्यगव्याप्तिः ततोऽनुग्रह आत्मनः ।
कृत्स्नाध्यक्षस्य नो युक्तः कालाकाशादिवत्क्रमः ॥१५७

अर्थः–अगोदर बुद्धि विषयाला व्यापून टाकते, मग ती त्याच्या आकाराची बनते, मग बुद्धीमध्यें आत्म्याचें प्रतिबिंब पडून त्याच्यावर विषयाच्या उपभोगाचा भ्रम होतो. एकदम सर्व वस्तु पदार्थाच्याच्या ठिकाणीं घडवात हें संभवत नाहीं. काल आणि आकाश यांना जसा क्रम नसतो, ती नेहमी असावयाची, तसेंच आत्म्याचें समजावें.

विषयग्रहणं यस्य कारणापेक्षया भवेत् ।
तस्यैव ग्राह्यरूपे च परिणामी स चित्तवत् ॥ १५८ ॥

अर्थः–ज्याचें विषयग्रहण कांहीं तरी कारण असल्याशिवाय

होतें नाहीं, आणि ज्यांत ग्राह्य वस्तूचा भाग शिल्लक रहातो, तें अंतःकरणाप्रमाणें विकारी असलें पाहिजे.

अध्यक्षोऽहमिति ज्ञानं बुद्धेरेव विनिश्चयः ।
नाध्यक्षस्याविशेषत्वात् न तस्यास्ति परो यतः ॥१५९॥

अर्थः-मी साक्षी आहें, हें ज्ञानहि बुद्धीलाच होतें, यांत शंका नको. साक्षीच्या ठिकाणीं फेरबदल ( विकार ) नाहीं, कारण त्याच्याहून पलीकडे श्रेष्ठ कांहीं नाहीं.

कर्ता चेदहमित्येवं अनुभूयेत मुक्तता ।
सुखदुःखविनिर्मुक्तो नाहंकर्तरि युज्यते ॥ १६० ॥

अर्थः—मीच तो अशा प्रकारचा मोक्षाचा अनुभव अहंकर्ता जं अंतःकरण त्याला असता तर मी कांहीं करीत नाहीं असें म्हणणाराला सुखदुःख लागूं नये हें बरोबर दिसतें.

देहादावभिमानोत्थो दुःखीति प्रत्ययो ध्रुवम् ।
कुण्डलीप्रत्ययो यद्वत् प्रत्यगात्माभिमानिता ॥ १६१ ॥
बाध्यते प्रत्ययेनेह विवेकेनाविवेकवान् ।

अर्थः—देह वगैरेच्या ठिकाणीं अहंकार उत्पन्न झाल्यामुळें मी दुःख भोगतों असा भ्रम उत्पन्न होतो. कानांत कुण्डल घातलें कीं मी कुंडली म्हणण्याप्रमाणेंच हें होतें. शुद्ध ब्रह्माचा अभिमान धरणाऱ्या विवेकी जिवाला अविचारी चित्ताची बाधा होते.

विपर्यासेऽसदन्तं स्यात् प्रमाणस्याप्रमाणतः ॥ १६२ ॥

अर्थः—तसें न होईल तर दिलेला दृष्टांत खोटा ठरून शेवटीं असत् ( खोटें ) किंवा शून्य ठरण्याचा प्रसंग येईल.

दाहच्छेदविनाशेषु दुःखित्वं नान्यथात्मनः ।
नैव ह्यन्यस्य दाहादौ अन्यो दुःखी भवेत्क्वचित् ॥१६३

अर्थः—जाळपोळ, तोड, नाश [ देहाचा ] होईल तेव्हांच आत्म्याला दुःख होतें, एरवीं होत नाहीं. पण जाळपोळ वगैरे एकाला व्हावी आणि त्याचें दुःख दुसऱ्याला व्हावें असें कधींच घडत नाहीं.

अस्पर्शत्वाददेहत्वात् नाहं दाह्यो यतः सदा ।
तस्मान्मिथ्याभिमानोत्थं मृते पुत्रे मृतिर्यथा ॥ १६४ ॥

अर्थः—मी सर्वांपासून अलिप्त आहें, माझा आणि देहाचा संबंध नाहीं, त्यामुळें जाळपोळ मला होत नाहीं. तेव्हां हें दुःख होण्याचें कारण विनाकारण मानलेलें तादात्म्य होय. पुत्र मेला तर मरणप्राय दुःख होतें याचें कारण त्याच्यावर धरलेलें प्रेम होय.

कुण्डलप्रहमिति ह्येतत् बाध्येतैव विवेकिना ।
दुःखीति प्रत्ययस्तद्वत् केवलाहंधियासह ॥ १६५ ॥

अर्थः—मी कुण्डल घातलेला असें जें वाटत होतें, तें विचार केल्यावर खोटें ठरतें, त्याप्रमाणेंच मी दुःख भोगतों असें जें अनुभवास येत होतें, तें व त्याविषयींचा अहंकार दोन्ही विचारा अंतीं नाहींशीं होतात.

सिद्धे दुःखित्वं इष्टं स्यात् तच्छक्तिश्छंदसात्मनः ।
मिथ्याभिमानतो दुःखी तेनार्थोपादनक्षमः ॥ १६ ॥

अर्थः—कधीं तरी दुःखीपणा आत्म्याकडे येईल असें म्हणाल तर तुम्ही आपल्या इच्छेनें तशाप्रकारची तेथें कल्पना करा. वास्तविक पाहतां, खोटा अहंकार वाटल्यामुळें दुःखी मी असें वाटूं लागलें आणि त्यामुळेंच त्या दुःखाचा अनुभव येऊं लागला.

अस्पर्शोऽपि यथा स्पर्शी अचलश्चलनादिव ।
अविवेकाच्चया दुःखं मानसं चात्मनीक्षते ॥ १६७ ॥

अर्थः—आत्मा ( अवयव नसल्यामुळें ) स्पर्शरहित असून स्पर्शाचा अनुभव घेतो, एक ठिकाणीं स्थिर असून क्रिया करतो आणि त्याप्रमाणेंच मनाला वाटलेलें दुःख आपल्यावर कल्पून घेतो हें सर्व अविचारामुळें होतें.

विवेकात्मधिया दुःखं नुद्यते चलनादिवत् ।
अविवेकस्वभावेन मनो गच्छत्यनिच्छतः ॥ १६८ ॥

अर्थः—नीट विचार करून आत्म्याचें ज्ञान करून घेतल्यावर चलन वगैरे कोणत्याहि प्रकारचें दुःख होत नाहीं. तसा विवेक केला नाहीं तर हेतू नसूनहि त्या ठिकाणीं मन धांव घेतें.

तदानुदृश्यते दुःखं नैश्चल्ये नैव तस्य तत् ।
प्रत्यगात्मनि तस्मात्तत् दुःखं नैवोपपद्यते ॥ १६९ ॥

अर्थः—तेंच ( मन ) स्थिर केलें म्हणजे दुःखाचा लवलेश दिसत नाहीं. तेव्हां शुद्ध ब्रह्माच्या ठिकाणीं दुःख मुळींच सांपडत नाहीं.

त्वंसतोस्तुल्यनीडत्वात् नीलाश्ववदिदं भवेत् ॥ १७०॥

अर्थः—त्वं आणि सत् हीं दोन्ही एकाच वस्तूच्या ठिकाणीं लागत असल्यामुळें निळा घोडा हे दोन शब्द एकच वस्तू दाखवितात, त्याप्रमाणें येथेंहि प्रकार समजावा.

निर्दुःखवाचिना योगात् त्वं शब्दस्य तदर्थता ।
प्रत्यगात्माभिधानेन तच्छब्दस्य युतेस्तथा ॥ १७१ ॥

अर्थः—दुःख नसण्याची स्थिति दाखविणाऱ्या ( सत् ) शब्दाशीं एकत्र राहणें असल्यामुळें त्वं शब्दाला तोच अर्थ ( दुःखरहित असण्याचा ) आला आहे. त्याप्रमाणेंच शुद्ध ब्रह्माचा बोध करणाऱ्या तत् शब्दाशीं त्वं शब्दाची जोड झाल्यामुळें त्वंलाहि तो शुद्ध ब्रह्माचा अर्थ आला.

दशमस्त्वमसीत्येवं वाक्यं स्यात्प्रत्यगात्मनि ॥ १७२ ॥
स्वार्थस्य ह्यप्रहाणेन विशिष्टार्थसमर्पकौ । प्रत्यगात्मावगत्यन्तौ नान्योर्थोऽर्थाद्विरोध्यतः ॥ १७३ ॥

अर्थः—दहावा तूं आहेस हें वाक्य सांगितल्याप्रमाणें शुद्ध ब्रह्माचा बोध होतो. आपला अर्थ न सोडतां ( त्वं आणि तत् हे ) दोन्ही शब्द विशेष प्रकारचा आणखी अर्थ दाखवितात, आणि शुद्ध ब्रह्माचें ज्ञान करून देतात. त्यामुळें अखंड एक रस आत्म्याच्या ठिकाणीं त्याच्या अर्थाला विरोध आणिला असा दुसरा अर्थ होत नाहीं.

नववुध्यपहाराद्धि स्वात्मानं दशपूरणम् ।
अपश्यन् ज्ञातुमेवेच्छेत् स्वमात्मानं जनस्तथा ॥१७४॥

अर्थः—आम्ही नऊच आहों अशा भ्रांतीनें आपण स्वतः दहावा धरला तर पूर्ण संख्या होईल हें न कळल्यामुळें ( दहावा ) शोधायला लागतो. त्याप्रमाणें ( काही कारणानें विसरलेला ) आपला आत्मा जाणण्याची लोकांना इच्छा होते.

अविद्याबद्धचक्षुष्ट्वात् कामापहृतधीः सदा ।
विविक्तं दृशिमात्मानं नेक्षते दशमं यथा ॥ १७५ ॥

अर्थः—अज्ञानामुळें डोळ्यावर पडदा आल्यामुळें आणि इच्छेमुळें विवेकबुद्धि नष्ट झाल्याप्रमाणें, दृष्टांतांतल्या मनुष्याला दहावा दिसत नाहीं, त्याप्रमाणें ( ह्या दृश्य संघातापासून ) निराळा असलेल्या पूर्णज्ञानी आत्म्याचा ( लोकांना ) बोध होत नाहीं.

दशमस्त्वमसीत्येवं तत्त्वमस्यादिवाक्यतः ।
स्वमात्मानं विजानाति कृत्स्नांतःकरणे क्षणम् ॥१७६॥

अर्थः—दहावा तूं आहेस ह्या वाक्याप्रमाणें तूंच ब्रह्म आहेस

ह्या महावाक्याच्या उपदेशानें अहंकारी अंतःकरणासुद्धां सगळ्याचा साक्षी मीच आत्मा आहे असें ( मुमुक्षू ) ओळखतो.

इदं पूर्वमिदं पश्चात् पदं वाक्यं भवेदिति ।
नियमो नैव वेदेऽस्ति पदसाङ्गत्यमर्थतः ॥
अन्वयव्यतिरेकाभ्यां ततो वाक्यार्थबोधनम् ॥१७७॥

अर्थः–वेदामध्यें पदाचा अनुक्रम महत्त्वाचा नाहीं, त्याच्या अर्थावर भिस्त असते. हा शब्द अगोदर, हा शब्द मागून पाहिजे, म्हणजे मग वाक्य होईल असा नियम नाहीं. अन्वय आणि व्यतिरेक लावून वाक्याचा अर्थ लावावयाचा म्हणजे झालें.

वाक्ये हि श्रूयमाणानां पदानामर्थसंस्मृतिः ॥ १७८ ॥

अर्थः–वाक्यांत तरी नेहमीं प्रचारांत असणाऱ्या शब्दांच्या अर्थाची आठवण करावयाची असते.

यदा नित्येषु वाक्येषु पदार्थस्तु विविच्यते ।
वाक्यार्थज्ञानसंक्रान्त्यै तदा प्रश्नो न युज्यते ॥१७९॥

अर्थः–वाक्याचा अर्थ ठरून गेलेला असल्यावर त्यांतील शब्दांचा अर्थहि स्पष्ट असतो. मग वाक्याच्या अर्थाचें ज्ञान समजण्याला प्रश्न विचारण्याचें कारणच नाहीं.

अन्वयव्यतिरेकोक्तिः पदार्थस्मरणाय तु ।
स्मृत्यभावे हि वाक्यार्थो ज्ञातुं शक्यो न केन
चित् ॥ १८० ॥

अर्थः–शब्दाच्या अर्थाची आठवण देण्याकरितां अन्वय आणि व्यतिरेक करावयाचा. आठवण नाहींशी झाल्यावर वाक्याचा अर्थ कोणालाच कधीं कळणार नाहीं.

तत्त्वमस्यादिवाक्येषु त्वंपदार्थाविवेकतः ।
व्यज्यते नैव वाक्यार्थो नित्यमुक्तोऽहमित्यतः ॥१८१॥

अर्थः-तें ब्रह्म तूं आहेस वगैरे महावाक्यांत त्वं शब्दाचा अर्थ नीट न समजल्यामुळें मी सदोदित मुक्त आहें, हा त्याचा वाक्यार्थ स्पष्ट कळत नाहीं.

अन्वयव्यतिरेकोक्तिः तद्विवेकाय नान्यथा ।
त्वंपदार्थविवेके हि पाणावर्पितबिल्ववत् ॥ १८२ ॥

अर्थः-त्या अर्थाची फोड होण्याकरितां अन्वय आणि व्यतिरेक करावयाचा. त्वं शब्दाचा अर्थ चांगला कळल्यावर हातावर बेल घेतल्याप्रमाणें ( ब्रह्म ) वाक्याचा अर्थ उघड होतो.

वाक्यार्थो व्यज्यते चैवं केवलोऽहं पदार्थतः ।
दुःखीत्येतदपोहेन प्रत्यग्ब्रह्मविनिश्चयात् ॥ १८३ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें अहं शब्दाच्या अर्थांतून दुःखी हा अर्थ वगळून टाकला म्हणजे शुद्ध ब्रह्माचा निश्चय होऊन ( भेद संसर्ग-रहित ) केवळ आत्मा रहातो.

तत्रैवं संभवत्यर्थे श्रुतहानाश्रुतार्थधीः ।
नैव कल्पयितुं युक्ता पदवाक्यार्थकोविदैः ॥ १८४ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें अर्थ निघत असल्यामुळें शब्द आणि वाक्य यांचा अर्थ समजलेल्या शहाण्यांनी, ह्या करण्यांत कांहीं ऐकलेला अर्थ टाकला आणि न ऐकलेला असा दुसरा अर्थ घेतला, असला विचार मनांत आणूं नये.

प्रत्यक्षादीनि बाधेरन् कृष्णलादिषु पाकवत् ।
अप्रजादिनिभैरेतैः कथं स्याद्वाक्यबाधनम् ॥ १८५ ॥

अर्थः-कृष्णल ( गुंज ) शिजवावी या वाक्यांत गुंजा कधीं

शिजवतां येणार नाहींत, हें प्रत्यक्ष समजतें व त्याचा बाध वाक्याला येतो. मग क्रिया वगैरे झालेल्या प्रत्यक्ष दिसतात म्हणून त्या महावाक्याला बाध येईल काय?

दुःख्यस्मीति सति ज्ञाने निर्दुःखीति न जायते ।
प्रत्यक्षादिनिभत्वेऽपि वाक्यान्न व्यभिचारतः ॥१८६॥

अर्थः–( कोणी म्हणेल कीं, ) मला सुख होतें आहे हें समजत असून तें होत नाहीं असा अनुभव यायचा नाहीं. ( यांतच तर खुबी आहे ) प्रत्यक्ष वगैरे खरीं भासलीं तरी महावाक्यांच्या अर्थांत चूक होणार नाहीं.

स्वप्ने दुःखमहमध्यासं दाहच्छेदादिहेतुतः ।
तत्कालभाविभिर्वाक्यैः न बाधः क्रियते यदि ॥१८७॥

अर्थः–स्वप्नामध्यें जाळपोळ वगैरे मला होऊन मला दुःख झालें असें त्या वेळीं ( स्वप्नांत ) खऱ्या वाटणाऱ्या स्थितीच्या अनुभवानें तुला ( जागृतींत ) कांहीं पीडा झाली आहे काय ?

समाप्तेस्तर्हि दुःखस्य प्राक् तद्बाध इष्यताम् ।
न हि दुःखस्य संतानो भ्रांतिर्वा दृश्यते क्वचित् ॥१८८॥

अर्थः–दुःख संपल्यानंतर त्याचें अस्तित्व नसतें, त्याप्रमाणेंच तें होण्यापूर्वींही नसतें. दुःखाची एकसारखी स्थिति, तशीच भ्रमाचीहि कधीं कोठें दृष्टीस पडत नाहीं.

प्रत्यगात्मन आत्मत्वं दुःख्यस्मीत्यस्य बाधया ।
दशमं नवमस्येव वेद चेदविरुद्धता ॥ १८९ ॥

अर्थः–मी दुःखी आहें असा जो ( भ्रांतीचा ) अनुभव येतो त्यानें शुद्धब्रह्माचा आत्मपणा नाहींसा होत नाहीं. दहावा समजला तो नवव्याच्या विरुद्ध होता काय ? ( नववा नाहींसा झाला काय ? )

नित्यमुक्तत्वविज्ञानं वाक्याद्भवति नान्यतः ।
वाक्यार्थस्यापि विज्ञानं पदार्थस्मृतिपूर्वकम् ॥ १९० ॥

अर्थः—मी नित्यमुक्त आहें हें ज्ञान महावाक्यापासून होतें, एरवीं होत नाहीं. ह्या महावाक्याचें ज्ञान होण्याला त्यांतील शब्दाचा अर्थ बरोबर लक्षांत आला पाहिजे.

अन्वयव्यतिरेकाभ्यां पदार्थः स्मर्यते ध्रुवम् ।
एवं निर्दुःखमात्मानं अक्रियं प्रतिपद्यते ॥ १९१ ॥

अर्थः—अन्वय आणि व्यतिरेक लावून शब्दाचा अर्थ नीट ध्यानांत धरावा. ह्याप्रमाणें केल्यावर मी आत्मा दुःखरहित, कर्मरहित आहें असें समजून येईल.

सदेवेत्यादिवाक्येभ्यः प्रमा स्फुटतरा भवेत् ।
दशमस्त्वमसीत्यस्मायथैवं प्रत्यगात्मनि ॥ १९२ ॥

अर्थः—दहावा तूं असें सांगितल्याप्रमाणें सत् तूं आहेस वगैरे वाक्यांनीं शुद्धब्रह्माविषयीं चांगली स्पष्ट ओळख पटेल

प्रबोधेन यथा स्वाप्नं सर्वदुःखं निवर्तते ।
प्रत्यगात्मधिया तद्वत् दुःखित्वं सर्वदात्मनः ॥१९३॥

अर्थः—स्वप्नांत होणारें दुःख जागे झाल्यानें संपतें, त्याप्रमाणें शुद्ध ब्रह्माची खूण पटल्यावर ( जागृतीमधलें ) दुःख नाहींसें होतें.

कृष्णलादौ प्रमाऽजन्म तदन्यार्थाऽप्रवृत्तितः ।
तत्त्वमस्यादिवाक्येषु न त्वेवमविरोधतः ॥ १९४ ॥

अर्थः—गुंजा मऊ नसल्यामुळें त्या शिजतात असें म्हणणें संभवत नाहीं, त्याप्रमाणें तूंच तें ब्रह्म आहेस या महावाक्यांत सांगितलेल्या अर्थाशीं कोणचीहि गोष्ट विरुद्ध नाहीं.

वाक्ये तत्त्वमसीत्यस्मिन् ज्ञातार्थे तदसिद्वयम् ।
त्वमर्थे सत्यसाहाय्यात् वाक्यं नोत्पादयेत्ममाम् ॥१९५॥

अर्थः—तें ब्रह्म तूं आहेस ह्या वाक्यांतील तें आणि आहेस ह्या दोन शब्दांचा अर्थ ठाऊक आहे. पण त्वं शब्दाचा अर्थ ठाऊक नसेल तर त्यांना कांहीं तरी दुसऱ्या अर्थाची मदत झाल्याशिवाय ब्रह्मज्ञानाचा निश्चय होणार नाहीं.

तत्त्वमोस्तुल्यनीडार्थमसीत्येतत्पदं भवेत् ॥ १९६ ॥

अर्थः—तें ब्रह्म आणि तूं ह्या दोघांचें स्थान एकच आहे हें दाखविण्याकरितां ( असि ) अस् धातूचें द्वितीयपुरुषीं एकवचनीं रूप घातलें आहे.

तच्छब्दः प्रत्यगात्मार्थः तच्छब्दार्थस्त्वमस्तथा ।
दुःखित्वात् प्रत्यगात्मत्वं वारयेतामुभावपि ॥ १९७ ॥

अर्थः—तत् शब्दाचा अर्थ प्रत्यक् आत्मा, त्वं पदाचा तोच अर्थ, दोन्ही शब्दांच्या ठिकाणीं प्रत्यक् आत्मेपणा समजल्यावर दुःख भोगण्याचा संबंध कोणाकडेही उरत नाहीं.

एवं च नेति नेत्यर्थं गमयेतां परस्परम् ॥ १९८ ॥

अर्थः—ह्याप्रमाणेंच तें नाहीं, तें नाही वगैरे व्यतिरेकी वाक्यावरून त्या ब्रह्माचाच बोध होतो.

एवं तत्त्वमसीत्यस्य गम्यमाने फले कथम् ।
अप्रमाणत्वमस्योक्ता क्रियापेक्षत्वमुच्यते ॥ १९९ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें तें ब्रह्म तूं आहेस ह्या वाक्यापासून कांहीं इष्ट फलप्राप्ति होत असून त्या ब्रह्माच्या ज्ञानाला उदाहरण देतां येत नाहीं. आतांच्या बोलण्यावरून तर कांहीं तरी क्रिया करावी लागते असें ठरतें.

नित्यमुक्तत्वविज्ञानं वाक्याद्भवति नान्यतः ।
वाक्यार्थस्यापि विज्ञानं पदार्थस्मृतिपूर्वकम् ॥ १९० ॥

अर्थः—मी नित्यमुक्त आहें हें ज्ञान महावाक्यापासून होतें, एरवी होत नाहीं. या महावाक्याचें ज्ञान होण्याला त्यांतील शब्दाचा अर्थ बरोबर लक्षांत आला पाहिजे.

अन्वयव्यतिरेकाभ्यां पदार्थः स्मर्यते ध्रुवम् ।
एवं निर्दुःखमात्मानं अक्रियं प्रतिपद्यते ॥ १९१ ॥

अर्थः—अन्वय आणि व्यतिरेक लावून शब्दाचा अर्थ नीट ध्यानांत धरावा. ह्याप्रमाणें केल्यावर मी आत्मा दुःखरहित, कर्मरहित आहें असें समजून येईल.

सदेवेत्यादिवाक्येभ्यः प्रमा स्फुटतरा भवेत् ।
दशमस्त्वमसीत्यस्माद्यथैवं प्रत्यगात्मनि ॥ १९२ ॥

अर्थः—दहावा तूं असें सांगितल्याप्रमाणें सत् तूं आहेस वगैरे वाक्यांनीं शुद्धब्रह्माविषयीं चांगली स्पष्ट ओळख पटेल.

प्रबोधेन यथा स्वाप्नं सर्वदुःखं निवर्तते ।
प्रत्यगात्मधिया तद्वत् दुःखित्वं सर्वदात्मनः ॥१९३॥

अर्थः—स्वप्नांत होणारें दुःख जागे झाल्यानें संपतें, त्याप्रमाणें शुद्ध ब्रह्माची खूण पटल्यावर ( आवृत्तीमधलें ) दुःख नाहींसें होतें.

कृष्णलादौ प्रमाऽजन्म तदन्यार्थोऽप्रवृत्तितः ।
तत्त्वमस्यादिवाक्येषु न त्वेवमविरोधतः ॥ १९४ ॥

अर्थः—गुंजा मऊ नसल्यामुळें त्या शिजवात असें म्हणणें संभवत नाहीं, त्याप्रमाणें तूंच तें ब्रह्म आहेस या महावाक्यांत सांगितलेल्या अर्थाशीं कोणचीहि गोष्ट विरुद्ध नाहीं.

वाक्ये तत्त्वमसीत्यस्मिन् ज्ञातार्थे तदसिद्धयम् ।
त्वमर्थे सत्यसाहाय्यात् वाक्यं नोत्पादयेत्प्रमाम् ॥१९५॥

अर्थः–तें ब्रह्म तूं आहेस ह्या वाक्यांतील तें आणि आहेस ह्या दोन शब्दांचा अर्थ ठाऊक आहे. पण त्वं शब्दाचा अर्थ ठाऊक नसेल तर त्यांना कांहीं तरी दुसऱ्या अर्थाची मदत झाल्याशिवाय ब्रह्मज्ञानाचा निश्चय होणार नाहीं.

तत्त्वमोस्तुल्यनीडार्थमसीत्येतत्पदं भवेत् ॥ १९६ ॥

अर्थः—तें ब्रह्म आणि तूं ह्या दोघांचें स्थान एकच आहे हें दाखविण्याकरितां ( असि ) अस् धातूचें द्वितीयपुरुषीं एकवचनी रूप घातलें आहे.

तच्छब्दः प्रत्यगात्मार्थः तच्छब्दार्थस्त्वमस्तथा ।
दुःखित्वात् प्रत्यगात्मत्वं वारयेतामुभावपि ॥ १९७ ॥

अर्थः–तत् शब्दाचा अर्थ प्रत्यक् आत्मा, त्वं पदाचा तोच अर्थ, दोन्ही शब्दांच्या ठिकाणीं प्रत्यक् आत्मपणा समजल्यावर दुःख भोगण्याचा संबंध कोणाकडेही उरत नाहीं.

एवं च नेति नेत्यर्थं गमयेतां परस्परम् ॥ १९८ ॥

अर्थः–ह्याप्रमाणेंच तें नाहीं, तें नाहीं वगैरे व्यतिरेकी वाक्यावरून त्या ब्रह्माचाच बोध होतो.

एवं तत्त्वमसीत्यस्य गम्यमाने फले कथम् ।
अप्रमाणत्वमस्योक्ता क्रियापेक्षात्वयुच्यते ॥ १९९ ॥

अर्थः—ह्याप्रमाणें तें ब्रह्म तूं आहेस ह्या वाक्यापासून कांहीं इष्ट फलप्राप्ति होत असून त्या ब्रह्माच्या ज्ञानाला उदाहरण देतां येत नाहीं. आतांच्या बोलण्यावरून तर कांहीं तरी क्रिया ... लागते असें ठरतें.

तस्मादाद्यन्तमध्येषु कुर्वित्येतद्विरोध्यतः ।
न कल्पामोऽश्रुतत्वाच्च श्रुतत्यागोऽप्यनर्थकः ॥ २००॥

अर्थः—तेव्हां प्रथमारंभीं ( महावाक्याच्या उपदेशाच्या वेळीं) मध्यें ( शब्दाचा अर्थ करतांना ) आणि शेवटीं ( ब्रह्मानुभव घेतांना ) कांहीं तरी करायला सांगितलें आहे आणि तें ( ज्ञानाला) प्रतिकूल नाहीं, तेव्हां क्रिया नाहीं हें म्हणतां येत नाहीं, तसें कोठें सांगितलें नाहीं, व जें सांगितलें आहे तें सोडून देणें ( आणि मनचाच अर्थ करणें ) चांगलें नाहीं.

यथाऽनुभूयते तृप्तिः भुजेर्वाक्यान्न गम्यते ।
वाक्यस्य विश्रुतिस्तद्वत् गोशकृत्पायसी क्रिया ॥२०१॥

अर्थः—भोजनानें होणारा संतोष ( भोजन करतों ) ह्या वाक्यान ( तें वाक्य म्हणत बसल्यानें ) होत नाहीं. तसेंच गाईच्या शेणापासून दुधाची तृप्ति मिळणार नाहीं, त्याप्रमाणें नुसतें महावाक्य म्हटल्यानें त्याचा अर्थ कळणार नाहीं.

सत्यमेवमनात्मार्थवाक्यात्पारोक्ष्यबोधनम् ।
प्रत्यगात्मनि न त्वेवं संख्याप्राप्तिवदध्रुवम् ॥ २०२ ॥

अर्थः—हें खरें कीं आत्म्याशिवाय इतर अर्थ सांगणाऱ्या वाक्यांनीं अपरोक्ष कळत नाहीं. पण प्रत्यक् आत्म्याच्या संबंधानें तें लागू नाहीं. दोन संख्येची बेरीज सांगितली कीं ती नक्कीच यावयाची, त्याप्रमाणें आत्म्याची प्राप्ति व्हावयाची हें ठरलेलेंच.

स्वयमेवात्वपर्यायः स्वप्रमाणक इष्यताम् ।
निवृत्तावहमः सिद्धः स्वात्मतोऽनुभवश्च नः ॥ २०३॥

अर्थः—आत्मा स्वतःच प्रमाण आहे, हेंच दुसऱ्या शब्दांनीं म्हणावयाचें म्हणजे तो स्वतःच्या जाणला जाणारा आहे, हें सांगणें

होय. अहंकाररूपी ( ब्रह्माला झाकणारी ) उपाधि निघाली कीं आत्म्याचा आपोआप अनुभव आहेच, असें आमचें ह्मणणें.

बुद्धीनां विषयो दुःखं नो यस्य विषया मताः ।
कुतोऽस्य दुःखसंबंधो दृशेः स्यात् प्रत्यगात्मनः २०४

अर्थः—विषयापासून दुःखाचा अनुभव येतो तो बुद्धीला, आणि आत्मा तर विषयाच्या पलीकडे आहे, तेव्हां ज्ञानपूर्ण प्रत्यक् आत्म्याला दुःखाचा स्पर्श होणार कसा ?

दृशिरेवानुभूयेत स्वेनैवानुभवात्मना ।
तदाभासतया जन्म धियोऽस्यानुभवः स्मृतः ॥२०५॥

अर्थः—ज्ञानपूर्ण आत्म्याचें ज्ञान हेंच स्वरूप आहे, मग त्याला दुसरें ज्ञान काय होणार ? पण त्या चैतन्याचें प्रतिबिंब बुद्धीवर पडल्यामुळें त्याचें स्फुरण हाच त्याचा अनुभव असें ( शास्त्रकार ) ह्मणतात.

अशनायादिनिर्मुक्तः सिद्धो मोक्षस्त्वमेव सः ।
श्रोतव्यादि तवेत्येतत् विरुद्धं कथमुच्यते ॥ २०६ ॥

अर्थः—खाणें पिणें वगैरे संसारबंधांतून अलिप्त, मोक्षरूपी जर तो ठरलेलाच आहे, तर मग श्रवण करायला पाहिजे वगैरे ( आक्रिया ) उलट गोष्टी सांगता कशाला ?

सेत्स्यतीव चेत्तस्यात् श्रवणादि तदा भवेत् ।
मोक्षस्यानित्यतैवं स्यात् विरोधे नान्यथा वचः ॥२०७॥

अर्थः—तें तुला प्राप्त होईल असें ह्मणाल तेव्हांच श्रवण करणें वगैरे गोष्टी साधन अर्थानें संभवनीय आहेत. पण ह्यांत मोक्षाकडे अनित्यपणा ( नाश ) येईल. तेव्हां ह्या तुमच्या बोलण्याचा ( वि-

रोग येतो ) मेळ बसत नाहीं, यावरून महावाक्य खोटें नाहीं असेंच ठरतें.

श्रोतृश्रोतव्ययोर्भेदो यदीष्टः स्याद् भवेदिदम् ।
इष्टार्थकोप एवं स्यात् न युक्तं सर्वथा वचः ॥२०८॥

अर्थः–तुमचें मत सिद्ध करायला श्रोता ( ऐकणारा ) निराळा आणि ऐकण्याची वस्तू निराळी असें मानावें लागेल, पण त्यामुळें ( जीवाला ब्रह्मत्व यावें हा जो ) तुमचा हेतु तो फसणार. तेव्हां तुमच्या बोलण्याला आधारच काहीं रहात नाहीं.

सिद्धो मोक्षोऽहमित्येव ज्ञात्वात्मानं भवेद्यदि ।
चिकीर्षुर्यस्य मूढात्मा शास्त्रं घोद्घाटयत्यपि ॥२०९॥

अर्थः—मोक्ष आधींपासूनच सिद्ध आहे, मी आत्मा आहें, असें ज्ञान झाल्यावर जर तो कांहीं कर्म करण्याची इच्छा धरील, तर त्याला मूर्ख म्हणावें. त्यानें सगळें शास्त्र पालथें घातलें असलें तरी त्याचा उपयोग नाहीं.

न हि सिद्धस्य कर्तव्यं सकार्यस्य न सिद्धता ।
उभयालंबनं कुर्वन् आत्मानं वंचयत्यपि ॥ २१० ॥

अर्थः–सिद्ध झाला ( ब्रह्मज्ञानी झाला ) त्याला कर्म उरणार नाहीं, कर्मांची उठाठेव असेल तोंपर्यंत त्याला सिद्धपणा येणार नाहीं. दोन्ही धरून बसेल तो आपल्याला फसवितो ( त्याला काहीं कळत नाहीं ) असें म्हणावें.

सिद्धो मोक्षस्त्वमित्येतत् वस्तुमात्रं प्रदर्श्यते ।
श्रोतुस्तथात्वविज्ञाने प्रवृत्तिः स्यात्कथं स्थिति ॥२११॥

अर्थः—मोक्ष आधींपासून सिद्ध आहे, तूं तोच आहेस, असें म्हणून ब्रह्माची नुसती ओळख दाखविली. पण तेव्हां—ें

ला ( लगेंच ) ज्ञान होत नाही. त्यामुळें त्याला तें समजण्याबद्दल ब्रह्मरूपीं कर्म करणें भाग आहे. मग उगीच त्याबद्दल नांवें कां ठेवता ?

कर्ता दुःख्यहमस्मीति प्रत्यक्षेणानुभूयते ।
कर्ता दुःखी च माभूवं इति यत्नो भवेत्ततः ॥२१२॥

अर्थः—मी कर्म करतों, मला दुःख होतें, वगैरे अनुभव प्रत्यक्ष येत असतो; तेव्हां मी कर्मापासून अलिप्त असावें, दुःखाचा लेश मला लागूं नये, यासाठीं खटपट करावी लागते.

तद्विज्ञानाय युक्त्यादि कर्तव्यं श्रुतिरब्रवीत् ॥
कर्तृत्वाद्यनुवादेन सिद्धत्वानुभवाय तु ॥ २१३ ॥

अर्थः—त्याचें ज्ञान करून घ्यावें आणि सिद्ध ( ब्रह्मरूप ) व्हावें म्हणून कर्तेपणाचा अनुवाद करून ( नाना प्रकारच्या ) युक्ति वगैरे कराव्या असें वेदांत सांगितलें आहे.

निर्दुःखो निष्क्रियोऽकामः सिद्धो मोक्षोऽहमित्यपि ।
गृहीत्वैव विरुद्धार्थं आदध्यात्कथमेव सः ॥ २१४ ॥

अर्थः—मी दुःखरहित, कर्मरहित, इच्छा नसलेला आहें, मोक्ष ( अगोदरच ) सिद्ध आहे, असें कळल्यावर तोच त्याच्या उलट समजूत कशी घेऊन बसेल ?

सकामः सक्रियेऽसिद्धइति मेऽनुभवः कथम् ।
अतो मे विपरीतस्य स भवान्वक्तुमर्हति ॥ २१५ ॥

अर्थः—मी जर ( तुम्ही ह्मणता तसा ) ह्या सर्वांहून विलक्षण आहें, तर मला इच्छा होते, मी कर्मे करतों, मी सिद्ध नाहीं असा माझा मला अनुभव येतो तो कसा हें महाराज मला सांगा.

रोध येतो ) मेळ बसत नाहीं. यावरून महावाक्य खोटें नाहीं असेंच ठरतें.

श्रोतृश्रोतव्ययोर्भेदो यदीष्टः स्याद् भवेदिदम् ।
इष्टार्थकोप एवं स्यात् न युक्तं सर्वथा वचः ॥२०८॥

अर्थः-तुमचें मत सिद्ध करायला श्रोता ( ऐकणारा ) निराळा आणि ऐकण्याची वस्तू निराळी असें मानावें लागेल, पण त्याइलें (जीवाला ब्रह्मत्व यावें हा जो ) तुमचा हेतु तो फसणार. तेव्हां तुमच्या बोलण्याला आधारच कांहीं रहात नाहीं.

सिद्धो मोक्षोऽहमित्येव ज्ञात्वात्मानं भवेद्यदि ।
चिकीर्षुर्यस्य मूढात्मा शास्त्रं चोद्याद्यप्यपि ॥२०९॥

अर्थः-मोक्ष आधींपासूनच सिद्ध आहे, मी आत्मा आहे, असें ज्ञान झाल्यावर जर तो कांहीं कर्म करण्याची इच्छा धरील, तर त्याला मूर्ख म्हणावें. त्यानें सगळें शास्त्र वाचलें पाठ केलें असलें तरी त्याचा उपयोग नाहीं.

न हि सिद्धस्य कर्तव्यं सकार्यस्य न सिद्धता ।
उभयालंबनं कुर्वन् आत्मानं वंचयत्यपि ॥ २१० ॥

अर्थः-सिद्ध झाला ( ब्रह्मज्ञानी झाला ) त्याला कर्म उरणार नाहीं, कर्माची उठाठेव असेल तोंपर्यंत त्याला सिद्धपणा येणार नाहीं. दोन्ही धरून बसेल तो आपल्याला फसवितो ( त्याला कांहीं कळत नाहीं ) असें म्हणावें.

सिद्धा मोक्षस्त्वमित्येतत् वस्तुमात्रं प्रदर्श्यते ।
श्रोतुस्तयात्मविज्ञाने प्रवृत्तिः स्यात्कथं हिवति ॥२११॥

अर्थः-मोक्ष आधींपासून सिद्ध आहे, तूं तोच आहेस, असें म्हणून मनाची नुसती ओळख दाखविली. पण तेवढ्यानें ऐकणारा-

मेऽर्थिता । सदैव तृप्तश्च न कामये हितं यतस्व चेतः प्रशमाय ते हितम् ॥ ३ ॥

अर्थः—कारण, सनातन परमात्म्यावांचून दुसरें कांहींच नाहीं, आणि मी सदोदित तृप्त असल्यामुळें मला कांहीं मागायचें नाहीं. माझ्या तृप्तीला कांहींच उणीव नसल्यामुळें माझ्या हितावें मिळवायचें उरलेलें नाहीं. याकरितां हे मना, शांत होण्याची खटपट कर, ह्यांतच तुझें कल्याण आहे.

पडूर्मिमालाव्यतिवृत्त एव यः स एव आत्मा जगतश्च नः श्रुतेः ॥ प्रमाणतश्चापि मया प्रवेद्यते सुधैव तस्माच्च मनस्त्वचेहितम् ॥ ४ ॥

अर्थः—खाणें, पिणें, शोक, जरा आणि मृत्यू या सहा विकाराची परंपरा सोडून निराळा असलेला तोच माझा आत्मा, जगतांत तोच भरला आहे, वेदांत त्याचेंच प्रतिपादन आहे, दृष्टातांवरूनहि मला त्याचाच अनुभव येतो. याकरितां हे मना, तुझी खटपट व्यर्थ आहे.

त्वयि प्रशांते नहि चास्ति भेदधीः । यतो जगन्मोहमुपैति मायया ॥ भ्रदो हि मायाप्रभवस्य कारणं । भ्रमाद्विमोक्षे न हि सास्ति कस्यचित् ॥ ५ ॥

अर्थः—ज्या भेदबुद्धी ( द्वैत ) मुळें मायेच्या स्वाधीन होऊन सगळें जग मोंवावलें आहे, तें द्वैत जाण्याला तूं शांत व्हायला पाहिजे. भलतीच समजूत झाली म्हणजे ती मायेच्या उत्पत्तीला कारण होते. ती खसली समजूत गेली तर मग ती माया कोणालाच बाधणार नाहीं.

नमेऽरिन मोहरतस्य चेष्टितेन हि । प्रवुद्धतत्त्वस्त्वसितो

वाक्यरूप फुलांतून अमृतासारखा ( गोड, मृत्यु घालविणारें ) ज्ञानरूप मध आमच्या ( उद्धारा ) करितां काढला, त्या सद्गुरुंना नमस्कार असो.

---

अथ भेषजप्रयोगप्रकरणम्
औषधाची योजना.

प्रयुज्य तृष्णाज्वरनाशकारणं चिकित्सितं ज्ञानविरागभेषजं । न याति कामज्वरसन्निपातजां शरीरमालां शतयोगदुःखितां ॥ १ ॥

अर्थः—वासनारूपी ताप घालविणारें, ज्ञान आणि वैराग्यरूपी औषध नीट चौकशीनें तयार करून त्याचें सेवन केलें असतां, अनेकप्रकारचे क्लेश देणारी आणि इच्छारूपी सन्निपात तापानें विस्मरण झाल्यामुळें येणारी जन्ममरणपरंपरा पुनः भोगावी लागत नाहीं.

अहंममेति त्वमनर्थमीहसे परार्थमिच्छंति तवान्य ईहितम् । न तेऽर्थबोधो न हि मेऽस्ति चार्थिता ह्यतश्च युक्तः शमएव ते मनः ॥ २ ॥

अर्थः—हे मना, मी आणि माझें हा विनाकारण आग्रह कां धरीत आहेस; पुरुषाच्या उपभोगाकरितां ( सर्व आहे असा ) आग्रह तुझ्याप्रमाणेंच दुसरे ( सांख्यमतवादी ) मानतात. पण ( वेदांताच्या म्हणण्याप्रमाणें तूं जड आहेस तेव्हां ) तुला तो परमात्मा समजणार नाहीं. मलाहि कांहीं मागण्याची इच्छा नाहीं, तेव्हां तूं आतां शांत व्हावेंस हेंच ठीक आहे.

यतो न चान्यः परमात्सनातनात् सदैव तृप्तोऽहमतो न

अर्थः–पहाणारा, पहाणें आणि पहाण्याची वस्तु हा सर्व प्रकार तुझ्या भ्रांतीचा आहे; पहाण्याच्या वस्तूहून पहाणारा निराळा दिसतच नाहीं. स्वप्नांत होता तो जागा झाल्यानें निराळा होत नसतो.

विकल्पना वापि तथाद्वया भवेदवस्तुयोगाचदलातचक्रवत् ॥ न शक्तिभेदोऽस्ति यतोन चात्मनां । ततोद्वयत्वं श्रुतितोऽवसीयते ॥ १० ॥

अर्थः—पेटविलेलें लांकूड ( कोलीत ) फिरविलें असतां चक्रासारखें वाटतें, त्याप्रमाणें आत्म्याव्यतिरिक्त इतर ठिकाणीं संबंध असलेली कल्पनासुद्धां निराळी ( अधिष्ठानाला सोडून ) नसते. आत्म्याच्या शक्तीमध्येंहि कधीं कमी जास्त होत नाहीं. शिवाय आत्म्याच्या ठिकाणीं द्वैत नाहीं असें वेदांत सांगितलें आहे.

मिथश्च भिन्ना यदि ते हि चेतना । क्षयस्तु तेषां परिमाणयोगतः ॥ ध्रुवो भवेद्घटवतां हि दृष्टतो । जगत्क्षयश्चापि समस्तमोक्षतः ॥ ११ ॥

अर्थः—चैतन्ययुक्त जीव आत्म्याहून निराळे आहेत असें म्हणशील तर त्यांना परिमाण ( माप-लांबीरुंदी वगैरे ) येईल आणि त्यामुळें त्याचा नाश होणारच. बरें कदाचित् हा निराळेपणा मानणाऱ्यांनीं सर्व जीवांना ( केव्हां तरी ) मोक्ष मिळणार असें म्हटलें तर [ जीव मुक्त झाल्यावर मग ] हें जग तरी कुठें राहील, त्याचा नाशच होईल.

न मेऽस्ति कश्चिन्न च सोऽस्ति कस्यचित् यतोऽद्वयोऽहं न हि चास्ति कल्पितम् ॥ अकल्पितश्चास्मि पुरा प्रसिद्धितो विकल्पनायाद्वयमेव कल्पितम् ॥ १२ ॥

ह्यविक्रियः ॥ न पूर्वतत्त्वोत्तरभेदता हि नो । ह्यथैव तस्माच्च मनस्तवेहितम् ॥ ६ ॥

अर्थः—मी बंधरहित, क्रियारहित असून माझें खरें स्वरूप सदा कायम आहे; म्हणून तुझ्या चेष्टांनी मला मोह पडत नाहीं. जाणीव होण्यापूर्वी निराळा प्रकार होता किंवा जाणीव झाल्यावर निराळा झाला असें म्हणायला कांहीं कारण नाहीं. यासाठीं हे मना, तुझे चाळे उगीच आहेत.

यतश्च नित्योऽहमतो न चान्यथा । विकारयोगे हि भवेदनित्यता ॥ सदा प्रभातोऽहमतो हि चाद्वयो । विकल्पितं चाप्यसदित्यवस्थितम् ॥ ७ ॥

अर्थः—मी नेहमीचाच असल्यामुळें निराळा प्रकार ( नाश ) नाहीं. नाशवंत होण्याला विकार पावणारा असावा लागतो. मी सदोदित अद्वैतरूप आहें, मला नेहमीच पहाट झालेली आहे. जी कांहीं कल्पना उठेल ती खोटी हें निश्चयेंकरून समजावें.

अभावरूपं त्वमसीह हे मनो । निरीक्ष्यमाणे नहि युक्तितोऽस्तिता ॥ सतो ह्यनाशादसतोप्यजन्मतो । द्वयंच चेतस्तव नास्ति नेष्यते ॥ ८ ॥

अर्थः—हे मना, तुझें स्वरूप पाहूं लागलों तर नसणें हें होय. युक्तीच्या साहाय्यानें तुझी परीक्षा केली तर तुला अस्तित्व नाहीं. सत् आहे त्याचा नाश होत नाहीं, असत् उत्पन्न होत नाहीं, ह्यावरून तुला जन्म किंवा मरण मुळींच नाहीं.

द्रष्टा च दृश्यं च तथा च दर्शनं । भ्रमस्तु सर्वस्तव कल्पितो हि सः ॥ दृशेश्च भिन्नं नहि दृश्यमीक्ष्यते । स्वपन्प्रबोधेन तथा न भिद्यते ॥ ९ ॥

अर्थः—पहाणारा, पहाणें आणि पहाण्याची वस्तु हा सर्व प्रकार तुझ्या भ्रांतीचा आहे; पहाण्याच्या वस्तूहून पहाणारा निराळा दिसतच नाहीं. स्वप्नांत होता तो जागा झाल्यानें निराळा होत नसतो.

विकल्पना वापि तथाद्वया भवेदवस्तुयोगात्तदलातचक्रवत् ॥ न शक्तिभेदोऽस्ति यतोन चात्मनां । ततोद्वयत्वं श्रुतितोऽवसीयते ॥ १० ॥

अर्थः—पेटविलेलें लांकूड ( कोलीत ) फिरविलें असतां चक्रासारखें वाटतें, त्याप्रमाणें आत्म्याव्यतिरिक्त इतर ठिकाणीं संबंध असलेली कल्पनासुद्धां निराळी ( अधिष्ठानाला सोडून ) नसते. आत्म्याच्या शक्तीमध्येंहि कधीं कमी जास्त होत नाहीं. शिवाय आत्म्याच्या ठिकाणीं द्वैत नाहीं असें वेदांत सांगितलें आहे.

मिथश्च भिन्ना यदि ते हि चेतना । क्षयस्तु तेषां परिमाणयोगतः ॥ ध्रुवो भवेद्भेदवतां हि दृष्टतो । जगत्क्षयश्चापि समस्तमोक्षतः ॥ ११ ॥

अर्थः—चैतन्ययुक्त जीव आत्म्याहून निराळे आहेत असें ह्मणशील तर त्यांना परिमाण ( माप लांबीरुंदी वगैरे ) येईल आणि त्यामुळें त्याचा नाश होणारच. बरें कदाचित् हा निराळेपणा मानणाऱ्यानीं सर्व जीवांना ( केव्हां तरी ) मोक्ष मिळणार असें ह्मटलें तर [ जीव मुक्त झाल्यावर मग ] हें जग तरी कुठें राहील, त्याचा नाशच होईल.

न मेऽस्ति कश्चिन्न च सोऽस्ति कस्यचित् यतोऽद्वयोऽहं न हि चास्ति कल्पितम् ॥ अकल्पितश्चास्मि पुरा नासिद्धं विकल्पनायाद्वयमेव कल्पितम् ॥ १२ ॥

अर्थः—माझें असें कांहीं नाहीं. किंवा मी सुद्धां कोणाचा नाहीं. कारण मी अद्वैत आहें, माझ्या ठिकाणीं दुसऱ्याची कल्पनाच संभवत नाहीं. आनिकल्पना होण्यापूर्वीं मी होतो त्याप्रमाणेंच कल्पनारहित मी अद्याप आहें. तेव्हां द्वैत हेंच कल्पनेनें झालेलें आहें.

विकल्पना चाप्यभवे न विद्यते। सदन्यदित्येवमतो न नास्तिता ॥ यतः प्रवृत्ता तव चापि कल्पना। पुरा प्रसिद्धेन तद्धि कल्पितम् ॥ १३ ॥

अर्थः—जन्मरहित आत्म्याच्या ठिकाणीं विकल्पाचा ( आभासाचा ) आणि सत्हून निराळें ( असत् ) याचा संबंध नाहीं, त्यामुळें ( आत्म्याला ) नास्तिता ( नसणें अभाव ) नाहीं. ( हे मना ) तुझी कल्पना उत्पन्न होण्यापूर्वीं आत्मा प्रसिद्ध होताच. तो मात्र केव्हां सुद्धा कल्पिलेला नाहीं.

असत्द्वयं तेऽपि हि यद्यदीक्षते। न दृष्टमित्येव न चैव नास्तिता ॥ यतः प्रवृत्ता सदसद्विकल्पना। विचारवद्यापि तदद्वयं च सत् ॥ १४ ॥

अर्थः—जें जें दृष्टीस पडतें तें तें द्वैत आणि असत ( खोटें ) होय. पण आत्मा दिसत नाहीं, ह्यावरून तो खोटा असें मात्र नाहीं. ज्याच्या ( अधिष्ठाना ) पासून हें सत् आणि हें असत् निघालें, तो आणि ज्याच्या योगानें विचार झाला तो, आत्मा मात्र सत् आणि अद्वैत होय.

सदभ्युपेतं भवतोपकल्पितं। विचारहेतोर्यदि तस्य नास्तिता ॥ विचारहानाच यथैव संस्थितं। न चेत्तदिष्टं नितरां सदिष्यते ॥ १५ ॥

अर्थः—हे मना, तूं कल्पनेनें रचलेलें द्वैत आहे असें ( घटका-

भर ) विचार करण्याकरितां घेऊन चालं. त्यामुळें जर आत्मा नाहीं असें क्षणशील तर ( विचार करणाराच कोणी नसल्यावर ) विचार चालणार कसा ? मग तें ( विचाराला घेतलेलें ) तसेंच राहिलें. हें तर तुला नको, तेव्हां सद्वस्तु ( आत्मा ) आहे असेंच पतकरावें लागेल.

असत्समं चैव सदित्यपीति चेत् । अनर्थवत्त्वान्नरशृंगतुल्यतः ॥ अनर्थवत्त्वं त्वसति ह्यकारणं । न चैव तस्मान्न विपर्ययेऽन्यथा ॥ १६ ॥

अर्थः—तुह्मीं सत् ह्मटलें काय आणि आह्मीं असत् ह्मटलें काय, दोन्हींचा परिणाम सारखाच दिसतो, त्या सतापासून कांहीं क्रिया वगैरे घडावयाची नाहीं. तर मग माणसाला शिंग असलेलें जसें निरुपयोगी त्याप्रमाणें होईल. क्रिया वगैरे घडत नाहींत हें कारण देऊन त्या आत्म्याला असत् ठरवितां येणार नाहीं. कारण क्रिया घडत नाहीं ह्मणून तें नाहीं असें कसें ! ( श्रुतीच्या प्रमाणावरून तें ब्रह्म अगोदरपासून आहेच. )

असिद्धतश्चापि विचारकारणात् । द्वयं च तस्मात्प्रसृतं च मायया ॥ श्रुतेः स्मृतेश्चापि तथाहि युक्तितः । प्रसिध्यतीत्थं न तु युज्यतेऽन्यथा ॥ १७ ॥

अर्थः—तो आत्मा कूटस्थ झाल्यावर ( तेथील बुद्धीच्या उपाधीमुळें ) विचाराची सुरवात होऊन मायेच्या साहाय्यानें द्वैत उत्पन्न झालें, याप्रमाणें श्रुति, स्मृति आणि न्याय निर्णयानें ठरलें आहे. एरवीं वास्तविक पाहिलें तर त्या आत्म्याच्या ठिकाणीं ( कर्म वगैरे ) कांहींच जुळत नाहीं.

विकल्पनाचापि विपर्ययकं श्रुतेः । पुरा प्रसिद्धेश्च ।

ऽद्वयम् ॥ न चेति नेतीति यया विकल्पितं । निषिध्यतेऽप्राप्य-
विशेषसिद्धये ॥ १८ ॥

अर्थः—अगोदरच सिद्ध असलेल्या ब्रह्माच्या ठिकाणीं भल त्याच समजुतीमुळें निराळ्या स्वभावाचें जें द्वैत त्याचा भास झाला, हें नाहीं, तें नाहीं असें ह्मणून सर्व कांहीं भ्रमाच्या समजुतीचें निराकरण केलें, तरी त्यामुळें गुणरहित ( द्वितीयरहित ) असें ब्रह्म शिल्लक उरलें.

अकल्पितमेवमजेऽद्वयेऽक्षरे । विकल्पयंतः सदसच्च जन्मभिः।
स्वचित्तमायामयवं च ते भवं । जरां च मृत्युंच नियांति
संततं ॥ १९ ॥

अर्थः—जन्मरहित, अद्वितीय, नाशरहित ब्रह्म असून खऱ्या खोट्या आणि भलत्याच गोष्टींची त्याचे ठिकाणीं समजूत लोक करून घेतात, त्यांना अनेक योनींमध्यें जन्म घ्यावा लागून, आपल्याच मनाच्या भ्रमापासून उत्पन्न झालेला संसार, वार्धक्य, आणि मृत्यू ह्याच्या तावडींत एकसारखे ते सांपडतात.

भवाभवत्वं तु न चेदवस्थितिर्न चास्य चान्यस्थितिजन्म
नान्यथा ॥ ततो ह्यसत्त्वादसतश्च सत्त्वतो । न च नित्याकार-
कमित्यजोऽप्ययम् ॥ २० ॥

अर्थ.—उत्पन्न होणें आणि नाश पावणें ही स्थिति ब्रह्माला नाहीं. निराळ्या अवस्थेनें जन्म येईल किंवा निराळी स्थिति येईल हेंहि संभवत नाहीं. कारण तसें होईल तर तें नाशिवंत होईल, शिवाय असत् जें कांहीं जगत् त्याचें उपादान कारण तें आहे. तरी कर्मापासून तो ( आत्मा ) अलिप्त आहे, जन्मरहित आहे.

अकुर्वदिष्टं यदिवाऽस्य कारकं । नकिंचिदन्यत्तु नास्य

कारकं ॥ सतोऽविशेषादसतश्च सच्च्युतौ । तुलान्तयोर्यद्वदनिश्चयान्न हि ॥ २१ ॥

अर्थः—आमच्या द्वैताचें कारक ( असलें ) क्रियारहित असलें तरी चालेल असें ह्मणाल तर अमक्याचें अमूक कारक नाहीं असें ह्मणतांच येणार नाहीं ( प्रत्येक दुसऱ्याचें कारक होईल ); सत् जें आहे तें कधींच बदलत नाहीं आणि असत् हें सताहून निराळें आहे ( सत् नव्हे ). तेव्हां मग एखाद्या तराजूच्या दांडीच्या टोंकासारखा अस्थिरपणा त्याच्याकडे येईल आणि कांहींच निश्चय होणार नाही.

न चेरस इष्टः सदसद्विपर्ययः कथं भवः स्यात्सदसद्व्यवस्थितौ ॥ विभक्तमेतद्द्वयमव्यवस्थितं न जन्म तस्माच्च मनो हि कस्यचित् ॥ २२ ॥

अर्थः—तेव्हां असला सत् आणि असत् याचा विपर्यय नको असेल आणि सत् आणि असत् यांचा निर्णय ठरवशील तर मग संसार रहाणारच नाही. हीं दोन्ही स्पष्ट निरनिराळीं समजलाव, यास्तव हें मना ( ह्या जगापैकीं ) कांहींच जन्माला येत नाहीं.

अथाभ्युपेत्यापि भवं तवेच्छतो ब्रवीमि नार्थस्तव चेष्टितेन मे ॥ न हानवृद्धी न यतः स्वतोसतो भवोन्यतो वा यदि वास्तिवा तयोः ॥ २३ ॥

अर्थः—तुझ्या कल्पनेप्रमाणें संसार येतो असें धरलें तरी तुझ्या चेष्टांशी ( कल्पनांशी ) मला कांहीं कर्तव्य नाहीं. कारण त्यापासून माझें कांहीं नफानुकसान नाहीं, आणि कदाचित् तसें आहे . समजलें तरी जें आत्म्यावांचून दुसरें असत् आहे

आपल्या आपण किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें उत्पत्तिच संभवत नाहीं.

ध्रुवा ह्यनित्याश्च न चान्ययोगिनो मिथश्च कार्यं न घतेषु युज्यते। अतो न कस्यापि हि किञ्चिदिष्यते स्वयं च तत्त्वं न निरुक्तिगोचरम् ॥ २४ ॥

अर्थः-शाश्वत ( जो आत्मा ) आणि अशाश्वत ( इतर जग वगैरे ) त्याचा संबंध एकमेकांशीं होणेंच शक्य नाहीं, त्यामुळें त्यांच्या ( संबंधा ) पासून कांहीं क्रिया घडते ह्मणणें बरोबर नाहीं. ह्यामुळें ( परमार्थदृष्टीनें ) कोणाचा कशाशींच संबंध नाहीं. तत्त्व स्वतः वाणीच्या आटोक्यांत नाहींच नाहीं.

समं तु तस्मात्सततं विभातवद्वयादियुक्तं सदसद्विकल्पितात्। निरीक्ष्य युक्त्या श्रुतितस्तु बुद्धिमानशेषनिर्वाणमुपैति दीपवत् ॥ २५ ॥

अर्थः—वेदवचनाच्या आधारानें आणि युक्तिवादानें तें ब्रह्म सगळीकडे सारखें, नेहमीं, प्रकाशस्वरूप आहे असें समजून घ्यावें आणि सत् किंवा असत् आहे अशा प्रकारची मनात येणारी द्वैताची शंका घालवून टाकावी ह्मणजे मग दीपज्योतिप्रमाणें तो ज्ञानी पुरुष सर्व बंधनापासून मोकळा होईल.

अवेद्यमेकं यदनन्यवेदिनां कुतार्किकाणां च सुवेद्यमन्यथा। निरीक्ष्य चेत्थं स्वगुणग्रहोऽगुणं न याति मोहं ग्रहदोषमुक्तितः ॥ २६ ॥

अर्थः—ब्रह्माशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें म्हणणाऱ्यांच्या र्ने सुद्धां जाणण्यास कठीण, आणि द्वैतमतवाद्यांचा भलत्याच र्ने सुद्धां सहज रीतिनें लक्षांत येणारा, असा जो निर्विशेष

आत्मा तो देहाचा वगैरे अभिमान सोडून नीट समजावून घेतला तर त्या अभिमानरूप दोषापासून मुक्त होऊन ( सर्व संसारबंधा-विषयीं ) जीव मोहांत पडणार नाहीं.

अतोऽन्यथा न ग्रहनाश इष्यते । विमोहबुद्धेर्ग्रह एक कारणं ॥ ग्रहोऽप्यहेतुस्त्वनलस्त्वनिन्धने । यथा प्रशांतिं परमां यथा व्रजेत् ॥ २७ ॥

अर्थः--या मार्गाशिवाय इतर उपायांनीं खोटें ज्ञान नाहींसें होणार नाहीं. ज्याच्या बुद्धीला भ्रम झाला त्यालाच खोटें ज्ञान जडतें. लांकडाशिवाय असलेला अग्नि जसा विझून शांत होतो, त्याप्रमाणें तें खोटें ज्ञान गेल्यावर जीवाला अत्यंत शांति मिळते.

विमथ्य वेदोदधितः समुद्धृतं । सुरैर्महाब्धेस्तु यथा महात्मभिः ॥ तथामृतं ज्ञानमिदं हि यैः पुरा । नमो गुरुभ्यः परमीक्षतेच यैः ॥ २८ ॥

अर्थः--मोठ्या समुद्रांतून देवांनीं मंथन करून जसें अमृत काढलें त्याप्रमाणें वेदसमुद्रांतून ज्या थोर पुरुषांनीं हें ज्ञान काढलें त्या ब्रह्म जाणणाऱ्या गुरूंप्रत नमस्कार असो.

